


- भाष्यकार -

गुरूवर्य भगवत्भक्त अण्णा घाणेकर

कृत

# हरिपाठ-भाष्य-प्रकाश

- संकलन -

सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी

हरिकडे पाठ न करता, हरि-हरि असा पाठ करावा

# - हरिपाठ-भाष्य-प्रकाश -

आमची नम्रता
दि. २३/८/२०१४


**अक्षर जुळवणी -**

श्री. समीर सदानंद गद्रे / श्री. सागर सदानंद गद्रे.
श्री महालक्ष्मी एंटरप्रायझेस
प्लॉट नं. ३४८, सोसा. नं. २, आर. के. नगर, कंदलगाव रोड,
कोल्हापूर - ४१६०१३. ९४२२०४८९१८.

---

**मुद्रक/फोटो टाईप सेटींग -**

श्री. अशोक डी. चव्हाण.
प्रिंट डेस्क, ६५, प्रभानंद कॉम्प्लेक्स,
टेंभे रोड, सावित्रीबाई फुले दवाखान्याजवळ, कोल्हापूर - ४१६१०२.
० २३१-२६४२६४० ९८२२०८७६९६


---



"श्रीराम", ५६१, जोशी गल्ली,
गांवभाग, सांगली - ४१६ ४१६
०२३३-२३३२५८०


---


**आवृत्ती** - पहिली
कार्तिक वद्य त्रयोदशी 'श्री ज्ञानेश्वर महाराज समाधी दिन', दि. ०१ डिसेंबर, २०१३

---

**स्वागत मूल्य** - रु. १००/-

---

**मुखपृष्ठ** - श्री. अशोक चव्हाण

---

**ग्रंथ प्राप्तीचे ठिकाण** - १) मे. भारत होजिअरी, दत्त-मारूती रोड, सांगली - ४१६ ४१६ (०२३३) २३७२६७२

# अर्पण पत्रिका

**"भरोनि सद्भावाची अंजुळी।**
**मियां वोंवियाफुलें मोकळीं।**
**अर्पिलीं अंध्रियुगुलीं। विश्वरूपाच्या॥"**

ज्ञा. अ. ११-७०८

ज्यांच्या सहवासाने व पूर्ण कृपाशीर्वादाने,
परब्रह्मस्वरूप श्री पांडुरंगाची असीम
प्रेमभक्ती निर्माण झाली, ज्यांनी
कटाक्षाने आत्मचिंतनास प्रवृत्त केले
त्या वैकुंठवासी
गुरुवर्य
**प्राचार्य, शं. वा. तथा सोनूमामा दांडेकर**
यांना ही विचार सुमनें
कृतज्ञतापूर्वक समर्पित

- संतचरणरज

अण्णा



सद्‌गुरु वै. सोनोपंत ऊर्फ मामासाहेब दांडेकर

॥ ॐ ॥

## ज्यांच्या भाष्य-प्रकाशावर हा पूर्ण ग्रंथ आधारित आहे त्या प. पू. आनंद रामचंद्र तथा आण्णा घाणेकर यांचा

# - अल्प परिचय -

'शुद्ध बीजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥' या जगद्गुरू तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे प. पू. आण्णांचा जन्म जमखंडी (कर्नाटक) येथे श्रावण व!!८ गोकुळअष्टमी शके १८५३ (दि. ४ सप्टें. १९३१) रोजी कुलवान, शीलसंपन्न, शिक्षकी पेशाद्वारे ज्ञानदानात तत्पर अशा सत्पुरूषाच्या पोटी झाला. प्राथमिक शिक्षण जमखंडी येथे व नंतरचे तत्वज्ञानातील उच्चतम (एम. ए.) पदवीपर्यंतचे शिक्षण पुणे येथे झाले.

वैदिक धर्माच्या व्याख्येनुसार; व्रतबंध होताच 'द्विजत्व' प्राप्त झाले. त्याचवेळी वारकरी पंथाचे अध्वर्यु, ज्ञानीभक्त वै. शं. वा. दांडेकर यांचा अनुग्रह व पुढे सलग तीस वर्षे त्यांचा निकटचा सहवास लाभला. त्या उपदेशाने व वातावरणाने प्रभावीत होऊन आजन्म ब्रह्मचर्यव्रत स्विकारले व निभावले.

''स्वाध्याय'' ही एक परमार्थातील दैवी संपत्ती व अध्यात्ममार्गातील महत्वाची पायरी लगेच चढावयास सुरूवात केली. प्रदीर्घ कालपर्यंत उपनिषदें, षड्दर्शने, ब्रह्मसूत्रे, शांकरभाष्य, गीता, भागवत्, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, नाथ भागवत्, स्वामी रामदासांचे ग्रंथ इ. अनेकानेक ग्रंथांचे सखोल अध्ययन, चिंतन केले. याला सत्संग व सत्श्रवणाची अभूतपूर्व अशी जोड दिली. सुजलाम्, सुफलाम् होण्यासाठी भूमी तत्पर झाली.

''अंतरीचे धावे स्वभावें बाहेरी'' या उक्तीनुसार कीर्तने, प्रवचने, भागवतकथा, ग्रंथांची पारायणे, पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी या माध्यमातून ''लोकसंग्रह'' सुरू झाला (आषाढी-कार्तिकी वारी सलग ५८ वर्षे हा एक विक्रमच! हा ''विक्रम'' अजूनही चालू आहेच.)

मध्यंतरीच्या काळात ''वृत्ती'' सांभाळण्यासाठी सुमारे १६ वर्षे नोकरी केली. पण तिचा ''प्रवृत्ती''च्या वाटचालीत अडथळा येऊ लागल्याने नोकरीला कायमचा रामराम ठोकला.

भगवान श्रीकृष्ण श्रीमद्भागवत ग्रंथाद्वारे उद्धवाला उपदेश करतात की, नामस्मरण व सत्संग याद्वारे माझी जशी लवकर प्राप्ती होते तशी अन्य कोणत्याही साधनानीं होत नाही.

(स्कं. ११-अ, ११ व १२) हाच धागा पकडून प. पू. आण्णांनी तरूणपणीच ध्यास घेतला. त्याचे फलित म्हणून गुरूदेव रानडे, वै. ह.भ.प. सोनोपंत दांडेकर, वै. ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर, योगीराज वामराव गुळवणी, स्वामी स्वरूपानंद, नानामहाराज तराणेकर, काकासाहेब तुळपुळे, दादा महाराज देशपांडे, म्हादबा पाटील, अण्णासाहेब कुलकर्णी, काकासाहेब कारखानीस, प्रा. न. ग. दामले इ. अनेकानेक सत्पुरूषांचा सहवास, मार्गदर्शन त्यांना लाभले. आध्यात्मिक उन्नती हे गोड फळ त्यांना मिळालेच!

१९७० साली त्यांना परदेश-वारीचा योग आला. लंडन व केंब्रीज येथे ३/३ महिने भारतीय तत्वज्ञानावर अभ्यासपूर्ण प्रवचने केली.

व्यासपीठावर मिळालेल्या ऐच्छिक दक्षिणेतून वेद पाठशाळा, वारकरी शिक्षण संस्था आळंदी, देवस्थाने, तीर्थस्थळे, हुषार परंतु गरीब शिक्षणार्थी विद्यार्थी यांना सढळ हाताने मदत करीत आहेत.

एवढे मोठे व्यक्तिमत्व असल्यावर पुरस्कार, सत्कार यांनी पाठ सोडली असती तरच नवल! शंकराचार्यांचे करवीर पीठ, कांची पीठ, सुर्णवल्ली पीठ अशा अनेक नामवंत धार्मिक संस्थांनी त्यांना गौरविले. पण प. पू. आण्णांचा स्थायीभावच असा आहे की, प्रसिद्धी माध्यमांपासून (विशेषतः टी. व्ही.) ते दूर राहणेच पसंत करतात. माऊलीची शिकवणच पहा ना -

**पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानी नायकावी ।**

**हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ।।**

ज्ञाने. अ. १३-१८८

**जीवन हेतू** - शेवटच्या श्वासापर्यंत बिदागी न ठरवता प्रवचन, किर्तन, भजन या माध्यमातून आत्मविद्येचे प्रबोधन करण्याचा निश्चय आहे. **उरलेला सर्व वेळ जास्तीत जास्त नामस्मरणात.**



# ''नामामृत गोडी, वैष्णवा लाधली''

एखादे वेळी श्रोत्रिय ब्राह्मण संध्यावंदन विसरेल पण भाविक निष्ठावंत नेमाचा वारकरी **''हरिपाठ''** म्हणल्याशिवाय कधीही राहणार नाही. हरिपाठ हा ग्रंथ सूर्यनारायणासारखा स्वयंप्रकाशित आहे. तरीपण सूर्याला जसे भक्तिभावाने काडवातीने ओवाळतात तसेच **''हरिपाठा''**सारख्या तेज:संपन्न साक्षात् उपनिषद्प्राय ग्रंथावर काही **''विवरण-भाष्यप्रकाश''** म्हणजे श्रीगुरु ज्ञानेश्वर माऊलीच्या कृपेनेच झालेली **''नाम-प्रेम''** साजूक तूपात भिजवलेली काडवातच आहे.

हरिपाठाच्या २७ अभंगाच्या रुपाने श्री ज्ञानेश्वर महाराजांनी २८ युगें विटेवर उभा असलेल्या परब्रह्मस्वरुप पांडूरंगाच्या प्राप्तीस्तव बांधलेल्या सोपानाच्या पायऱ्याच आहेत.

**''हरिमुखें म्हणा, हरि मुखें म्हणा''** असा आग्रह बुद्धिवैभवाच्या कलशस्थानी असणाऱ्या माऊलींचाच . **''हरिपाठ''** हा ग्रंथ **''प्रमेय रत्नांची''** खाणच आहे. काय करतात सध्या ? काय करणार नां आता ?? करतात ''हरि-हरि'' असा इतका क्षुल्लक हा विषय नाही तर अवघ्या जीवांचे परमकल्याण करणारे कलियुगांतील श्रेष्ठ एकमेव साधन ''नामस्मरण'' याचा अनुबंधचतुष्टयपूर्वक विचार करणारा हा महान ग्रंथ आहे.

श्रीगुरु ज्ञानराजांच्या कृपाप्रसादाने व वै. प्राचार्य ह.भ.प. सोनुमामा दांडेकर यांनी हाती दिलेल्या चिंतनकला प्रकाशाने हरिपाठावरील या भाष्य-प्रकाशात प्रथमपासून **''समाधि संजीवन हरिपाठ''** पर्यंत सरळ अर्थ, न पुढें शास्त्रशुद्ध, साप्रमाण व थोडक्यात पण सविस्तर विवरण झालेले आहे. यात सहजच अगदी ओघात संतांच्या स्वानुभवाच्या गुरुगम्यखुणा प्रगट झालेल्या आहेत. हे विवरण म्हणजे नामामृताची प्रत्यक्ष जान्हवीच, अण्णासारख्या अनभिज्ञ, अजाण, अडाणी, सेवकावर लोटली अशी श्रद्धा आहे.

योगाची अष्टांगे एका नामस्मरणातच आहेत असे योगसूत्रांच्या ''ईश्वर प्रणिधानाद्वा'' याचा अर्थ २८ व्या सूत्रांत **''तज्जप: तदर्थभावनम्''** असाच केला आहे. याच ग्रंथात/दर्शनात, समाधि पादाच्या ३२ व्या सूत्रात ''एकतत्त्वाभ्यास'' पतंजलींनी सांगितला आहे. श्री ज्ञानराज माऊली हरिपाठाच्या २६ व्या अभंगात **''एकतत्त्व नाम''** असे सांगतात. सगुण का निर्गुण, ब्रह्म-माया, पंचीकरण या आणि इतर सर्व घटपटादि खटपटी सर्वांनाच साध्यत नाहीत म्हणून माऊली म्हणाली, **''वायां तू दुर्गमा न घालीं मन।''**

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी **''देवाचिये द्वारी''** पासून ते **''समाधि संजीवन हरिपाठ''**

येथपर्यंत हरिनामस्मरणाचा संदेश देत असतानाच त्या नामयोगाच्या मागील तत्त्वज्ञानाची प्रभावळ अगदी सहज सांगितलेली आहे. वरवर ही पार्श्वभूमी सोपी दिसली तरी त्यातला गूढार्थ सहजासहजी लक्षात येणे तसे अवघडच आहे.

नामस्मरणाचे महात्म्य श्रोत्यांच्या, पाठकांच्या, वाचकांच्या, चिंतकांच्या अंत:करणात ठसवताना झालेली माऊलींची शब्दयोजना अत्यंत प्रासादिकच आहे. त्या प्रत्येक शब्दा-शब्दातील रहस्य कसे उघडे गुपित आहे हे वै. प.पू. गुरुवर्य मामासाहेब दांडेकरांच्यासारख्या अधिकारी महात्म्यांच्या मुखांतून थोडे फार का होईना लक्षी आले, त्याचाच शब्द-वाक्य-ओळीरुप आकार म्हणजे हा **"भाष्य प्रकाश"**.

नामयोगाचा पुरस्कार करतानासुद्धा श्री ज्ञानेश्वर महाराज भगवद्पूज्यपाद श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी मंडीत केलेला **"कैवलाद्वैत"** सिद्धांत विसरलेले नाहीत. आचार्यांचा वेदान्त विचार तोच सर्व भागवत धर्म सांगणाऱ्या-आचरणाऱ्या सर्व संतांचा विचार.

महाभारत-भागवताचे संक्षिप्त स्वरुप म्हणजे जशी "श्रीमद् भगवद् गीता", दासबोधाचा जसा मनोबोध अगदी तसाच हा ग्रंथराज ज्ञानेश्वरीचा हरिपाठ.

**"हरिपाठ"** ही मराठी भाषेतील पारमार्थिक-अध्यात्मिक वाङ्मयातील एक तेजस्वी-ओजस्वी "हिरकणी" आहे. प्रेमलक्षणापूर्वक नामस्मरणप्रधान भक्तिमार्गावरची तो एक प्रधान दीपस्तंभच आहे. **"हरि-हरि"** असं म्हणल्यानी **"पुण्याची गणना कोण करी।"** असा झंकार करणारी ही मधूर वीणाच आहे. या लहानशा पण अर्थाने प्रचंड असणाऱ्या प्रकरण ग्रंथात श्री ज्ञानराज माऊलींनी आपले सारे अद्वैत तत्त्वज्ञान,अनुभवाच्या-स्वानुभवाच्या ओगराळ्यातून साररुपाने सर्वांच्या पात्रात भरभरून ओतलेले आहे.

नामचिंतनात त्या करुणापारावर, परमदयाघन, परमप्रेमस्वरुप श्री पांडूरंगाच्या कृपेमुळे रंगून गेलो. हरिपाठावरील हे विवरण मानसकन्या चि. सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णीला दोन वर्षात १०८ पत्रद्वारा पाठवले. तिने ती पत्रे धनापेक्षाही जास्त काळजीपूर्वक जतन केली. स्नेही श्री. बापू भिडे, मानसकन्या, भगिनी चि. सौ. उषाताई, थावरे काका (श्री. पं. का. थावरे), जामात श्री. गुरुनाथ कुलकर्णी, मानसपुत्र-उद्योगपती शहाजीराव जगदाळे, चि. विजय नावंधर आणि किती-किती जणांच्या प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहकार्याने हा ग्रंथ प्रकाशीत होत आहे.

चि. समीर व चि. सागर गद्रे बंधू, कोल्हापूर, श्री. अशोक चव्हाण मुद्रक, कोल्हापूर यांच्या प्रचंड सहाय्याने हे छपाईचे काम मोठ्या प्रेमादराने व सुबकपणे पार पडले, ते पण

धंदा न करता, ना नफा - ना तोटा, अतिशय माफक दरात. नावे तरी कुणाकुणाची आठवणार ? त्यातले कुणाकुणाचे, कसे-कसे कौतुक करावे तेवढे थोडेच !!!

तरी पण, सर्वश्री बापू भिडे, प्रस्तावना लेखक श्री. ह.भ.प. पं. का. थावरे, प्रकाशिका चि. सौ. प्रज्ञा कुलकर्णी व श्री. गुरुनाथ कुलकर्णी (मानसजामात) व कोल्हापूरकर श्रोते यांचा उल्लेख केल्याशिवाय लेखणी थांबावयासच तयार नाही.

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराजांच्या संजीवन समाधि सोहळ्याच्या पवित्र, परमपावन स्मरणदिवशी हा ग्रंथ अलंकापुरात श्री. ज्ञानराजांच्या चरणी माथा नम्र करून, सादर, सप्रेम, सविनय समर्पित करून या ग्रंथाचा प्रकाशन सोहळा संपन्न होत आहे. केवढा आनंद आहे ? ही प्रेमापोटी झालेली वाङ्मयीन पूजा होत असताना ? शब्दच नाही पुरत सांगायला. हं, आणखी एक राहिलंय, त्यांना कुणालाच आवडत नाही तरी पण या ग्रंथ प्रकाशनासाठी ज्यांनी ज्यांनी आर्थिक सहाय्य करून आपल्या ग्रंथाच्या प्रती नोंदवल्या त्यांच्या सहाय्याला मोलच नाही, अमूल्य सहकार्य. त्याच खूपच ठिकठिकाणच्या प्रेमळ, रसज्ञ, भाविक, उदारधी श्रोत्यांचा सहभाग. विशेषत: कोल्हापूर, सांगली, पुणे येथील श्रोत्यांनी तर सहकार्याची जणू ढगफुटीच केली. त्यांची नावे जाहिर करण्यास त्यांची मनाई. त्यांच्याबद्दल लिहिण्यास शब्दच नाहीत. या ग्रंथसिद्धिचे सगळे श्रेय प्रत्यक्ष श्री पांडुरंगाने त्यांना कधीच दिलेले आहे.

या हरिपाठ-प्रकाशाने **''हरि-हरि''** स्मरणावरील श्रद्धा, भक्ति, प्रेम उत्तरोत्तर दृढ व्हावे आणि रम्य-समाधानाने संजीवक-सम्यक समाधि सुखरुपतेची अनुभूती **''हरि-हरि''** म्हणताना यावी हीच श्री पांडुरंग चरणी माथा टेकून प्रार्थना.

श्री क्षेत्र अलंकापूर — संतचरणरज:कण अलंकृत,

कार्तिक शु॥ १, शके १९३५

दि. ०४/११/२०१३

**आनंद रामचंद्र तथा आनंदाण्णा घाणेकर**

**प्रकाशकाचे मनोगत -**

॥श्रीराम॥

सश्रद्ध, भगवद्भक्त वाचकहो ! नमस्कार !

**तो चालते ज्ञानाचे बिंब। तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ।**

**परी माणुसपणाची भांब। लौकिक भागु॥ज्ञानेश्वरी अ. १०-७७**

वरील वर्णन ज्यांना तंतोतंत लागू पडते ते माझे मानलेले पिता व मंत्रगुरु (दीक्षागुरु) असे **प.पू.ह.भ.प. अण्णा घाणेकर** यांनी शब्दबद्ध केलेले संतशिरोमणी ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठावरील भाष्य **''हरिपाठ-भाष्य-प्रकाश''** या नामाभिधानाने अलंकृत असा सर्वांग-परिपूर्ण ग्रंथ प्रकाशिका या नात्याने आपल्या हाती देताना मला अत्यानंद होत आहे.

काही वेळेला आपल्यापैकीच असलेल्या व्यक्तीच्या भाग्याचा हेवा वाटावा असा माझ्या या भाग्याचा हेवा वाटावा असा हा क्षण आहे.

ज्ञानदेवांचा हा केवळ २७ अभंगांचा छोटेखानी ग्रंथ अत्यंत मौल्यवान असा आहे. **''आंगें सानें परिणामें थोरु। जैसे गुरुमुखींचे अक्षरु। तैशी अल्पीं जिहीं अपारु। तृप्ती राहे॥ (ज्ञानेश्वरी-अ. १७-१२९)** हे सात्त्विक आहाराचे जसे वर्णन तसेच योग्यतेच्यादृष्टीने या हरिपाठाबद्दल म्हणता येईल.

मला नामस्मरणाची जसजशी गोडी लागत गेली तसतसे माझे समाधान वृद्धिंगत होऊ लागले व वृत्तीही बदलत गेली. माझ्यातील हा बदल पाहून माझी पुढील पायरीकडे वाटचाल व्हावी म्हणून पत्रांद्वारे प.पू. अण्णांनी प्रत्येक अभंगावर विवरण सुरू केले. त्या पत्रांचा संग्रह म्हणजेच हा ग्रंथ !

या ग्रंथाच्या अंतरंगातील वैशिष्ट्यांबद्दल आमचे स्नेही ह.भ.प. थावरे काका यांनी सोबतच्या प्रस्तावनेत सविस्तर लिहिले आहेच. शिवाय आपणही हा ग्रंथ सावकाश व एकाग्र चित्ताने वाचावा अशी माझी आपणास विनंती आहे.

एक गोष्ट येथे आवर्जून नमूद केली पाहिजे. माझ्या या वाटचालीत माझे सात्त्विक, प्रेमळ पतीराज श्री. गुरुनाथ कुलकर्णी यांचा मोलाचा वाटा आहे. आमचे (माझे सासरचे) घराणे मूळातच संतश्रेष्ठ, नामनिष्ठ गोंदवलेकर महाराज यांच्या घराण्याशी संबंधीत असे

आहे. लहानपणाच्या संस्कारांमुळे माझ्या पतीराजांचा जन्मत:च अध्यात्माकडे ओढा आहे. माझ्या वाटचालीत त्यांचे मार्गदर्शन, संमती मिळत गेली. ते स्वत: चरितार्थाचा व्यवसाय सांभाळून सामाजिक व धार्मिक कार्यक्रमात हिरीरीने भाग घेतात. त्यांच्यामुळेच मलाही प्रतिष्ठा प्राप्त होत आहे. हे सर्व त्यांच्या सहकार्याचेच फळ म्हणाना !

''**आत्मचिंतन - भाग १ व भाग २**'' यांच्या बरोबरीने प्रस्तुत ग्रंथही आपण वाचनात ठेवावा. त्यातील विचारांवर, प्रमेयांवर चिंतन करावे व आनंद प्राप्त करून घ्यावा.

आपल्या सारख्या सश्रद्ध वाचकांनी दिलेल्या उदंड प्रतिसादाचे फळ म्हणजे हा ग्रंथ ! याचेही आपण स्वागत कराल याची मला खात्री आहे.

आपणा सर्वांस मन:पूर्वक धन्यवाद !

*****

**सौ. प्रज्ञा गुरुनाथ कुलकर्णी**
**''श्रीराम'' ५६१, जोशी गल्ली,**
**गांवभाग, सांगली - ४१६ ४१६**
**फोन नं. : (०२३३)२३३२५८०**

**प्रस्तावना -**

## ।।समाधी संजीवन हरिपाठ।।

हरिगुरुभक्ती परायण प.पू. अण्णा घाणेकर यांच्या आजपर्यंतच्या स्वाध्याय, मनन, चिंतन, निदीध्यास यांवर आधारलेला "**हरिपाठ-भाष्य-प्रकाश**" हा तिसरा ग्रंथ होय. गेल्या दोन-अडीच वर्षात यापूर्वीचे दोन ग्रंथ**आत्मचिंतन भाग-१ व भाग-२** प्रकाशित झाले व त्या दोहोंनाही श्रद्धावान भगवद्भक्तांची उदंड मान्यता लाभली. त्या दोन ग्रंथांविषयी थोडेसे -

**सिंहावलोकन :- आत्मचिंतन भाग-१ व भाग-२ -**

प.पू. अण्णांनी गेल्या अनेक वर्षात आपली मानसकन्या सौ. प्रज्ञा कुलकर्णी-सांगली हिला वेळोवेळी प्रसंगानुरुप व उत्फूर्तपणे लिहिलेल्या चिंतनयुक्त स्फुट पत्रांचा हे दोन ग्रंथ म्हणजे संग्रह होय. अनेक अध्यात्मिक विषयांचा यात समावेश आहे. एकाच विषयावरील हे चिंतन नसले तरी वाचनीय व संग्राह्य असे आहे. या दोन्ही ग्रंथांच्या प्रती अजून उपलब्ध आहेत.

**हरिपाठ-भाष्य-प्रकाश :-**

संत शिरोमणी ज्ञानेश्वर महाराज यांच्या हरिपाठातील प्रत्येक अभंगावरील हे अति-विस्तृत असे विवेचन आहे. हरिपाठ, ज्ञानेश्वरी व "**राम-कृष्ण-हरि**"चे स्मरण हेच प.पू. अण्णांचे जीवन आहे. माऊलींनी पसायदानात अखेरीस एक प्रसाद श्रीगुरुंकडून मागितला आहे.

**आणि ग्रंथोपजीविये। विशेषीं लोकी इये।**
**दृष्टादृष्टविजये। होआवे जी।। ज्ञानेश्वरी अ. १८-१८०१**

वर उल्लेखिलेल्या ग्रंथांचे पारायण, मनन, चिंतन, प्रसार हीच ज्यांची मुख्य जीवन-वाटचाल आहे ते लौकिकात व अलौकिकात मान्यता पावोत, असा याचा अर्थ. ती मान्यता प.पू. अण्णांना प्राप्त झाली आहे.

वारकरी पंथामध्ये ज्ञानेश्वर महाराज व एकनाथ महाराज यांनी रचलेले हरिपाठ अधिक प्रचलीत आहेत. माऊलींच्या हरिपाठावर आधारलेले अनेक माऊलीभक्तांचे विवरण ग्रंथ आज उपलब्ध आहेत. परंतु -

**अहो गुळा साखरे मालयाचे। हे बांधे तरी एकाची रसाचे।**

**परी स्वाद गोडीयेचे। आन आन जैसे।। ज्ञानेश्वरी**

गुळ, साखर व काकवी हे ऊसाच्या रसापासूनच तयार होत असले तरी प्रत्येकाची गोडी, स्वाद एक-दुसऱ्याहून न्याराच ना ! तद्वत् प.पू. अण्णांचे हे भाष्य आगळेवेगळे आहे. या ग्रंथातील ठळक वैशिष्ट्ये आता आपण पाहू -

१) हरिपाठातील २७ अभंगांपैकी पहिल्या नऊ अभंगांवरच १०६ पृष्ठांचा प्रपंच आहे. नंतर हे प्रमाण कमी होत गेले आहे. याचा परिणाम असा की, सुरुवातीलाच याचे वैभव प्रगट झाले आहे.

२) अभंगाच्या प्रत्येक चरणाचा गूढार्थ उलगडून दाखविला आहे. त्यासाठी संतवचने, उपनिषदे, पुराणे यातील असंख्य प्रमाणांची रेलचेल आहे. विवेचनासाठी अभंगातील एकही पद गाळले नाही व पदरचे काही मिसळले नाही. माऊलींच्या अभंगांतील पदांना स्पष्टीकरणासाठी वास्तविक अन्य प्रमाणांची आवश्यकता आहेच असे नाही. परंतु जसे -

**नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं। सानीव धरुनि आंगी।**

**पुराणें आख्यानरुपें जगीं। भारता आली। ज्ञानेश्वरी अ. १-४६**

वरील प्रमाणांना प्रस्तुत ग्रंथरुपाने प्रतिष्ठाच प्राप्त झाली आहे.

३) मुळात हरिपाठ सत्त्वगुणी, त्यात संतवचनें, उपनिषदातील प्रमाणे - तीही चपखलपणे म्हणजे मसाला दुधात साखरच !

४) प्रत्येक अभंगाच्या विवरणाचेवेळी जशी भगवन्निष्ठा जागोजागी आढळते तेवढेच मूल्य गुरुनिष्ठेला देऊन भगवंत व गुरु यांचे ऐक्य प्रतिपादन केले आहे.

या ग्रंथाची अशी अनेक वैशिष्ट्ये सांगता येतील. काही निवडक अभंगातील चिंतनीय अशी वचनें पहा -

**१) अभंग क्र. ८ :-** मुखाने नाम व अंत:करणात (भगवंताच्या रुपाचे) स्मरण हीच ज्ञानराज सर्वश्रेष्ठ अशी वेद-पाठशाळा म्हणतात. (**पैं अहितापासूनी काढिती। हित देऊनी वाढविती। नाही गा श्रुतीपरौती। माऊली जगा॥** ज्ञानेश्वरी (श्रुती म्हणजेच वेद !)

**२) अभंग क्र. ९ :-** एक हरिभक्ती हीच ज्ञानोत्पादक तशीच ज्ञानसंरक्षक आहे. (वेद, शास्त्रे, पुराणे यांचा केवळ अभ्यास हे शब्दज्ञान, अनुभवजन्य ज्ञान नव्हे !) (**तैसा चित्तीं अहंते ठावो। आणि जिभे सकळ शास्त्रांचा सरावो। ऐसेन कोडी एक जन्म जावो। परी न पविजे माते॥** ज्ञानेश्वरी अ. १५-३९६)

**३) अभंग क्र. १८ :-** मनाला भगवन्नामाची गोडी लावली की ते भगवंताच्या ठायीच स्थिर होते. (**ऐशी लाविली गोडी चढोवडी। तेणे झाली नवल परवडी। मज सोडीताही ते गोडी। गोडी न सोडी मज लागीं॥** ए.भा.)

यासारखी अनेक चिंतनीय स्थळें ग्रंथात आढळतात. हे या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य !

अमृताचे आरोगण कितीही केले तरी तृप्ती होत नाही, त्यानुसारच प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने, मननाने तृप्ती होत नाही.

या प्रस्तावनेच्या निमित्ताने एक मुद्दा ठळकपणे मांडावासा वाटतो. या हरिपाठातील अंतीम क्र. २६ व २७ हे दोन अभंग म्हणजे ''कळस'' आहेत. यांचे विवरण अधिक विस्तारपूर्वक झाले असते तर ग्रंथवाचनाचा आनंद द्विगुणीत झाला असता. (ही टीका किंवा त्रुटी नव्हे तर रास्त अपेक्षा!)

या ग्रंथाविषयी असे भरभरून लिहिता येईल परंतु शेवटी प्रस्तावना या सदराच्या मर्यादा पाळणे शिष्टसंमत आहे. ''नामस्मरण'' हा हरिपाठाचा मुख्य विषय आहे. तेव्हा संतश्रेष्ठ एकनाथ महाराजांच्या प्रमाणांनी लेखणीला विराम देऊ.

**असो न टके माझें ध्यान। तैं सोपा उपाव आहे आन।**

**माझें करिता नामकीर्तन। विघ्ननिर्दळण, हरिनामें।। ए.भा. अ. २८-६१६**

**जेथ नामाचा घडघडाट। तेथ उपसर्गा न चले वाट।**

**महाविघ्नांचा कडकडाट। करी सपाट, हरिनामें।। ए.भा. २८-६१७**

**ऐकोनि नामाचा गजर। पळे पातकांचा संभार।**

**नामापाशी पापाचा थार। अणुमात्र असेना।। ए.भा. अ. २८-३८८**

हा एक अपूर्व, परिपूर्ण असा ग्रंथ अध्यात्माचे, उपासनेचे सार आहे. याची थोरवी वर्णावी तेवढी थोडीच !

**।। हरिः ॐ तत्सत्।।**

*****

**पं. का. थावरे**
**'सच्चिदानंद', दत्तनगर,**
**गल्ली क्र. १, पाचगांव,**
**कोल्हापूर - ४१६ ०१३**
**मोबा. नं. - ९८८१५०९८४२**

# श्री ज्ञानेश्वर कृत हरिपाठ

- अभंग १ -

देवाचिये द्वारी उभा क्षणभरी। तेणे मुक्ती चारी साधियेल्या॥१॥
हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा। पुण्याची गणना कोण करी॥२॥
असोनि संसारी जिव्हे वेगु करी। वेदशास्त्र उभारी बाह्या सदा॥३॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणे। द्वारकेचा राणा पांडवा घरी॥४॥

- अभंग २ -

चहूं वेदी जाण साही शास्त्री कारण। अठराही पुराणे हरिसी गाती॥१॥
मंथुनी नवनीता, तैसे घे अनंता। वायां व्यर्थ कथा सांडी मार्गु॥२॥
एक हरी आत्मा, जीवशिवसमा। वायां तू दुर्गमा न घाली मन॥३॥
ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ। भरला घनदाट हरि दिसे॥४॥

- अभंग ३ -

त्रिगुण असार, निर्गुण हे सार। सारासार विचार हरिपाठ॥१॥
सगुण निर्गुण गुणाचे अगुण। हरिविण मन व्यर्थ जाय॥२॥
अव्यक्त निराकार नाही ज्या आकार। जेथोनि चराचर हरिसी भजे॥३॥
ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी। अनंत जन्मांनी पुण्य होय॥४॥

- अभंग ४ -

भावेविण भक्ति, भक्तिविण मुक्ति। बळेविण शक्ति, बोलू नये॥१॥
कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित। उगा राहे निवांत, शिणसी वाया॥२॥
सायास करिसी, प्रपंच दिननिशी। हरिसी न भजसी कवण्या गुणे॥३॥
ज्ञानदेव म्हणजे हरिजप करणे। तुटेल धरणे प्रपंचाचे॥४॥

- अभंग ५ -

योग-याग-विधि येणे नोहे सिद्धि। वायाचि उपाधि दंभधर्म॥१॥
भावेविण देव, न कळे निःसंदेह। गुरुविण अनुभव कैसा कळे॥२॥

तपेविण दैवत, दिधल्याविण प्राप्त। गुजेविण हित कोण सांगे॥३॥
ज्ञानदेव सांगे दृष्टांताचि मात। साधूंचे संगती तरणोपाय॥४॥

- अभंग ६ -

साधुबोध झाला, तो नुरोनिया ठेला। ठायीच मुराला अनुभव॥१॥
कापुराची वाती, उजळली ज्योति। ठायीच समाप्ती झाली जैसी॥२॥
मोक्षरेखे आला, भाग्ये विनटला। साधूंचा अंकिला हरिभक्त॥३॥
ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी। हरि दिसे जनी वनी आत्मतत्त्वी॥४॥

- अभंग ७ -

पर्वताप्रमाणे पातक करणे। वज्रलेप होणे अभक्तांसी॥१॥
नाही ज्यासी भक्ति, तो पतित अभक्त। हरिसी न भजत, दैवहत॥२॥
अनंत वाचाळ, बरळती बरळ। त्यां कैसेनि गोपाळ पावे हरी॥३॥
ज्ञानदेवा-प्रमाण आत्मा हा निधान। सर्वांघटी पूर्ण एक नांदे॥४॥

- अभंग ८ -

संतांचे संगती, मनोमार्गे गती। आकळावा श्रीपती येणे पंथे॥१॥
रामकृष्ण वाचा, भाव हा जिवाचा। आत्मा जो शिवाचा राम जप॥२॥
एकतत्त्व नाम, साधिती साधन। द्वैताचे बंधन न बाधिजे॥३॥
नामामृत गोडी, वैष्णवा लाधली। योगिया साधली जीवनकळा॥४॥
सत्वर उच्चार प्रल्हादी बिंबला। उद्धवा लाधला कृष्णदाता॥५॥
ज्ञानदेव म्हणे, नाम हे सुलभ। सर्वत्र दुर्लभ, विरळा जाणे॥६॥

- अभंग ९ -

विष्णुवीण जप, व्यर्थ त्याचे ज्ञान। रामकृष्णी मन नाही ज्याचे॥१॥
उपजोनी करंटा, नेणे अद्वैत वाटा। रामकृष्णी पैठा कैसा होय ?॥२॥
द्वैताची झाडणी, गुरुविण ज्ञान। तया कैचे कीर्तन घडे ? नामी॥३॥
ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान। नामपाठ मौन प्रपंचाचे॥४॥

- अभंग १० -

त्रिवेणी संगमी नाना तीर्थे भ्रमी। चित्त नाही नामी, तरी ते व्यर्थ॥१॥
नामासी विन्मुख तो नर पापिया। हरिवीण धावया न पवे कोणी॥२॥
पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मिक। नामे तिन्ही लोक उद्धरती॥३॥
ज्ञानदेव म्हणजे नाम जपा हरीचे। परंपरा त्याचे कुळ शुद्ध॥४॥

- अभंग ११ -

हरि उच्चरणी अनंत पापराशी। जातील लयासी क्षणमात्रे॥१॥
तृण अग्निमेळे समरस झाले। तैसे नामे केले जपता हरी॥२॥
हरि उच्चारण मंत्र हा अगाध। पळे भूतबाधा भेणे तेथे॥३॥
ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ। न करवे अर्थ उपनिषदा॥४॥

- अभंग १२ -

तीर्थ व्रत नेम भावेविण सिद्धि। वायांचि उपाधि करिसी जना॥१॥
भावबळे आकळे, एऱ्हवी नाकळे। करतळी आवळे तैसा हरी॥२॥
पारियाचा रवा घेत भूमीवरी। यत्न परोपरी साधन तैसे॥३॥
ज्ञानदेव म्हणजे निवृत्ति निर्गुण। दिधले संपूर्ण माझ्या हाती॥४॥

- अभंग १३ -

समाधि हरीची समसुखेवीण। न साधेल जाण द्वैतबुद्धी॥१॥
बुद्धीचे वैभव अन्य नाही दुजे। एका केशवराजे सकळ सिद्धि॥२॥
ऋद्धि-सिद्धि निधी अवघीच उपाधि। जव त्या परमानंदी मन नाही॥३॥
ज्ञानदेवा रम्य रमले समाधान। हरीचे चिंतन सर्वकाळ॥४॥

- अभंग १४ -

नित्य सत्यमित हरिपाठ ज्यासी। कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी॥१॥
रामकृष्ण उच्चार, अनंत राशी तप। पापाचे कळप पळती पुढे॥२॥
हरि, हरि, हरि हा मंत्र शिवाचा। म्हणती जे वाचा, तया मोक्ष॥३॥

ज्ञानदेवा पाठ, नारायण नाम। पाविजे उत्तम निजस्थान॥४॥

- अभंग १५ -

एक नाम हरी द्वैत नाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे॥१॥
समबुद्धी घेता, समान श्रीहरि। शम दमा वरी हरी झाला॥२॥
सर्वा घटी राम, देहादेही एक। सूर्य प्रकाशक सहस्त्र-रश्मी॥३॥
ज्ञानदेवा चित्ती हरिपाठ नेमा। मागिलिया जन्मा मुक्त झालो॥४॥

- अभंग १६ -

हरि बुद्धी जपे तो नर दुर्लभ। वाचेसी सुलभ रामकृष्ण॥१॥
रामकृष्णनामी उन्मनी साधली। तयासी लाधली सकळ सिद्धी॥२॥
सिद्धी बुद्धि धर्म हरिपाठी आले। प्रपंची निवाले साधुसंगे॥३॥
ज्ञानदेवी नाम रामकृष्णठसा। येणे दशदिशा आत्माराम॥४॥

- अभंग १७ -

हरिपाठ कीर्ति मुखे जरी गाय। पवित्रचि होय देह त्याचा॥१॥
तपाचे सामर्थ्ये तपिन्नला अमूप। चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे॥२॥
मातृपितृभ्राता सगोत्र अपार। चतुर्भुज नर होऊनि ठेले॥३॥
ज्ञानगूढगम्य ज्ञानदेवा लाधले। निवृत्तीने दिधले माझे हाती॥४॥

- अभंग १८ -

हरिवंशपुराण, हरिनाम संकीर्तन। हरिवीण सौजन्य नेणे काही॥१॥
तया नरा लाभले वैकुंठ जोडले। सकळही घडले तीर्थाटन॥२॥
मनोमार्गे गेला, तो येथे मुकला। हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य॥३॥
ज्ञानदेवा गोडी, हरिनामाची जोडी। रामकृष्ण आवडी सर्वकाळ॥४॥

- अभंग १९ -

वेदशास्त्र प्रमाण, श्रुतीचे वचन। एक नारायण सार जप॥१॥
जप तप कर्म, हरिवीण धर्म। वाऊगाचि श्रम व्यर्थ जाय॥२॥

हरिपाठी गेले, ते निवांतचि ठेले। भ्रमर गुंतले सुमनकळिके॥३॥
ज्ञानदेवा मंत्र, हरिनामाचे शस्त्र। यमे कुळगोत्र वार्जियेले॥४॥

- अभंग २० -

नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी। पापे अनंत कोडी गेली त्यांची॥१॥
अनंत जन्मांचे तप एक नाम। सर्व मार्ग सुगम हरिपाठ॥२॥
योग याग क्रिया धर्माधर्म माया। गेले ते विलया हरिपाठी॥३॥
ज्ञानदेवी यज्ञ याग क्रिया धर्म। हरिविण नेम नाही दुजा॥४॥

- अभंग २१ -

काळ वेळ नाम उच्चारिता नाही। दोन्ही पक्ष पाही उद्धरती॥१॥
रामकृष्णनाम सर्व दोषां हरण। जडजीवा तारण हरि एक॥२॥
नाम हरि सार जीव्हा या नामाची। उपमा त्या दैवाची कोण वानी॥३॥
ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ। पूर्वजा वैकुंठ-मार्ग सोपा॥४॥

- अभंग २२ -

नित्य नेम नामी ते प्राणी दुर्लभ। लक्ष्मीवल्लभ तयाजवळी॥१॥
नारायण हरि, नारायण हरि। भुक्ति, मुक्ति चारी घरी त्यांच्या॥२॥
हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा। यमाचा पाहुणा प्राणी होय॥३॥
ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड। गगनाहूनि वाड नाम आहे॥४॥

- अभंग २३ -

सात पांच तीन दशकांचा मेळा। एक तत्त्वी कळा दावी हरी॥१॥
तैसे नव्हे नाम, सर्वमार्गा वरिष्ठ। तेथे काही कष्ट न लागती॥२॥
अजपा जपणे उलट प्राणाचा। तेथेही मनाचा निर्धारु असे॥३॥
ज्ञानदेवा जिणे नामेवीण व्यर्थ। रामकृष्ण पंथ क्रमीयेला॥४॥

- अभंग २४ -

जपतप कर्म क्रिया नेम धर्म। सर्वाघटी राम भावशुद्ध॥१॥
न सोडी रे भावो, टाकी रे संदेहो। रामकृष्णी टाहो नित्य फोडी॥२॥

जात वित्त गोत कुळशीळ मात। भजे का त्वरित भावनायुक्त॥३॥
ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी। वैकुंठ भुवनी घर केले॥४॥

- अभंग २५ -

जाणीव नेणीव भगवंती नाही। हरि उच्चारणी पाही मोक्ष सदा॥१॥
नारायण हरी उच्चार नामाचा। तेथे कळिकाळाचा रीघ नाही॥२॥
तेथील प्रमाण नेणवे वेदांसी। ते जीवजंतूंसी केवी कळे॥३॥
ज्ञानदेवा फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ केले असे॥४॥

- अभंग २६ -

एकतत्व नाम दृढ धरी मना। हरीसी करूणा येईल तुझी॥१॥
ते नाम सोपे रे रामकृष्ण गोविंद। वाचेसी सद्‌गद जपे आधी॥२॥
नामापरते तत्व नाही रे अन्यथा। वायां आणिका पंथा जाशी झणी ॥३॥
ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरी। धरोनी श्रीहरि जपे सदा॥४॥

- अभंग २७ -

सर्व सुख गोडी, साही शास्त्र निवडी। रिकामा अर्धघडी राहू नको॥१॥
लटिका व्यवहार, सर्व हा संसार। वाया येरझार हरिवीण॥२॥
नाममंत्र जप कोटि जाईल पाप। कृष्णनामी संकल्प धरूनि राहे॥३॥
निजवृत्ति काढी सर्व माया तोडी। इंद्रिया सवडी लपो नको॥४॥
तीर्थ व्रती भाव धरी रे करूणा। शांति दया पाहुणा हरि करी॥५॥
ज्ञानदेवा प्रमाण निवृत्ति देवी ज्ञान। समाधि संजीवन हरिपाठ॥६॥

* * * * *

# अभंग क्र. १

**देवाचिये द्वारी उभा क्षणभरी। तेणे मुक्ती चारी साधियेल्या॥१॥**
**हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा। पुण्याची गणना कोण करी॥२॥**
**असोनि संसारी जिव्हे वेगु करी। वेदशास्त्र उभारी बाह्या सदा॥३॥**
**ज्ञानदेव म्हणे व्यासचिये खुणे। द्वारकेचा राणा पांडवा घरी॥४॥**

श्रीगुरु ज्ञानराजांचा "हरिपाठ", केवळ फक्त सत्तावीस अभंगच; पण ते सगळेच्या सगळे अल्पाक्षररमणीय; अगदी सूत्ररुप, अखिल मानवमात्रास कल्याणप्रद आणि त्याचबरोबर अत्यंत प्रासादिक. श्री ज्ञानेश्वर माऊलीच्या शब्दात सांगायचे म्हटलं तर -

**"जैसे बिंब तरी बचके एवढे। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडे।"** तसाच हा हरिपाठ छोटासा ग्रंथ (अर्थाने नव्हे तर अभंग संख्येच्या दृष्टीने) पण यातील "**शब्दाची व्याप्ती तेणे पाडे अनुभवावी**". "**दीप कळिका धाकुटी। परि बहुं तेजाते प्रकटी।**" अगदी तसाच हा माऊलीचा हरिपाठ. जशी माऊली बाळाला घास घालते तसाच या विश्वमाऊलींनी अवघ्या बाळांना भरवलेला मऊ-मऊ तूप-वरण-भाताचा घासच बघा !

या हरिपाठाला वारकऱ्यांची "संध्या" असे म्हणतात. यावरूनच याची नित्यता, सार्वत्रिकता, पवित्रता, मंत्ररुपता, महनीयता दृग्गोचर होते पहा ! "**अवघड कोणी न करी सांगता। सुलभ बहुतां गोड वाटे॥**" श्री तुकोबाराय म्हणतात ते अगदी खरं नां !!! वै.प.पू. गुरुवर्य मामा म्हणायचे, "औषध हवे पण ते न मागता, घर बसल्या, गोड-रुचकर, पथ्याची कटकट नाही, घ्यायला सोपं आणि फुकट!" तसंच "साधन" अगदी सोपं हवं. म्हणाले, "सुलभ गोमटे।"

याच वरील मानवी मनाची खोड लक्षात घेऊन याच तत्त्वाला अनुसरून, "ज्ञानियांच्या राजांनी" या ग्रंथाची रचना अत्यंत सुलभ साधली आहे. पण

त्यात सुलभतेबरोबरच आकाशापेक्षा जास्त व्यापक अर्थही भरलेला आहे. अर्थाच्या विचारांच्या दृष्टीने या छोट्या रचनेस ''उपनिषदांची'' योग्यता लाभली आहे.

हरिपाठाची भाषा सोपी, अर्वाचीन वाटते खरी पण एवढ्याशा हरिपाठात ४ वेद, ६ शास्त्रे, १८ पुराणे, अकारादि, प्रकरणादि सर्वच्या सर्व ग्रंथांचे सार, नव्हे नव्हे तर साराचेही सार आले आहे. भाषा ज्ञानराजांच्या इतर ग्रंथातील भाषेपेक्षा सोपी वाटते याचे एक कारण असे सांगतात की, माऊलींनी **संजीवन** समाधी घेतल्यावर (समाधिस्थ झाल्यावर) ३०० वर्षांनी श्री एकनाथ महाराज त्यांच्या दर्शनासाठी आले, **आळंदीस**. तेव्हा समाधिस्थानी दर्शन झाल्यानंतर ज्ञानराजांनी प्रसाद भेट म्हणून नाथराजांना हा ''हरिपाठ'' दिला.

हा ग्रंथ सोपा असला तरी ब्रह्मप्रतिपादकच आहे हं !!! ''**हरि**'' हे पदच ब्रह्मवाचक आहे. ''**हरे: पाठ: हरिपाठ:**'' म्हणजे हरिउच्चारण. जसे वेदपाठ म्हणजे वेदमंत्रांचा उच्चार तसेच हरिपाठ म्हणजे हरीचे उच्चारण. आता हरीचे म्हणजेच ''**हरिनामाचे**'' म्हणून ''हरिनाम्न: पाठ: हरिपाठ:।'' हरिनामाचे उच्चारण. म्हणूनच या हरिपाठातील अभंगसंहितेचे पठण केले असता हरिनामाचे पठण अगदी आपोआप होते आणि म्हणूनच ''हरे: पाठो येन इति हरिपाठ''. ज्या साधनाने हरीचे पठण आपोआप होते तो असा हा ''**हरिपाठ**''. केवळ हरिनामच नाही, तर श्रीहरिविषयक सर्वच्या सर्व उपदेश ज्यात आहे असा सर्वगुणसंपन्न असा हा ''**हरिपाठ**''. ''हरे: पाठो यस्मिन'' तो हा हरिपाठ. **पाठ** म्हणजे नुसते पठणच नाही तर शिक्षणदेखील. म्हणून हरीच्या यथार्थ स्वरूपाचे दिक्‌दर्शन-द्योतन करणारा, शिक्षण देणारा, **हरि** समजावून देणारा असा ग्रंथ म्हणजेच ज्ञानराजांचा हरिपाठ.

या छोटेखानी ग्रंथात माऊलींनी हरिपठणाचा उपदेश केला आहे. ध्रुवपदच सगळ्याच्या सगळ्या अभंगांचे एकच एक आहे, ''**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा**''. पण असं काय महत्त्व आहे, महात्म्य आहे या **हरिनामाचे** व त्याच्या पठणाचे म्हणजेच उच्चाराचे ???

काय गौरव आहे पहा नामाचा, **''हरेर्नाम, हरेर्नाम हरेर्नामैव केवलम्। कलौ नास्त्येव नास्त्येव नास्तेव गतिरन्यथा''**। असा भगवत्‌नामाचा गौरव श्री व्यासांनी-महामती अशा व्यासांनी केला आहे. कलियुगात गति म्हणजे मुक्ती प्राप्त होण्यास या हरिनामोच्चारणाशिवाय अन्य दुसरा उपायच नाही. अगदी खरी गोष्ट.

**''ध्यायन्कृते, यजन् यज्ञै-स्त्रेतायां; द्वाप्यापे अर्चनम। यदाप्नोति तदाप्नोति, कलौ संकीर्त्य केशवम्॥** कृतयुगात ध्यानाने, त्रेतायुगात यज्ञाने, द्वापारयुगात अर्चन म्हणजे पूजनाने जे फल प्राप्त होते तेच फल कलियुगात केशवाच्या संकीर्तनाने प्राप्त होते. श्रीविष्णुसहस्त्रनामातील **''एष ते सर्वधर्माणां धर्मोऽधिकतो मत:।''** या वचनावरील भाष्यात आद्य शंकराचार्य म्हणाले, **''सकलपापक्षयहेतूभूत''** व **''सकलसाधन पुरुषार्थसाधनभूत''** असे **नामा**सारखे दुसरे साधनच नाही. सर्व यज्ञ-दान-तपादी साधनामधील न्यून एक **नामानेच** परिपूर्ण होते. **''यस्य स्मृत्थाच नामोवस्था तपोयज्ञक्रियदिषु। न्यून संपूर्णता याति सद्योवंदे तमच्युतम॥''** असं परिपूर्ण **नामच** फक्त. अशा नामाचे माहात्म्य सांगणारा असा हरिपाठ आणिक काय सांगू ???

**''आनंदप्राप्ती''** आणि **''दु:खनिवृत्ती''** याचसाठी मनुष्य अवघं जीवनभर विविध मार्गांनी धडपडत असतो पण इतकं करूनसुद्धा त्याचे दु:ख निवारण होतेच असे नाही. तसेच त्याला सुखाचा लाभ होतोच असेही नाही आणि समजा झालेच तरी ते कायमचे नसते.

हरिपाठातून ज्ञानराज आपल्याला कायमची दु:खनिवृत्ती व कायमस्वरुपी सुखप्राप्ती कशाने होते याचा उपाय सांगताहेत. **''हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।''** या उपायाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे, **''सकळांसी येथे आहे अधिकार। कलियुगी उद्धार हरिच्या नामे॥''** पायातील दगड अगर कळस असा भेदभाव-अधिकार-अनधिकाराचा प्रश्नच नाही तर **''सकळांसी''**.

परिपूर्णता एका हरिनामानेच. **''हरि: ॐ''** या भगवंताच्या

नामोच्चाराविना प्रत्यक्ष वेदपठणसुद्धा अपूर्णच आहे. भगवान श्रीहरींनी ब्रह्मदेवास वेद पठविले. मग वेदपठण झाल्यावर श्रीहरीला वेद म्हणून दाखवण्यासाठी ब्रह्मदेव त्याच्याकडे गेले. देवांनी त्याला एका पिंपळाखाली बसवून वेद म्हणण्यास सांगितले. तेव्हा ब्रह्मदेवांनी विचारले, "प्रभो, वेद म्हणण्यात माझी चूक झाल्यास ती मला कशी कळेल ?" देव म्हणाले, "एक चूक झाल्यास पिंपळाचे एक पान तुझ्या अंगावर गळून पडेल." ब्रह्मदेवाने वेद म्हणण्यास आरंभ केला......."अग्निमिळे....." आणि काय झालं ? तर पिंपळाची पानेच पाने पटापट ब्रह्मदेवांच्या अंगावर झाडावरून गळून पडली, पडू लागली. पिंपळवृक्षाचा पार खराटा व्हायचीच पाळी आली. ब्रह्मदेवाला मोठेच आश्चर्य वाटले. देवांना त्याने विचारले तर देव म्हणाले, "वेदारंभी तू 'हरि: ॐ' या भगवत्नामाचा उच्चार न करताच वेदपठणास प्रारंभ केलास. या तुझ्या चुकीमुळे इतकी सारी पाने गळून पडली." यावरून भगवत्नामोच्चाराशिवाय वेदपठणही व्यर्थ आहे. हरिनामाचे माहात्म्य वेदापेक्षाही श्रेष्ठच आहे.

भगवंताला असंख्य नामे आहेत. "हरि" या नामाचा काय इतिहास ? श्रीमद्भागवताच्या द्वितीय स्कंधातील सातव्या अध्यायात, भगवंताने "सुयज्ञ" म्हणून अवतार घेतल्याची कथा आहे आणि या अवतारात या सुयज्ञ भगवंताने तिन्ही लोकांतील मोठमोठी संकटे हरण केली म्हणून मग स्वायंभुवमनूने भगवंताचे त्या अवतारातील "सुयज्ञ" असे नाव असताना 'हरी' म्हणून संबोधिले आणि दु:ख हरण करणारा तो "हरि" म्हणून मग सर्व युगात-काळात तेच रुढ झाले. "लोकत्रयस्थमहतीम अहरत आर्ति: स्वयंभुवन-मनुना 'हरि' इत्युनुवत:" असं श्रीआद्यभाष्य आहे. **'हरि'** या नामाने आपली सगळी दु:खे हरण करणारा जसा 'हरि' आहे तसेच आपली सर्व पापे हरण करणारा म्हणजे पापे नष्ट करणारा हरिच आहे. **सकळ पापाते संहारी। यालागी बोलिजे नामे हरि॥** असं नाथराय म्हणतात.

इतकंच काय, पण आपल्या चित्ताचं चित्तपण हरण करून चित्ताला

आकर्षून घेणारा ''मनोहारी'' हाच आहे. गोपी म्हणाल्या ना !!! ''हरीने माझे हरीले चित्त.'' हरि शब्दातील ''ह'' या धातूचे हर म्हणजे नष्ट करणे, आकर्षून घेणे असे जे दोन अर्थ आहेत तसाच ''ह-हर'' म्हणजे आनंद देणे असापण एक अर्थ आहे. आपल्याला आनंद देणारा ''हरि''च आहे म्हणून हरिच्याच नामाचा सतत पाठ करायचा.

म्हणून हरिचरणी एक विनंती सतत करावी - **हरि-गुरु-संती, नामस्मरणी। प्रेमा वाढो हीच मागणी। रुक्मिणीरमणा हीच विनवणी। आनंदपदी ठेवी माथा।।** आणि या सततच्या विनवणी बरोबर हरिपाठाचे स्मरण-पठण-चिंतन करायचे.

हरिपाठ हा श्री ज्ञानेश्वर महाराजांचा ''**नाममहात्म्य**'' सांगणारा असा ग्रंथ आहे. ग्रंथारंभी मंगल करण्याचा शिष्ट संप्रदाय आहे. मंगलाचे तीन प्रकार आहेत - आशिर्वाद, नमस्कार आणि वस्तुनिर्देश. यापैकी माऊलींनी हरिपाठातील पहिल्याच अभंगाच्या प्रारंभी ''देव'' शब्दाचा प्रयोग करून वस्तुनिर्देशरुप मंगल केले आहे.

देव या शब्दामध्ये ''दिव्'' धातू आहे. याचा अर्थ ''प्रकाशणे'' असा आहे. ''दीव्यति, प्रकाशते इति देव:।'' देव म्हणजे प्रकाश. येथे भौतिक प्रकाश अभिप्रेत नसून, वेदान्तशास्त्रात प्रकाश हा शब्द ज्ञान, संवित्, चित्, स्फूर्ति इत्यादी अर्थांनी उपयोगात आणतात. जेथे ज्ञान-प्रकाश असतो तेथे सत् आणि सुख असते. ''**सत्ताचि सुख प्रकाशु। प्रकाशुचि सत्ता उल्हासु।**'' असं ज्ञानोबारायांनी अमृतानुभवांत याचे वर्णन केले आहे. सत्ता-प्रकाश-सुख हे परस्परांना कधी सोडत नाहीत. सत्ता-प्रकाश-सुखरुप वस्तूलाच शास्त्रकार देव म्हणतात. यालाच उपनिषद्कार ''ब्रह्म'' असं म्हणतात.

ज्ञानियांच्या राजानी ग्रंथाच्या आरंभी इतका महत्त्वाचा, मंगलवाचक ''हरि'' हा शब्द घातला नाही तर ''**देव**'' असा शब्द उपयोगात आणला. श्रृति, स्मृति, पुराणे व सगळ्या संतवाङ्मयात या ''**देव**'' शब्दाचा कधी निर्गुणबोधक तर कधी सगुणभगवंताचा निर्देशक म्हणून उभयअंगी असा

उपयोग केला आहे. ज्ञानराजांच्या जीवनात समग्र जीवनात कुठेच एकांगीपणा नाही तर नेहमीच त्यांची भूमिका सुंदर-उच्च अशा समन्वयाची आहे. माऊलीला परमात्म्याची सगुण व निर्गुण ही उभयस्वरुपे मान्य आणि प्रियही आहेत. म्हणून त्यांनी आरंभी सगुण-निर्गुण उभयार्थदर्शक असा **देव** शब्द चपलखपणे योजला आहे.

देव म्हणजे सर्वसाक्षी. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ''**एऱ्हवीं सर्वांच्या हृदय देशी। ''मी'' अमुका आहे ऐसी। जे बुद्धि स्फुरे अहर्निशी। ते वस्तु गा मी॥**'' सर्व भूतमात्रांच्या अंतरी सतत, अखंड, दंडाकार अशी जी अहंस्फूर्ति उठत असते, ते देवाचेच स्वरूप आहे. गीतेत श्रीभगवान् पण अर्जुनाला हेच सांगताहेत, ''**अहमात्मा गुडाकेश, सर्वभूताशयस्थित:॥**'' आपल्या **असणेपणाचं** सतत भान करून देणारी ही चिद्‌वृत्ती. ज्या अधिष्ठानाच्या आधारे ही वृत्ती उठते, स्फुरते आणि निमते ती अधिसत्ता, ती परमसत्ता म्हणजेच देवस्वरूप-आपलं **स्वस्वरूप** !!! एखादं दार उघडावं आणि मिटावं तशीच ही वृत्ती उठते आणि निमते. आत्मदेवाचं (ज्ञानदेव म्हणे भजा आत्मदेवा) नाम हे दारच.

माझा मऱ्हाटा बोलु अमृतालाही कौतुके पैजा जिंकणारा, असं मातृभाषेविषयी प्रगाढ प्रेम असणाऱ्या ज्ञानराजांनी दार हा मराठी शब्द न वापरता ''द्वार'' हा संस्कृत शब्द वापरला. या द्वारात उभे राहिले असताना चारी मुक्ती लाभतात. मुक्तींच्या संदर्भात द्वार या शब्दाला विशेष अर्थ आहे. श्रीमद्‌भागवतात म्हटले आहे, ''**महत् सेवां द्वारं आह: विमुक्ते।**'' संतांची सेवा हे मोक्षाचे द्वार आहे. श्रीगुरुसेवा हे मोक्षाचे दार आहे. ज्ञानेश्वरीतही ज्ञानराज म्हणतात, ''**जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा।**'' आणि सेवा, श्रीगुरुंची/संतांची म्हणजे काय ? तर ज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट सांगितले आहे, ''**स्वामीचिया मनोभावा। न चुकीचे हेचि परमसेवा।**'' श्रीगुरु/संतांचा मनोभाव काय असतो ? तर ''**आम्ही तेणे सुखी। म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखी॥**'' किंवा सेवा शब्दाचा अर्थ श्रीतुकोबांनी सांगितला,

"सगळ्या सेवेबरोबर "**आवडी उच्चारावे नाम**" या सगळ्याचा अर्थ असा झाला." **नामस्मरण हेच देवाचे दार आहे.**

हा देव काही एका बंदिस्त जागेतच नाही. समर्थ म्हणाले, "**तयाविण कोठे रिता ठाव नाही।**" सर्वत्र सर्वव्यापक असणाऱ्या अशा देवस्वरुपाची ओळख करून घेण्याचे साधन म्हणजे एक "**नाम**" हेच आहे. साध्या अनोळखी, कधी न पाहिलेल्या नश्वर, परिच्छिन्न अशा माणसाची ओळख करून घेताना आपण नाव विचारतो प्रथम !!! परमात्मा तर नामरुपातीत अपरिछीन्न आहे. अशा परमेश्वराची ओळख व्हावी म्हणून श्रुतीमातेने या असल्या दिव्य बालकाची ओळख येर सामान्यालाही व्हावी म्हणून सोय केली, काय केली तर "**ते कीर अनाम अजाति। परि अविद्यावर्गाचिये राती। माजी ओळखावया, श्रुती खूण केली॥**" ही खूण म्हणजेच भगवंताचे "**नाम**". "**ब्रह्माचा अबोला फिटावा।**" आणि ते निर्गुण ब्रह्म म्हणजेच सगुण भगवंत भेटावा, कसा ? तर "अद्वैतत्त्वे". ऐसा मंत्र देखिला कोणचा ? तर म्हणाले, "**ठेविलेनि नावे। ओ देत उठी।**"

तो मंत्र म्हणजेच भगवंताचे "**नाम**". वृत्तीच्या मागे आधारभूत असलेले ब्रह्म पुढे उभे ठाकते रमते म्हणजे प्रत्यक्ष अनुभवास येते. असा ब्रह्म-आत्म साक्षात्कार अनुभवास आणून देणाऱ्या देवाच्या दारात म्हणजेच **नामात** उभा राहण्यास ज्ञानदेव सांगताहेत आपल्याला. उभे राहणे म्हणजेच स्थिर होणे, तत्पर होणे, सतर्क म्हणजे जागे राहणे, तन्निष्ठ राहणे, एकावधानी होणे.

जो काहीही, कोठेही, कसाही असताना **सतत** एका हरिनामात आहे, एका हरिविना जो अन्य कशाला अंतरी थारा देत नाही, नामाच्या बाबतीत जो सदैव जागा आहे तोच देवाच्या दारी उभा आहे; नाम सोडून जो अन्यत्र फिरकतच नाही तो हरिनामाशी एकनिष्ठ असणारा "**उभा**" आहे, देवाच्या द्वारात.

पुढं माऊलींनी सांगितले आहे "**क्षणभरी.**" ब्रह्मदेवाच्या आयुर्मर्यादेच्या तुलनेत क्षणभरी म्हणजे आपले सर्व उभे आयुष्य. असीम, निराकार अशा

भगवंताला भेटावयास जाताना, या आकाराची-देहाची खोळ सोडताना, अंतकाळच्या क्षणी भगवंताच्या नामस्मरणातच जो उभा आहे तो क्षणच फक्त ज्ञानराजांना सांगायचा असता तर त्यांनी **अंतक्षणी** असं म्हटलं असतं. पण त्यांनी केवळ **क्षणभरी** असं म्हटलं आहे. अंतक्षणी भगवंताचे नाम आठवण्यासाठी आधीचे **सगळे क्षण** भगवंताच्याच आठवानं भरलेले हवेत नाही का ??? जसे घरभर म्हणजे सगळ्या घरात तसेच हे "**क्षणभरी**". सगळ्या क्षणांत-क्षणोक्षणी. प्रथम म्हणाले, "**मोटके निमिषभरी**" इथून सुरवात आणि "**अखंड चित्तवृत्ती माझे ठायी**" हा शेवट. म्हणजे अथपासून इतिपर्यंत केवळ **सेवा + नाम**.

चित्ताला एकदा का नामामृताची गोडी लागली की मग "**जे जे का निमिख। देखेल माझे सुख। तेतुले अरोचक। विषयी घेईल।। पुनवेहून जैसे। शशिबिंब दिसेदिसे। हारपत अवसे। नाहीचि होय।। तैसे भोगाआतुनि निघता। चित्त मजमाजी रिगता। हळूहळू पांडुसुता। मीचि होईल।। चित्त चाकाटले स्वरूपामाझारी। न निघे बाहेरी। ऐसे झाले।।**" आणि मग या सगळ्याचा परिणाम "**चित्त चैतन्या पडता मिठी। दिसे अवघी हरिरूप सृष्टी**" अशी परमावस्था.

म्हणून श्रीज्ञानदेवांनी वरील ओवीत **निमिषभरी** (म्हणजे क्षणभरी) च्या आधी **मोटके** असा शब्द योजला आहे. आता हा नेमका क्षण कोणता? क्षणभर म्हणजे संपूर्णक्षण. ज्याला **आला क्षण - गेला क्षण** अस येणं-जाणं नाही. जर जो क्षण "**असतुचि असे**" ज्याच्यावर कालाची सत्ता नाही. जो सतर्क म्हणजे **जागा-सावध** आहे. अखंड आहे. जो आपल्या नित्य प्रत्ययाला येतो आहे.

एक श्वास घेतला आणि सोडला, पण अजून दुसरा श्वास काही घेतलेला नाही; किंवा एक वृत्ती अंतरी उठली आणि निमाली, शांत झाली; पण अजून दुसरी वृत्ती काही उठलेली नाही. अशा मध्य संधीत हा परीपूर्ण असा क्षण आहे. कारण तो क्षण भगवद्सत्तेनं पूर्ण भरलेला आहे. कालत्रयातीत अशा

भगवंताची गाठ घालून देणारा आहे. कारण तो वृत्तीरहित क्षण हीच स्वरूपाकारता आहे. मुक्तावस्था आहे. आपल्याला हा मधला **क्षण** साधायचा आहे. तिथं आणि तेंव्हा आपण तत्पर पाहिजे. ''**देवाचिये द्वारी उभा क्षणभरी**'' म्हणजेच या मध्यसंधीत, वृत्तीरहित क्षणी आणि या मध्यसंधीच्या क्षणी **उभा** म्हणजे साधन-तत्पर. नामनिष्ठ. अशा निष्ठापूर्वक नामस्मरणानं काय होईल?

ज्ञानोबाराय सांगताहेत ''**तेणे मुक्ती चारी साधियेल्या॥**'' आता मुक्ती म्हणजे काय? आला प्रश्न. तर ''**देहाभिमानाचे दृढपण। तेचि बद्धतेचे लक्षण। देहाभिमानाचे निरसन। मुक्तता जाण, ती नांव॥**'' हा साडेतीन हाताचा हाडा-मांसाचा देह म्हणजेच **मी** अशा भावनेच्या खोडात अडकून पडणं हीच झाली बद्धता. या बंधातून मुक्तता म्हणजे आपलं खरं सच्चिदानंद स्वरूप जाणणं, देवरुप होणं हीच मुक्तता. ही अशी मोकळीक होण्यासाठी भगवत्नामस्मरण हे द्वार म्हणजे साधन सांगितलं आहे. हे साधन जर सकाम भावनेनं केलं तर सलोकता, समीपता व सरुपता या तीन मुक्तींचा लाभ होतो आणि नामस्मरण-साधन जर निष्काम केलं तर चित्तशुद्धीद्वारा आत्मज्ञानाचा, श्रीगुरुकृपाप्रसादद्वारा उदय होऊन आत्मसाक्षात्काररुपी सायुज्यता मुक्तीचा लाभ होतो.

भक्ताला जी मुक्ती हवी असेल ती भगवंत त्याला देतात. ''**सलोकता आवडे भक्तांसी। तै मी तया करी वैकुंठवासी॥**'' असे श्रीनाथरायांचे म्हणणे. इतकंच काय, पण जेथे नामघोष सतत होतो तिथे मी तर येतोच येतो, असतोच असतो पण तिथे सलोक म्हणजे वैकुंठ निर्माण होते, असं भगवान उद्धवाला सांगतात.

पुढं भगवान् श्रीकृष्ण उद्धवाला म्हणाले, ''**भक्त मागे समीपतेसी। करी मी तयासी जिवलगा॥**'' एवढ्यावर पण थांबले नाहीत तर पुढं आणखी म्हणाले, ''**हितगुज आळोंच्यासी। हृदयीचे गोड सांगायासी। उद्धवा, तू जैसा आवडसी। तैसीच करी त्याची प्रीती॥**'' काय भक्तीप्रेम

ना ??? !!! आणि म्हणाले, "**भक्त मागे सरुपता। त्यासी मी दे चतुर्भुजता। शंखचक्रादि सायुधता। घनःश्यामता सुरेख॥**" पण कौस्तुभमणी आणि वत्सलांछन सोडून बरं का.

आता सर्वश्रेष्ठ सायुज्यता याचे नाथांनी छान व्याख्यान केलंय - "**सांडूनि भिन्न भेद वार्ता। भक्त मागे सायुज्यता। ते गोड निरुपण कथा। तेथील स्वादुता मी जाणे॥ सायुज्यता अतिथा हाता। वस्तुवीण ठावो नाही रिता। सकळ भूती एकात्मता। सायुज्य तत्त्वता या नाव॥ सकळ रुपें नांदते जग। तें तो जाणे आपुलेच अंग। आपण सर्वात्मा अभंग। त्यासीच सांग सायुज्य॥**

हरिनामोच्चाराने अशा चारही मुक्ती साधतात म्हणून श्रीगुरु ज्ञानोबारायांनी २७ अभंगाला एकच ध्रुवपद असणाऱ्या ओळीत सांगितले -

"**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा.**"

साधं-सोपं छान साधन !!! नाही कां ??? एक भगवंताचं नामस्मरण. या नामउच्चारणांमुळे - नामद्योतांमुळे - नामस्मरणाने परमार्थातील अवघ्या दशा म्हणजे अवस्था साध्य होतात. "मुख्य उपासना - सगुण भक्ती" की ज्याच्या योगे "प्रगटे हृदयीची मूर्ती।" कां म्हणाल तर एक शुद्ध भाव पाहून.

"**आदरात् द्विरूक्तिः।**" एखाद्या गोष्टीचे महत्व जर ठसवायचे असेल, अधिक्य दाखवायचे असेल तर द्विरूक्ती केली जाते. मुखे "**हरिनाम**" म्हणणं, ज्ञानराजांना अतिशय महत्वाचं असं वाटतं आहे. हे जसं, तसंच एखाद्या गोष्टीबद्दल अगत्य असलं, आस्था असली, तर ती गोष्ट पुनः पुन्हा सांगितली जाते. समजा आपल्या स्नेही-सख्या-सोबत्यांना अंतःकरणपूर्वक एखाद्या सण-समारंभ, मंगल-कार्याला निमंत्रण केलं आहे. एकदा सांगतो, दोनदा सांगतो, पुनः पुन्हा सांगतो. "या बरं का! विसरू नका, सबब सांगू नका, आठवणीनी. अगदी या बरं. यायचं हं." आता एकदा सांगून त्यांना कळलं नाही असं नाही. तर अगत्य आहे, प्रेमभाव आहे, जिव्हाळा आहे, कळकळ आहे. म्हणून पुन्हा-पुन्हा सांगतो. तसंच **श्रीसद्गुरूज्ञानराज**

**माऊलीला**, आपण सर्वांनी "**हरिनाम**" घ्यावं, ही कळकळ आहे; म्हणून ज्ञानोबारायांनी दोनदा सांगितलं, इतकंच नाही तर हरिपाठातल्या सगळ्याच्या सगळ्या अभंगांच ध्रुवपद पण एकच - "**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।**"

आता हरि हेच नाम का सांगितलं? तर ते वेदांचं बीज आहे, म्हणून पवित्र आहे; ते जोडाक्षररहित आहे; ऱ्हस्व आहे; सोपे आहे; आणि स्मरणमात्रेकरून आपली सर्व पापे आणि **संसार** नष्ट करणार आहे. संसार नष्ट करणारं म्हणजे संसारविषयक सत्यत्व व आसक्ती नाहीसं करणारं आहे.

"**स्मृतिमात्रेण पुसां पापं संसारं वा हरती इति हरिः।**" हरिनामस्मरण केवळ पापच नष्ट करतं असं नाही, तर पुण्याचाही अमाप साठा करणारं आहे. नाम-स्मरणासाठी जरी सुरूवातीला जपमाळ घेतली, तरी तिचा उपयोग नामाचे स्मरण घडावे याचसाठी करावा; **नाम मोजण्यासाठी नाही**. नाम का मोजत बसायचं आहे? आपण "श्वास-उच्छ्वास" कधी मोजतो का? एक वेळ नाम मोजाल, पण त्याचं फल-पुण्य? ते कां मोजता येतं? जे मोजता येतं ते मर्यादित; पण नामाचं फल पुण्य अगणित आहे. अमर्याद आहे. म्हणून तर म्हणाले "**पुण्याची गणना कोण करी?॥**"

काम्य-कर्माचे स्वर्गादिफल परिच्छिन्न म्हणजे मर्यादित आहे. राईस-प्लेट सारखं. म्हणून स्वर्गाला घेऊन जाणारे पुण्यही अगदीच मर्यादित; पण हरिनामाच्या उच्चाराने निर्माण होणाऱ्या पुण्याने अमर्यादित अशा परमात्मस्वरूपाची आत्मत्वाने प्राप्ती होते. म्हणून हे पुण्यही मर्यादित आणि न संपणारं; अगणित असं आहे.

मग असं अमर्यादित, अगणित खरे पुण्य कोणते? ज्ञानराजांनी सांगितलं "**माते जेणे पाविजे। ते शुद्ध पुण्य॥**" श्रीज्ञानदेव आपल्याला (अर्जुनाचं निमित्त करून भगवंताशी आपल्या साऱ्या जणांना जसं विचार करावयास प्रवृत्त केले आहे तसेच) विचारताहेत "**जेणे मी दुरावे पांडुसुता। ता ते पुण्य ऐसे म्हणता। जीभ न तुटे काई?॥**"

नाम आणि नामी अभिन्न असतात. “**नाम परब्रह्म वेदार्थे॥**” भगवंताच्या नामात असणं म्हणजे भगवंताशी योग-सहवास-जवळिक-एकरूपता. नामदेवराय सांगतात, “**ज्याचे मुखी नाम, तोचि एक धन्य। त्याचे शुद्ध पुण्य, इये जनी॥**” गुरूदेव रामभाऊ रानडे म्हणायचे, “**आठव तो ब्रह्म.**” सर्वच संतांनी नामस्मरणालाच शुद्ध पुण्य म्हटले आहे. श्रीतुकाराममहाराज म्हणतात, “**जयामध्ये नारायण, शुद्ध पुण्य ते एक**” श्रीएकनाथ महाराज काय म्हणतात पहा नां, “**करिती नित्य नामस्मरण। तेणे उपजे परमपुण्य। ते भोगक्षये नव्हे क्षीण। ब्रह्म परिपूर्ण प्रापक॥**” निळोबाराय म्हणाले, “**सर्व काळ पुण्याचिया राशी। हरिनाम आल्या जिव्हेसी।**” ज्ञानराज माऊलींचा पण आग्रह आहे, “**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा। पुण्याची गणना कोण करी?॥**”

संशय असा असतो, आणि संशयता तर “**विनश्यति**” असं भगवान गीतेत अर्जुनाला म्हणाले आहेत. आपल्याला संशय - संसारी माणसं आम्ही! आम्हाला कसं हे नामस्मरणं सातत्याने अखंड जमणार? आम्ही काय रिकामे (खरं सांगायचं तर रिकामटेकडे) थोडेच आहोत? उठलो, की निघाले! असं थोडचं आमचं, “**घर-दार, मुलं-बाळं, आला-गेला, लौकिक**” कसं शक्य आहे आम्हाला?

ज्ञानराज पुढील चरणात म्हणतात - “**असोनी संसारी, जिव्हे वेगु करी।**” संसार करत असतानाच **नामस्मरण** करा. तुकोबाराय सांगतात, “**न लगती सायास जावे वनांतरा।**” नामस्मरण हेच एक साधन आहे, की ते संसारात राहूनही करता येते, घेता येते. संसार नामाला मुळीच बाधक नाही.

नामस्मरणाला संसार एवढासुद्धा बाधक नाही. योगमार्गासारखी या नामसाधनेला अपरिग्रहाची आवश्यकता नाही. परिग्रहाशिवाय संसारच नाही. हा परिग्रह नामस्मरणस्वरूप प्रेमलक्षणा-भक्तीच्या आड येत नाही. संसार व्याधीवर **नाम** हीच एकमात्र दिव्य औषधी आहे. नाथरायांनी सांगितलं, “**वैद्य धडफुडा पंचानन। रोगियाची वासना पोखून। मागे ते देऊनिया**

**अन्न। वाचनी रसज्ञ रसप्रयोगे॥''** नाम हेच औषध, आणि नाम हेच पथ्य. आहे की नाही मौज???

संसार भगवंताच्या आड येत नाही. कारण कां म्हणाल तर, संसार हा जीवनाच्या बाह्यांगाचाच विषय आहे; पण भगवंत आणि त्याचे नाम जीवनाच्या अंतरंगाचा विषय आहे. हा संसार माणसाला त्रास देत नाही. तो जड आहे. तर माणसाच्या मनात पोसलेली, घट्ट रूतूनशी बसलेली संसारासक्ती आड येते. देह, पुत्र, कलत्र, धन, गृह, लौकिक इत्यादि ''**अहं-मम**'' ज्ञानाचे विषय ज्यात असतात, त्याला स्थूल संसार म्हणतात.

''**असोनि संसारी**'' याचा अर्थ असा नव्हे की, नाम घेण्याकरता संसारातच असावे लागते. याचे तात्पर्य इतकेच की, ज्यांना पूर्व संस्कारामुळे संसारासक्ती सुटत नाही, अशा संसारासक्तांना पण हरिनाम घेता येते. नाम घेता-घेता नामाची गोडी लागते, आणि संसारासक्ती हळू-हळू कमी होते. कारण नामस्मरणाने संसाराचे लटकेपण कळून येते; पटते. त्यामुळे त्याची गोडी कमी होते व ज्याचे नाम, त्या भगवंताची गोडी वाढतच जाते.

आपले श्रीतुकोबाराय काय म्हणतात ते पहा, ''**तुका म्हणे नाही निरसला देह। तोवरी हे अवघे सांसारिक॥**'' ज्यांच्या देहाचा नाही तर देहबुद्धीचा निरास झाला नाही ते संसारीच. त्यामुळे त्यांनी पण नाम घ्यावयासच पाहिजे. वेदांनी व सर्व शास्त्रांनी बाहू उंचावून नामस्मरणाचा गौरवच केला आहे. मनुष्यमात्राला त्याचा अधिकार सांगितला आहे. ''**सकळांसी येथे आहे अधिकार.**'' नामस्मरणाच्या आड कोणताही वर्णाश्रमधर्म येतच नाही. याच्या उलट नामस्मरणावाचून वर्णाश्रमधर्म केवळ व्यर्थ आहेत; कारण कोणतेही वर्णाश्रमधर्माला अनुसरून असणारे कर्म सांग-सफल होण्यासाठी नामाचीच गरज आहे. ''**यस्य स्मृत्याच नामोक्त्या, तपः पूजा, क्रियादितु। न्यूनं संपूर्णता याति, सद्यो वंदे तम् अच्युतम्॥**'' कोणत्याही कर्माला पुढील चार गोष्टींची फार आवश्यकता असते. १) इच्छा,

२) सामर्थ्य, ३) ज्ञान, ४) शास्त्रमान्यता आणि ५) **अधिकार**. नामाचा अधिकार सगळ्या-सगळ्यांना आहे.

नामाला शास्त्रमान्यता तर आहेच आहे. "**वेदशास्त्र उभारी बाह्या सदा**" यातून ही मान्यता स्पष्ट केली आहे, श्रीज्ञानराजांनी. नामस्मरणाला शारीरिक कष्ट मुळीच नाहीत. कारण, **नाम** अत्यंत सोपे आहे. "**नामसंकीर्तन साधन पै सोपे॥**" या साधनाला धनादिक बाह्य कोणच्याही साधन सामुग्रीची गरज नाही. म्हणून सगळ्या माणसांना नामजपाचे सामर्थ्य आहे. नामजपाला, विद्वत्तेची यत्किंचितही गरज नाही. वाल्मीकींनी (पूर्वाश्रमीच्या वाल्यानी) "**मरा-मरा**" असा उलटा जप केला, तरी तो वाल्या "**दो अक्षरी उद्धरला।**" एवढेच नाही तर "**केले रामायण रामा आधी॥**" असा अधिकारी झाला.

एकंदरीत काय तर नामस्मरणासाठी मनुष्यमात्राला शास्त्रमान्यता आहे, सामर्थ्यही आहे, ज्ञानही आहे, पण **इच्छा** (नाम घेण्याची) मात्र प्रबळ पाहिजे. इच्छाच नसेल तर बाकी नामस्मरण होणार नाही. दिवसातून एकदाच नामस्मरण केलं (टाकणं टाकल्यासारखं) व बाकी सर्व काल संसारातच व्यतीत केला तर मात्र ते नाम उद्धारास पर्याप्त म्हणजे पुरेसे नाही.

"**हरिचे चिंतन सर्वकाळ।**" किंवा "**दिन-रजनी हाचि धंदा। गोविंदाचे पवाडे॥**" नामस्मरण सतत व शीघ्र वेगाने (म्हणजे दोन उच्चारात-स्मरणात अंतर नको) करावयास हवे. अशाने काय होईल?

अशा अविश्रांत, अखंड नामस्मरणाने, चित्तात अन्य विषय, विकार, विकल्प शिरण्यास वावच मिळणार नाही. जसा ट्रॅफिक जाम झाल्यावर, रस्त्याच्या पलीकडे जाण्यास अवसरच/संधी मिळत नाही. म्हणून ज्ञानोबारायांनी सांगितले, "**जिव्हे वेगू करी।**" भागवतकार म्हणतात, "**हे जिव्हे रससारज्ञे, सर्वदा, मधुराप्रिये। नारायणास्य पीयूषं, पिब जिव्हे निरंतरम्॥**" एवढी एक जीव्हा वश झाली, तर मग बाकीच्या इंद्रियांचा काय पाड? आपल्या जनाबाई म्हणतात, "**दळिता कांडिता। तुज गाईन**

**अनंता॥ न विसंबे क्षणभरी। तुझे नाम गा मुरारी॥ नित्य हाचि कारभार। मुखी नाम निरंतर॥"**

हा अतिदुस्तर, मोहमय भवसागर तरून जाण्यास व त्या श्रीहरीशी/श्रीगुरुशी एकरुप होण्यास अविरत हरिनाम घेणे हेच एकमेव सोपे व अमोघ साधन आहे. ह्या एकरुपतेत कोणताच कसलाही अडथळा, अडसर उरू देऊ नये. भगवंताशी अंत:करणाने लगटण्याची ही गुरुकिल्लीच आहे.

या अभंगाच्या शेवटी श्री ज्ञानराजांनी श्री महामती व्यासांच्या पुराणाधारे दाखला दिला आहे, "**ज्ञानदेव म्हणे, व्यासांचिये खुणे।**" याचे दोन अर्थ, एक "**व्यासांच्या चरित्रावरून**". व्यासांचे चरित्रही नामजपाविषयी प्रमाणभूत आहे. श्रीमद्‌भागवतात अशी कथा आहे की, एकदा सरस्वतीकाठी श्रीव्यासराय मोठ्या उद्विग्न मनाने बसले होते; देवर्षी, भक्ताचार्य नारद तिथे आले आणि त्यांनी व्यासांना या उद्विग्नतेचे कारण विचारले. व्यासांनी सांगितले, "खूप-खूप ग्रंथरचना झाली, पण चित्ताला समाधान नाही. यावर एक नामी उपाय सांगा !" नारद म्हणाले, "श्रीहरीचे **नाम-गुण-यश** गा. त्यामुळे आपल्याकडून हरिनाम संकीर्तन घडेल व तुम्हाला समाधान लाभेल." त्यानुसार श्री व्यासांनी "श्रीमद्‌भागवत" लिहिले आणि ते समाधान पावले.

भगवंताची सहस्त्रनामावली म्हणजे जणू काय भवनदी तरून जाण्यासाठी सुसज्ज केलेल्या नावाच. आपले ज्ञानोबाराय !!! त्यांनी भगवान् अर्जुनाला उपदेश करत असताना, भगवंताच्या मुखी एक अभिवचन घातलंय, "**नामाचिया सहस्त्रवरी। नावा इया अवधारी। मी सजुनिया संसारी। तारु जाहलो॥**"

ज्ञानोबारायांनी जशी व्यासांची साक्ष दिली आहे, तसेच त्यांनी पांडवांच्या भाग्याचेही वर्णन केले आहे - "**द्वारकेचे राणे पांडवाघरी॥**" पांडवांचे भाग्य वर्णन करताना म्हणतात, "**देवकीया उदरी वाहिला। यशोदे सायासे पाळिला। शेखी उपेगा गेला। पांडवासी॥**" भागवतकारही म्हणतात, "**येषां गृहानां बसतीती साक्षात्, दृढं परंब्रह्म मनुष्यलिंगम्॥**" याचा अर्थ

असा, ''मनुष्याकार धारण करून हे गूढ परब्रह्म, हे पांडवांनो, तुमच्या घरी साक्षात् राहात आहे''. असे श्री नारदमहामुनी पांडवांना म्हणाले आहेत.

एकदा हे नारद भगवंतांना भेटण्यासाठी द्वारकेला गेले. रुक्मिणीमातेने सांगितलं, ''देव पांडवाघरी गेलेत.'' नारद आले पांडवाघरी, तर समजले की, ते अर्जुनाच्या महालात आहेत. नारद अर्जुनाच्या महालघरी आले, पाहातात तो एक अतिशय अद्भूत दृश्य त्यांना दिसले. अर्जुन एका भव्य अशा मंचकावर पहुडला आहे. त्याचे घनदाट काळेभोर केस मंचकावरून खाली आले आहेत, द्वारकाधीश प्रभू खाली भूमीवर, अर्जुनाच्या उशाशी बसलेत, त्यांनी त्याचे केस आपल्या हातात घेतलेत आणि ते केस हाती धरून भगवान श्रीवैकुंठाधिपती कंगव्याने आणि विझणवाऱ्यांने ते केस वाळवताहेत.

अर्जुनाने नुकतेच स्नान आवरले होते. अर्जुन हा **''गुडाकेश''** असल्याचा श्रीमद्भगवद्गीतेत दोनदा उल्लेख आला आहे. नारद हा प्रकार पाहून स्तंभित झाले !!! नारदांना वाटले, अर्जुन हा सगळ्या पांडवांत भगवंताचा/त्याच्या श्रीगुरुंचा इतका लाडका असला तरी भगवंतांनी त्याची इतकी सेवा करावी ??? अशी कोणती अपूर्व भक्ती केली यानं ???

भगवान् श्रीकृष्णांनी नारदांच्या मनातला किंतू जाणला. त्यांनी नारदांना आपल्या जवळ बोलावलं. म्हणाले, ''नारदा, मघापासून याचे केस हातात धरून, ते वारा घालून, विंचरून वाळवत असताना माझा हात जरा अवघडलाय, तुम्ही आता जरावेळ हे केस हाती धरा.'' रमानायकाची आज्ञा प्रमाण मानली नारदांनी. बसले खाली, घेतले अर्जुनाचे केस हातात आणि काय महदाश्चर्य अनुभवास आलं नारदांच्या ??? !!! नारदांना अर्जुनाच्या केसा-केसांतून ''कृष्ण-कृष्ण, जय कृष्ण-कृष्ण'' असा नामजप/नामस्मरण स्पष्ट शब्दोच्चार ऐकू येऊ लागला. नारदांना मनोमनी उमज पडला. भगवंतांचंच एक वचन त्यांना आठवलं, **''नाहं वसामि वैकुंठे, योगिनां हृदये नवौ। मद्भवता यत्र गायन्ति, तत्र तिष्ठामि नारद॥''**

श्रीगुरु ज्ञानराज पण म्हणतात, **''तो मी वैकुंठी नसे। एक वेळ**

**भानुबिंबीही न दिसे। वरी योगियांचीही मानसे। उमरडोनि जाय॥ परि तयापाशी पांडवा। मी हारपला कें गिवसावा। जेथ नाम घेष बरवा। करिती माझा॥**'' श्री एकनाथ महाराजही म्हणतात, ''**नावडे वैकुंठ, शेषाचे शयन। वैष्णव सदन आवडले॥**'' जेथे नाम आहे, तेथे भगवंत असतोच आणि जेथे भगवंत आहे, तेथे भक्त सापडतोच. पांडव मोठे नामधारक. सतत नाम घेत असत. भगवंताला नामाहून निराळे राहताच येत नाही म्हणून भगवंत पांडवांकडे असत.

नामाशिवाय वेगळा राहात नाही तोच भगवंत, तोच भक्त. श्रीगुरुंशिवाय वेगळा नसतो तो शिष्य. प्रकाशाशी सदैव एकरुपच असणारा सूर्य. गोडीशी एकरुप असणारे अमृत. चांदण्यांनी सदाच नटलेला चंद्र. नामाशी-श्रीगुरुंशी-भगवंताशी सदैव अखंड काया-वाचा-मने एकरस एकरुप असावं. देवाच्या द्वारे (नामात) राहण्यास तयार असलेल्या भक्ताच्या **घरीच देव आला,** मग भक्ताला याहून अधिक काय हवं ??? त्या देवाला कवेत घ्यावं, उराशी धरावं, त्याच्यातच सामावून जावं.



# अभंग क्र. २

**चहूं वेदी जाण साही शास्त्री कारण। अठराही पुराणे हरिसी गाती॥१॥**
**मंथुनी नवनीता, तैसे घे अनंता। वायां व्यर्थ कथा सांडी मार्गु॥२॥**
**एक हरी आत्मा, जीवशिवसमा। वायां तू दुर्गमा न घाली मन॥३॥**
**ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ। भरला घनदाट हरि दिसे॥४॥**

चारही वेदातील ज्ञान एका श्रीहरीचेच आहे. सहाही शास्त्रांनी जगाचे कारण एक श्रीहरीच म्हटले आहे आणि अठराही पुराणे त्या एका श्रीहरीचेच गुण गातात. "जाण म्हणजे **ज्ञान**" आणि कारण म्हणजे "**जगत्कारण**". ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार वेद आहेत. वेद हे कर्म, उपासना व ज्ञान असे त्रिकांडात्मक आहेत. वेदातील कर्ममार्गातील विविध पदार्थांचे ज्ञान म्हणजे श्रीहरीचे ज्ञानच आहे. ज्ञानोबाराय म्हणतात, "**तेथ जाणिवेचा जरी उदय होये। तरी मुद्दल वेदु मीचि आहे। आणि तो विधानाते जया विये। तो क्रतुही मीचि॥**" उपासना मार्गातील उपास्य दैवत श्रीहरीच आहे आणि ज्ञानमार्गात श्रीहरीच्या अद्वैत सत्तेचा अनुभव सांगितला आहे.

सहा शास्त्रे अशी आहेत, "कपिलस्य कणादस्य, गौतमस्य पतग्जले। व्यासस्य जैमिनेश्वपि शास्त्राव्याहुः षडेव हि॥" अर्थ - १) कपिलमुनींचे सांख्यशास्त्र, २) कणादांचे वैशेषिक, ३) गौतमांचे न्याय, ४) पतज्जलींचे योग, ५) जैमिनींचे पूर्वमीमांसा व ६) व्यासांची उत्तरमीमांसा. अशी एकंदर सहा शास्त्रे आहेत. यांनाच "**षड्दर्शने**" असे म्हणतात. ही आस्तिक म्हणजे वेद प्रामाण्य १००% मानणारी आहेत. बौद्ध, जैन, चार्वाक ही नास्तिक म्हणजे वेदप्रामाण्य न मानणारी दर्शने आहेत.

या शास्त्रात थोडा-थोडा फरक आहे, तथा क्रमशः उत्तरोत्तर यातील प्रमेये अधिकाधिक उन्नत, विकसित व सूक्ष्म अशी आहेत. या नाम-रुपात्मक,

चित्र-विचित्र, जगाचे कारण जीवाला आपल्या स्वबुद्धीने कळणे शक्य नाही. ते या शास्त्राधारे समजून घेता येते. म्हणून वेदांना पूर्णतः अनुसरणारी ही सहा शास्त्रे. न्याय व वैशेषिकांनी जगत्कारण ईश्वर आणि पंचमहाभूतांचे परमाणू मानले. सांख्यकारांनी जगाचे कारण प्रकृती मानली. योगशास्त्र ईश्वर व प्रकृती अशी दोन कारणे मानते. पूर्वमीमांसा धर्मालाच जगत्कारण मानते; तर उत्तरमीमांसा एका ईश्वरालाच जगत्कारण मानते. या सर्व शास्त्रांचा पूर्ण पर्यालोचनपूर्वक विचार पुन:पुन्हा केल्यानंतर हेच एक प्रमेय/सिद्धांत निश्चित झाला की, एका श्रीहरीचे-नारायणाचेच ध्यान करावे.

**''आलोक्य सर्व शास्त्राणि, विचारार्थच पुनः पुनः। इदमेकं सुनिष्पन्नं, ध्येयो नारायणः सदा॥''** न्याय व वैशिषिक शास्त्रे हरीचे **मनन** करावे असे सांगतात; सांख्यशास्त्र सांगते, हरी व हरीची माया यांचा **विचार** करावा, योगशास्त्र हरीचे **ध्यान** करावे असे सांगते; पूर्वमीमांसा म्हणते, नि:श्रेयस प्राप्तीकरता हरिला **सर्व कर्मे समर्पण** करावीत आणि उत्तरमीमांसा सांगते, निर्विशेष श्रीहरीचे आत्मत्त्वाने अपरोक्ष **ज्ञान** संपादन करावे; या सगळ्या थोड्या शास्त्रीय चर्चेतून दचकू/भिऊ नका मुळीच. थोडक्यात काय, तर कसोटीवर घासल्याखेरीज, तोडल्याखेरीज, तापवल्याशिवाय जशी सुवर्णाची परीक्षा होत नाही तशीच **वेदप्रामाण्य** असल्याशिवाय कोणत्याही साधनाची अध्यात्मात प्रतिष्ठा नाही.

आता पुराण कशाला म्हणतात ? तर पूर्वीची परंपरा ज्यात सांगितली आहे, त्यांना पुराण म्हणतात. ''पुरा परंपरा वावी पुराणं, तत् प्रकीर्तितं।'' १) ब्रह्म, २) पद्म, ३) विष्णु, ४) वायु, ५) भागवत, ६) भविष्य, ७) नारद, ८) मार्कंडेय, ९) अग्नि, १०) ब्रह्मदैवर्त, ११) लिंग, १२) वराह, १३) स्कंद, १४) वामन, १५) कूर्म, १६) मत्स्य, १७) गरुड व १८) ब्रह्मांड अशी संख्येने अठरा पुराणे आहेत. तरी श्रीहरी गाण्यात सर्वांचे मत **एक** आहे. सगळ्या पुराण ग्रंथातील श्लोक संख्या **चार लाख** आहे. **''वेदे रामायणे शास्त्रे, पुराणे भारते तथा। आदौ मध्ये तथा चौते हरिः सर्वत्र गीयते॥''** हेच सार.

आपले एकनाथ महाराज म्हणतात, "**एके वेदीचा तात्पर्यार्थ। मुख्य भजावा मी भगवंत। तोचि शास्त्री विशदार्थ। करी वेदांत श्रवणार्थ॥**"

शाश्वत तत्त्व एक **श्रीहरी**. वेद, शास्त्र, स्मृती, पुराणे यातील शब्दज्ञानाने श्रीहरीची एकमात्र अद्वैत सत्ता कळली तरी प्रत्यक्ष अनुभवाशिवाय ती दृढ होत नाही, निश्चय होत नाही.

भागवतकार सांगतात, "**वासुदेवपरा: वेदा:। वासुदेव परा: मखा:। वासुदेव परा: योगा:। वासुदेव परा: क्रिया:। वासुदेव परं ज्ञानं। वासुदेवपरो धर्म:। वासुदेव परा: गति:।**" एका भगवंतावाचून काहीच नाही हे सार.

एका श्रीहरी/श्रीगुरूवाचून अन्य दुसरी वस्तूच नाही. असा साक्षात अनुभव घेणे, यालाच श्रीज्ञानोबाराय "**घेणे**" म्हणतात. ज्यांनी आपला "**एकर**" म्हणजे क्षेत्र म्हणजेच देह-देहभाव भगवंताकडे गहाण टाकला आहे व तो गहाणवट म्हणून ठेवून भगवंताकडून/श्रीगुरूंकडून भक्तिप्रेमाचे कर्ज भांडवल म्हणून घेतले आहे तो "**घाणेकर**." श्रीहरी व भक्त यांच्यातला श्रीगुरू व शिष्य यांच्यातला नवनीतासारखा मृदू-स्निग्ध-पवित्र भक्तिप्रेमभाव कसा घ्यावयाचा ते ज्ञानोबामाऊलींनी या पुढील चरणात सांगितले आहे.

"**मंथुनी नवनीता, तैसे घे अनंता। वाया व्यर्थ कथा सांडी मार्गु॥२॥** दही घुसळल्यानंतर शहाणा मनुष्य जसे त्यातील लोणीच घेतो, त्याचप्रमाणे वेद-शास्त्रे-पुराणे यांचे विवेकबुद्धीरूप रवीने मंथन करून त्यातील नामस्मरणरूपी नवनीत घे व इतर वर्णनाचा त्याग कर, पुष्पित वाणीचा (असार) त्याग कर असंच सांगतात कारण,

" **नको शास्त्र अभ्यास, व्युत्पत्ति मोठी। चढे गर्व तठा अभिमान पोटी।**
**घडे कर्म खोटे, बहू हा दगारे। "राम कृष्ण हरि" मंत्र सोपा जपारे॥**"

आता मंथन करायला सुद्धा मोठे चातुर्य लागते. साय नाही असं दही दीर्घकाळ जरी घुसळलं तरी लोणी थोडच येणार? ज्ञानराज सांगतात, "**नातरी जाणिवेच्या आयणी। करिता दधि कडसणी। मग नवनीत निर्वाणी। दिसे जैसे॥**

सगळ्यांना हे चातुर्य लाभलेले नसते. मग वेद-शास्त्र-पुराणे-संत यांच्या सांगण्याचा मनाला वाटेल, गोड वाटेल असा तात्पर्यार्थ काढतात. मात्र सत्संगतीत, सदुपदेशाने, शुद्ध-संप्रदाय परंपरेने वेद-शास्त्र-संत साहित्याचे योग्य अध्ययन करून ज्यांची बुद्धी सूक्ष्म झाली आहे, बुद्धीचे रूपांतर प्रज्ञेत-ऋतंभर प्रज्ञाभावात झाले आहे ते कधीही आसाराला सार असे म्हणत नाहीत. म्हणणार नाहीत. ते सारासार विचार करून सार घेतात आणि असाराचा त्याग करतात. ‘‘**जे उपजे आणि नाशे। ते मायावशे दिसे। येऱ्हवी तत्त्वत: वस्तु जे असे। ते अविनाशचि॥**’’

जे आदिरहित आहे, तेच अंतरहित असते. माऊली त्यालाच अनंत म्हणतात. श्रीविष्णुसहस्रनामभाष्यात श्रीमत् आद्य शंकराचार्यांनी **अनंत** शब्दाचा अर्थ दिला आहे, ‘‘**व्यापित्वात् नित्यत्वात्, सर्वात्मत्वात्, देशत:, कालत:, वस्तुत: अपरिच्छिन्नोऽ अनंत:॥**’’ व्यापक, नित्य, सर्वात्मा, देश-काल-वस्तूंनी अपरिच्छिन्न, म्हणून भगवंतच फक्त अनंत आहे. भगवदाकारापेक्षाही त्याचे नाम अनंत आहे. एकदेशी, अनित्य, देश-काल-वस्तूंनी मर्यादित असणाऱ्या पदार्थाचा अंत होतोच होतो. परमात्मा तसा नाही. नाश हा सावयव पदार्थांचा होतो. सावयव म्हणला की आकार आला. आकार आला की उत्पत्ती आली, उत्पत्ती म्हटल की कारण आले आणि मग नाश ओघातच आला नां ! परमात्मा निरवयव आहे, निराकार आहे, त्याला उत्पत्ती नाही; म्हणून त्याला त्याच्या असण्याला-होण्याला कारणाची गरज नाही; मग त्याला अंत कसा असणार? म्हणून तो अनंत. ‘‘**जे सर्वज्ञ सर्वगत। जन्मक्षयातीत। तथा केलियाहि घात। कदा नोहे॥**’’ श्रीमद्भगवद्गीतेत तर या प्रमेयाला-सिद्धांताला किती प्रमाणे आहेत. १) अविनाशितु तद्विद्धि, २) न जायते म्रियते वा कदाचित्, ३) नैनं छिन्दन्ति शस्त्राणि, ४) वेदाविनाशिनं नित्यम्। इत्यादी.

आपले ज्ञानेश्वर महाराज काय म्हणतात बघा नां, ‘‘**या उपाधिमाजी गुप्त। चैतन्य असे सर्वगत। ते तत्वज्ञ संत। स्वीकारिती॥ तैसे**

**विचारिता निरसले। ते प्रपंचु, सहजे सांडवले। मग तत्त्वता तत्त्व उरले। ज्ञानियांसी॥''**

श्रीहरीची प्राप्ती करून घेणे, हेच जीवनातील सार आहे. मीच सच्चिदानंद ब्रह्म आहे, असा दृढ अनुभव अखंडत्वाने घेणे ही पहिली श्रीहरिप्राप्ती आहे आणि या श्रीहरीवाचून/श्रीसद्गुरुवाचून दुसरे काहीच सत्य नाही/सार नाही, एक त्याचीच केवळ सत्ता आहे, असा अनुभव पक्का होणे ही प्राप्तीतली दुसरी पायरी. यासाठी जगताचं मिथ्यत्त्व कळावं लागतं.

मिथ्यत्व म्हणजे खोटं नाही तर नाम-रुपात्मक दृष्य जगताला एका सच्चिदानंद ब्रह्माहून स्वतंत्र अस्तित्व तर नाहीच आणि मग स्वतंत्र वस्तूत्व कुठलं !!! ??? मग आहे ते सर्व ''**वासुदेव: सर्वमिति।**'' हे व्यतिरेक-अन्वयाने अनुभवास यावे लागते.

कार्यापासून कारण अलग करून पाहतात त्याला व्यतिरेक म्हणतात आणि अन्वय म्हणजे कार्यात कारणावाचून दुसरी वस्तूच नाही असे अनुभवास येणे. सुवर्ण अलंकारात सुवर्णच असते, अन्य काहीच नसते तसं नामरुपात्मक जगतात (परब्रह्मापासून झालेल्या) एक श्रीहरीच भरून आहे, अन्य काही नाही. सोन्यावाचून अलंकार नाही, परब्रह्मावाचून जगत् नाही.

अन्वयात सगुण श्रीहरि व त्या भगवंताचे **प्रेम-भक्ति** असते आणि व्यतिरेकात निर्गुण-निराकार परब्रह्म-साक्षात्कार असतो. **जे जे दृष्टी दिसे ते ते हरिरुप**-सगुण भक्तिप्रेम अवघं एक ब्रह्मच, हा साक्षात्कार. अशा व्यतिरेक-अन्वय मंथनाने उभयअंगांनी एकच परमात्मा अनुभवास येणे म्हणजेच ''**मंथुनि नवनीता, तैसे घे अनंता.**''

सगुण भगवंताचे परमप्रेम आणि निर्गुण-निराकार परब्रह्माचे ज्ञान म्हणजे अनुभव/साक्षात्कार. अशा अन्वय व व्यतिरेक या दोन डोळ्यांनी आपण विश्वेश्वराचे **विश्वरुप** दर्शन घेऊ शकतो. ''**अन्वय माझी पूर्ण भक्ति। व्यतिरेक शुद्ध स्वरुपस्थिती॥**'' असं भगवंतच सांगतात. भगवद्पूज्यपाद श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी पुरस्कृत केलेला ''**अहं ब्रह्मास्मि**'' व ''**सर्वं**

**खलु, इदं ब्रह्म**'' हा उपनिषद्‌प्रणित द्विविध ब्रह्मानुभवच आपल्या श्रीगुरुज्ञानराजांनी १२ व्या अध्यायात एका ओवीत सांगितला आहे. ''**हे विश्वचि माझे घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला॥**''

सायट्याचे ताक किती, कोठवर घुसळायचे ? तर लोणी येईपर्यंत. तसेच व्यतिरेक-अन्वय मंथन कुठवर करायचे ? तर वर सांगितलेला दोन्ही प्रकारचा ब्रह्मानुभव दृढ/घट्ट झाला की बस ! विचार-मंथनाचे कामच संपलं ना !!! असा सगुण-निर्गुणाचा दोन्ही प्रकारचा ब्रह्मानुभव म्हणजेच **ज्ञाननिष्ठा**. ''**हे ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्हासे॥**''

अशी ज्ञाननिष्ठा अंगी बाणली की **प्रेमभक्ती** स्वाभाविकच होते. यालाच ''**सहजस्थिति**'' म्हणतात. ज्ञानविचाराने निर्गुण स्वरुपस्थिती व प्रेमभक्तीने सगुण स्वरुपस्थिती बाणली की पूर्णप्राप्ती झालीच पहा. जीव पूर्ण ब्रह्मरुप झाला. ( म्हणजे आधी नव्हता, आता झाला असं नाही बरं !!! तर मूळचा ब्रह्मरुप होताच पण विसरला होता, त्याचा आठव झाला, अनुभव आला एवढेच.) ब्रह्म अनिर्वाच्य आहे. या निर्वचनीय **स्व-रूपाचा** (म्हणजे आत्मारामाचा) अनुभव चित्त पूर्ण **निर्विकल्प** झाल्यावरच येतो. म्हणून समर्थ सांगतात, गड्या कल्पनाच करायची ना तुला मग जड संसाराची नको तर निर्विकल्पाची करत जा. ''**निर्विकल्पासी कल्पित जावे।**'' आत्मारामाच्या ठिकाणी जाणीव राहत नाही. तेथेच अनिर्वाच्य अनुभव स्थिर राहतो. समर्थांनी म्हटलं की, ''**तें जाणीव जेथ विराली। तेथे अनिर्वाच्य बोलिली॥**''

आता ही शुद्ध जाणीव ज्ञानदशेत मुरत नाही. ती केवळ, फक्त भक्तिदशेत भगवत्-प्रेम-श्रीगुरुप्रेम-भावाने-भक्तीनेच मुरते. भक्तिप्रेमभाव नसेल तर ''**मी ब्रह्म**'' हा एक ज्ञानाचा बंध-अहंकार शिल्लक राहतो. हा अहंकार, ही जाणीव देवगड हापूस आंब्याच्या फोडीसारखा. आंबा झाला म्हणून काय झालं ??? तो किती काळ टिकणार ना ??? पण अशा आंब्याच्या परिपक्व रसाळ फोडी वाफवून साखरेच्या दोन तारी पक्क्या

पारदर्शक मधुर पाकात मुरल्या की **मुरंबा** होतो. ''**मी ब्रह्म**'' आंब्याची फोड तर भक्तिप्रेमरसायन हा साखरेचा पाक. ह्या प्रेमरसायनानेच निर्विकल्प स्थितीचा लाभ होतो. म्हणून बाबांनो, एक गोड अशी गोडालाहि गोडी प्राप्त करून देणारी हरिभक्तीच करा असा ज्ञानराजांचा आग्रह आहे. भक्तिशिवाय व्यर्थ गोष्टी-मार्ग टाका म्हणाले, ''**वाया व्यर्थ कथा सांडी मार्गु॥**''

पुढचं चरण असं आहे, ''**एक हरि आत्मा जीवशिव समा।**'' हरिपाठ या ग्रंथाचे हे महावाक्य आहे, भरतवाक्य आहे. या चरणात हरि, आत्मा, जीव व शिव अशी चार पदे चैतन्यवाचक आहेत. १) ''**हरि**'' म्हणजे ब्रह्मचैतन्य, जे या नामरुपात्मक विश्वाला अधिष्ठानभूत आहे. २) ''**आत्मा**'' म्हणजे कूटस्थ चैतन्य, जे स्थूल-सूक्ष्म देहांना अधिष्ठानभूत आहे. ३) ''**जीव**'' म्हणजे जीवचैतन्य. म्हणजे शुद्धसत्वगुणरुप बुद्धीत कूटस्थाचा आभास आहे आणि ४) ''**शिव**'' म्हणजे ईश्वरचैतन्य जो मायेत ब्रह्माचा आभास आहे. (जीवाला व्यष्टीची मर्यादा आहे आणि शिव हे समष्टिला व्यापून आहे, वस्तू एकच, पण मर्यादेमुळे/उपाधिमुळे नामभेद केवळ. स्वरुपभेद नाही हं !!!)

याचा सरळ अर्थ इतकाच, जीवाला अधिष्ठान असणाऱ्या चैतन्याला ''**आत्मा**'' म्हणतात आणि शिवाच्या अधिष्ठान चैतन्याला ''**हरि**'' म्हणतात. वास्तवात चैतन्य एकच पण उपाधिभेदाने नावे वेगळी. कृष्णाबाईच्या प्रवाहातलं पाणीच आणि घरात तांब्यात असलेले पण पाणीच ना ??? किंवा आणिक फोडून सविस्तर सांगायचं तर तांब्यातलं प्यायचं पाणी आणि वरच्या टाकीतलं वापरायचं पाणी, दोन्हीतलं पाणी एकच. त्यामुळे तसंच ''हरि'' आणि ''आत्मा'' यांच्यातील चैतन्य एकच.

म्हणून एक परब्रह्मच अधिष्ठानरुपाने जीव-शिव यांच्यात ''समा'' म्हणजे समरुपाने व्याप्त आहे. त्यामुळेच एकच अशा जीव-शिवांचा हरिशी अभेद आहे.

आपल्या अंत:करणात प्रतिबिंबित झालेल्या हरीला जीव म्हणतात, तर मायेत प्रतिबिंबित झालेल्या हरीलाच शिव म्हणतात. असं कां म्हणाल तर

उपाधिभेदामुळे. उपाधी भिन्नच असते. पण उपाधीत असणारे उपहित एकच असते. म्हणून सगळ्याचं सार सांगतो, **"जीव-शिव दोन्ही हरिरुपी तरंग।"** एकच श्रीहरि या जलाशयावर उमटलेल्या दोन लहरी. लहरी दोनच काय असंख्य पण ज्या पाण्यावर उमटतात ते पाणी एकच.

एक परब्रह्मस्वरूप **"हरि"**च अधिष्ठानरुपाने, जीव-शिव यांच्यात समा म्हणजे समव्याप्त आहे. त्यामुळे जीव-शिवांचा परब्रह्म "हरिशी" अभेद आहे, जसा शिष्याचा श्रीगुरुशी अभेद आहे, एकस्वरूपच आहेत, एकाच अधिष्ठानी असणारे दांपत्यासारखे तरंग आहेत. श्रीहरि एक आहे म्हणजे तो स्वगत, सजातीय, विजातीय, भेदशून्य आहे. १) हरी निरवयव असल्यामुळे स्वगत भेद नाही. २) जीव-शिवात एक हरीच समान असल्यामुळे सजातीय भेद नाही. ३) हरिशिवाय जगात आणि जगाला स्वतंत्र सत्ता, अस्तित्व नाही; त्यामुळे विजातीय भेदही नाही.

श्रीतुकोबाराय काय म्हणतात जरा पहा नां! **"दुजे खंडे तरी। उरला तो अवघा हरि।"** **"जीवो ब्रह्मैव नापर:"** असे भगवत्पूज्यपाद आद्य श्रीशंकराचार्य पण म्हणतात. **"सर्व भूतांच्या अंतरी। मी आत्मारामच वास करी"** असा भगवंताचा निर्वाळा. शिष्य म्हणतो, "माझ्या हृदयसिंहासनावर **श्रीगुरूच** स्थानापन्न आहेत. आपले ज्ञानोबाराय निर्वाळा देत आहेत, **"मज हृदयी सद्‌गुरू"** आणि श्रीगुरूपण मोकळेपणाने कबूल करतात की, मी आत्मस्वरूपाने/चैतन्यस्वरूपाने माझ्या शिष्याच्या अंत:करणात विराजमान झालेला असतो. **"अहं आत्मा अमीषां, भूतानां सुहृदेश्वर:॥"** असं महामती श्री व्यासांनी भगवंताच्या मुखी वचन घातले आहे. संत म्हणतात, **"जीवशिवाचा संयोग। हाचि माझा राजयोग। भेदभाव हारपला। हरी एकला संचला॥ श्रीगुरूशिष्याचा एक योग। हाचि एक ऐश्वर्ययोग। दोनपणा संपला। सच्चिदानंद कोंदला॥"**

सारांश काय तर एका सच्चिदानंद, आनंदकंद भगवंताचीच **अद्वैत** स्वरूपता.

म्हणून ज्ञानराजांनी पुढं सांगितले, “**वाया तू दुर्गमा न घाली मन॥**” वाया म्हणजे निष्फळ; फुकट; व्यर्थ इत्यादी. दुर्गम शब्दाचे दोन अर्थ होतात १) “**दुःखेन गम्यते, ज्ञायते इति दुर्गमा।**” म्हणजे कष्टाने ज्याचे ज्ञान होते; असे कळण्यास अत्यंत कठिण आणि दुसरा अर्थ २) “**दुष्टं गमनं ज्ञानं येषु इति।**” म्हणजेच ज्या मतामध्ये ज्ञान दुष्ट म्हणजे सदोष आहे; बाधित आहे; त्रिपुटी सापेक्ष आहे (म्हणजे ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान अशी तीन अंग आहेत) अशा भेदप्रतिपादक मतांकडे/अनेक मतमतांतरांकडे तू मन घालू नकोस. मुळीच लक्ष देऊ नकोस. श्रीतुकाराम महाराज म्हणाले, “**बहुतांची बहुत मते। अवघ्या रिती पोकळ॥**” मतं पोकळ असतात; आणि सिद्धांत ठोस-भरीव असतो. सिद्धांताच्या विरोधी जी मते आहेत ती सारीच्या सारी साधकाच्या/नामधारकाच्या मनांत संशयाचे घोर जाळे विणणारी आहेत; त्या विघ्नकारी मता-मतांतराकडे तू मन अजिबात घालू नकोस, असा आपल्या माऊलीचा कळकळीचा उपदेश आहे. **नामा** शिवाय अन्य मार्ग दुर्गम कां? तर त्यात अहंकाराचे दगड-गोटे-खड्डे-उंचवटे-अडथळे आड येतच राहतात. म्हणून अन्य मार्गात मन न घालता **(वर वर पाहतां तो जरी किती सोपा-गोड भासला तरी)** एक अखंड हरिपाठ-नामपाठ कर.

या अभंगाच्या शेवटच्या चरणात श्रीगुरूज्ञानराजमाऊली साधकाला-नामधारकाला मार्गदर्शनपर विश्वास वाटावा म्हणून आपला स्वानुभव सांगतात-

“**ज्ञानदेवा पाठ, हरि हा वैकुंठ। भरला घनदाट हरि दिसे॥**”

म्हणताहेत, **हरि-हरि** हाच पाठ मी करतो. नित्य एक हरि-नामस्मरणच करतो. दुसरं-तिसरं काहीच करत नाही. “**आणिक काही नेणे धंदा। नित्य ध्यातसे गोविंदा॥**” “**सदा नामघोष करुं हरिकथा।**” अशी किती प्रमाणं द्यावीत नां? “**दिन-रजनी हाचि धंदा। गोविंदाचे पवाडे॥ प्रेम चालिला प्रवाहो। नाम ओघ लवलाहो॥**” एवढंच काय, सगळ्या आत्मसाक्षात्कारी महावैष्णवांचे एकच जीवन व्रत-कोणते? तर अखंड “**नामस्मरण.**”

या नामस्मरणामुळे काय अनुभव येतो? म्हणाल तर, नामानेच भूमीवर-येथेच वैकुंठ निर्माण होते; आणि या नामानेच वैकुंठ म्हणजे एक श्रीहरीच सर्वत्र, घनदाट म्हणजे ओतंच-प्रोतंच भरून असल्याचा **प्रत्यय** येतो. हरिपाठ करणाऱ्याला (म्हणजे अखंड नामस्मरण करणाऱ्याला) अशी सच्चिदानंद-चिद्घनानंद आनंददृष्टी/आत्मदृष्टी प्राप्त होते. काला वितरणाचा सुविख्यात अभंग! त्याचं पहिलं चरण पहा ना. काय आहे ते चरण?

**कंठी धरला कृष्णमणि। अवघा जनी प्रकाश॥**

अहाहा!!! काय सुंदर आहे नां? या आत्मदृष्टीलाच परमसिद्धी म्हणतात. भक्तीप्रेमाची हीच परमसीमा आहे.

वैकुंठ म्हणजे श्रीहरीचे नित्य निवासस्थान. ते चतुर्दश भुवनांच्या वर आहे. तथापि हे स्थान म्हणजे काही भौगोलिक स्थान नव्हे. कारण तत्वत: ते आपल्यापासून लांब नाही. अगदी जरासुद्धा. **प्रेमळ भक्ताचे हृदय** हेच श्रीहरीचे निवासस्थान, अगदी कायम स्वरूपाचे. शिष्याचे प्रेमळ/निर्मळ अंत:करण हेच श्रीगुरूंचे सुखासन-सुखनिवास-सुखधाम!!!

नामधारक अशा भक्तराजाचे हृदय हेच भगवंताचे कायमस्वरूपी असे निवासस्थान. **''साधवो हृदयं मह्यं। साधूनां हृदये तु अहम्''** असं श्रीमद्भागवतात म्हणतात. (साधूंचे हृदय माझे आहे, आणि त्यांच्या हृदयात मीच आहे.) पण भगवान आपणहून आपल्या हृदयात कायमस्वरूपी येऊन निवास करण्यासाठी नामावर केवढी दांडगी निष्ठा हवी; की ज्या निष्ठमुळे **भय** संपते. असं घडण्यासाठी हरिनाम नामस्मरणस्वरूप उपासना उदंड केली पाहिजे.

प्रमाद, आळस, अज्ञान, निद्रा इत्यादी अनर्थकारक प्रवृत्तीला कुंठीत करणारे ते वैकुंठ. म्हणजे अपप्रवृत्तीची गती कुंठीत करणारे-थांबवणारे असा वैकुंठ शब्दाचा एक अर्थ. जाणिवशक्ति जाणता-जाणता जेथे थांबते, पुढे सरकूच शकत नाही अशी स्थिती म्हणजे वैकुंठ. नदी सागराला मिळाल्यावर जसा नदीप्रवाह कुंठित होतो. कां तर सागरस्वरूपच होतो म्हणून प्रवाह

थांबतो. "**कांत मिळाल्या एकांती। कांतापाशी स्थिर होय॥**" याप्रमाणे जाणीवच भगवंत होऊन जाते. शिष्यच गुरूपदी आरूढ होतो.

हे कार्य ज्याचे नाम, तो नामी श्रीहरि स्वत:च करीत असल्याने, भगवंत स्वत:च वैकुंठस्वरूप आहे. म्हणून अशी श्रीहरिप्राप्ती साध्य करून घेणं हीच वैकुंठ प्राप्ती होय!!! आणि म्हणून **हरिपाठ** हा श्रीहरिप्राप्ती करून घेण्यास साधनभूत होत असल्याने हरिपाठ सुद्धा वैकुंठच. एरव्ही साधन आणि साध्य यांच्यात फरक असतो. साध्य हाताशी आल्यावर साधनाची गरज उरत नाही. "**तृप्ती झालीया जैशी। साधने सरती आपैशी॥**" पण **नाम-साधन** मात्र याला अपवाद आहे. नामामध्ये साध्य-साधनाचा अभेद आहे. नामाने भगवंत नाही; तर **नामच भगवंत.** "**नाम परब्रह्म वेदार्थे॥**"

भगवंत जेवढा निरूपाधिक, तेवढेच त्याचे नाम पण निरूपाधिक, नामाने निरूपाधिक अशा श्रीहरीच्या ज्ञानाने म्हणजेच अनुभवाने जगत्‌भासाला कारण असणाऱ्या मायेचा यथार्थ बोध **(म्हणजे बाध)** झाला असता, हरी हाच वैकुंठ आहे, असा दृढ अनुभव येतो. विष्णुसहस्त्रनामात **वैकुंठ** असं भगवंताचे एक नाम सांगितले आहे. भगवंताच्या अनंत अवतारात **वैकुंठ** नावाचा एक अवतार भागवतात सांगितला आहे. शुभ्र नावाचे ऋषी व त्यांची विकुंठा नावाची पत्नी ह्या उभयतांच्या ठिकाणी **वैकुंठ** नावाने भगवान अवतीर्ण झाले. वैकुंठ शब्दाची व्युत्पत्ती अशी. "**विगता कुंठा यस्य स विकुंठो, विकुंठ एवं वैकुठ:**" ज्यास कुंठा म्हणजे अवरोध-प्रतिबंध नाही, असा तो **वैकुंठ.** भगवंत असाच आहे. त्याला कोणीही प्रतिबंध करू शकत नाही. जसा सत्‌शिष्य आपल्या श्रीगुरूंना आपल्या हृदयात प्रवेश करायला अडवू शकत नाही.

या अभंगात पुढे श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणताहेत, "**भरला घनदाट हरि दिसे।**" हा हरि असतो तरी कुठे ??? तर सर्वत्र, घनदाट, अगदी ओतप्रोत. "**व्याप्य-व्यापक**" निरपेक्षपणे व्यापकरुपाने भरला आहे. "**दिसे**" या क्रियापदाचा अर्थ आहे. "**अनुभवास येतो आहे.**" गोपींचा अनुभव आहे

''**आत हरि, बाहेर हरि। हरीने घरी कोंडीले॥**'', ''**हरि येथे रें, हरि तेथे रें॥**, ''**देखा तो सब वोहिने घरो॥**'' **सर्वत्र संपूर्ण गगन जैसे॥**'' आणि काय ? काय ? म्हणून त्याची व्यापकता सांगावी ना ???

**हरि** मूलत: निराकार-निरवयव-निरंजन. मायाबद्ध जीवांना त्याचे हे निरुपाधिक-चिद्रूप पाहता-जाणता येणार नाही. म्हणून प्रतीकात्मक स्वरूपांत त्याची उपासना करावी लागते. या सगुण उपासनेत-**सगुणाच्या** प्रेमाने भक्तीप्रेमभावाची निष्ठेने धार धरली **(अभिषेक)** तर अज्ञानाचा संपूर्ण निरास होतो आणि नंतर श्रीहरि-चैतन्याची-ब्रह्मचैतन्याची अमूर्त स्वरुपाची-व्यापकत्वाची प्रतीती सर्वत्र-सर्वकाल-सर्ववस्तूत: सदासर्वदा होऊ लागते.

श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''**ऐसे ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल। जै गुरुकृपा होईल। पार्था गा॥ ते वेळी आपणपेया सहिते। इथे अशेषेहि भूते। माझ्या स्वरूपी अखंडिते। देखसी तूं॥**'' ''**चित्त-चैतन्या पडता मिठी। दिसे हरिरुप अवघी सृष्टी।**'' ज्याची देहभावना गळून पडते त्याची हरिभावना वाढते-वाढता-वाढता सर्वव्यापक होते. नामाने साधनकालात पांडूरंगाची चिन्मय मूर्ती मन:चक्षूपुढें सतत तरळत रहाते. तो आपल्या जवळ सतत आहे, अशी भावना-अनुभव दृढ होतो. ''**जैं कृष्ण होय अंत:करण। तैं कृष्णचि होईजे आपण। मग सर्वत्र कृष्णदर्शन। दिसो लागे॥**''

* * * * *

# अभंग क्र. ३

**त्रिगुण असार, निगुण हे सार। सारासार विचार हरिपाठ॥१॥**
**सगुण निर्गुण गुणाचे अगुण। हरिविण मन व्यर्थ जाय॥२॥**
**अव्यक्त निराकार नाही ज्या आकार। जेथोनि चराचर हरिसी भजे॥३॥**
**ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी। अनंत जन्मांनी पुण्य होय॥४॥**

"**गुण**" म्हणजे दोरी, बंधन, पाश. "**त्रिगुण**" म्हणजे सत्व, रज, तम हे तीन गुण. सर्व जीवांना पाशबद्ध करतात, मोहात अडकवितात. भगवान गीतेत सांगताहेत, "**त्रिभिः गुणमयैः भावैः एभिः सर्व इदं जगत् मोहितं॥**".... आणि हे त्रिगुण प्रकृतिकार्य आहेत.

"**सत्व, रज, तम इति गुणाः प्रकृति संभवाः॥**" या त्रिगुणांची उत्पत्ती प्रकृतीपासूनच आहे आणि प्रकृती "मिथ्या" आहे. म्हणून ओघातच त्रिगुणही मिथ्या आहेत. असार म्हणजे मिथ्या. सार म्हणजे सत्य. जे नित्य असते तेच सत्य. जे त्रिकालाबाधित आहे तेच सत्य आहे. असत् म्हणजे दिसणारे पण प्रतीतीला न येणारे. उदाहरणार्थ शशशृंग, मृगजळ इत्यादी. त्रिगुणात्मक प्रकृती सत् नाही. कारण हरीच्या प्रमात्मक ज्ञानाने बाधीत होते. बर ते असत नाही म्हणजे खोटे नाही कारण दिसते. जे सत्-असताहून भिन्न-अनिर्वचनिय असते ते मिथ्या असते. सत्स्वरुप हरीहून त्रिगुणात्मक प्रपंच अगदीच भिन्न गुणांचा असल्यामुळे असार म्हणजे मिथ्या आहे.

श्री तुकोबाराय म्हणतात, "**तुजविण काही। स्थिर राहे ऐसे नाही॥**" त्रिगुण हे दृश्य, जड व मर्यादित असल्यामुळे असार म्हणजे मिथ्या आहेत. जे दृश्य असते ते नष्ट होते, जे जड असते ते नाश पावते. म्हणून त्रिगुणात्मक जगत् नाशिवंत आहे. ते परिच्छिन्न आहे म्हणून ते असार म्हणजे मिथ्या आहे. जे जे विकार पावते, क्षय-वृद्धी-नाश पावते ते सर्वच्या सर्व असार आहे. जे सर्वकाली निर्विकार राहते, ते सार आहे. जे जे त्रिगुणात्मक, विकारी व

विनाशी ते ते असार आणि जे सर्वकाल, सर्वदेश, निर्विकारी-अविनाशी आहे, त्रिगुणात्मक नाही ते **सार**.

आपले एकनाथ महाराज म्हणतात - "**गुणा आदि मध्य अवसानी। सृष्टी उत्पत्ती स्थिती निदानी। जे असे अविनाशपणी। ते मी मानी संतत्त्वे॥ हे जगचि होय जाये। परि ते संचरले आहे। ऐसी जे निजवस्तु आहे। ते तू पाहे संतत्त्वे॥**"

सार म्हणजे उपाधिरहित, "**सरति गच्छति उपाधिर्यस्मात्।**" आणि असार म्हणजे उपाधियुक्त, "**न सरति उपाधिर्यस्मात्॥**" त्रिगुण असार म्हणजे उपाधियुक्त आहेत व निर्गुण सार म्हणजेच उपाधिरहित आहे. निर्गुण म्हणजे निर्विशेष. ज्ञानराज म्हणतात, "**नामरुप संबंध। जाति क्रिया भेद। हा आकारासीच प्रवाद। वस्तुसी नाही॥**"

निर्गुणाचे स्पष्टीकरण माऊलींनी केले आहे, "**सकळ ना निष्कळ। अक्रिय ना क्रियाशील। कृशना स्थूल। निर्गुणपणे॥**" निर्गुणच सार म्हणजे सत्य आहे. सत्य आणि मिथ्या यातील भेद/फरक कळणे म्हणजेच **सारासार** विचार. हा सारासार विचार कळण्याचा उपाय एक हरिपाठच. हा केवळ हरिपाठानेच कळतो. याचाच अर्थ असा, हरिनामस्मरण हेच सार.

हरिनामस्मरणाने उपाधीची जाणीव नाहीशी होते. त्रिगुणात्मक आणि त्रिगुणरहित यातला फरक या एका हरिपाठाने म्हणजे हरिनामस्मरणाने नाहीसा होतो. म्हणून हरिनामस्मरण करा असा ज्ञानराजांचा आग्रह.

सगुणत्त्व व निर्गुणत्त्वाचा विचार "**सगुण निर्गुण, गुणाचे अगुण। हरिविण मन व्यर्थ जाय॥**" अत्यंत मार्मिकपणे केला आहे. सगुणत्त्व आणि निर्गुणत्त्व हे भेद गुणाचे म्हणजे गुणावर अवलंबून आहेत आणि हरि हा "अगुण" आहे. अगुण हा उभयनिरपेक्ष शब्द वापरून ज्ञानोबारायांनी हरि हा "सगुण-निर्गुण" द्वंद्वापासून वेगळाच आहे हे सांगितले आहे. अगुण म्हणजे ज्याचा त्रिगुणांशी काही एक संबंध नाही असा. हरी असा आहे. त्याचे नाम पण असेच आहे.

भगवंताला कोणत्याच प्रकारची सापेक्षता लागू शकत नाही. कारण श्रीहरी निरपेक्ष व्यापक आहे. निर्गुणही म्हणजे गुणरहित जरी असला तरी तेथेही निषेधरुपाने गुणांचा संकेत आहेच. श्री समर्थ रामदास स्वामी म्हणतात, "**ऐसे जे गुणरहित। तेथे नामाचा संकेत। तोचि जाणावा अशाश्वत। निश्चयेसि॥**" सगुणपणा तसेच निर्गुणपणासुद्धा अशाश्वत आहे. (म्हणजे निर्गुणपणा हा पण एक गुणच आहे ना ???) श्रीहरी हा या सगुण-निर्गुणाच्याही पलीकडे आहे, शाश्वत आहे.

अशा भगवंतावाचून अन्य विषयाकडे मन जाऊ देणे व्यर्थ आहे. "**सगुण निर्गुण, गुणाचे अगुण।**" या चरणाचे विविध अर्थ संभवतात. १) सगुण-निर्गुण गुणाचे आहेत. "अगुण" या दोहोंहून वेगळा आहे. २) सगुण हेच निर्गुण आहे. गुणाचे अगुण आहे. म्हणजे सगुण साकार असतानाही भगवंत परमार्थत: निर्गुण-निराकार परब्रह्मच आहे. गुणाचे म्हणजे त्रिगुणात्मक जगाचे अंतिम तत्त्व "अगुण" म्हणजे निरुपाधिक श्रीहरीच आहे. आणि ३) सगुण गुणाचे आहे आणि निर्गुण अगुण आहे. सगुण म्हणजे कार्य-कारणात्मक जगत् गुणाचे म्हणजे मायासंबंधी/मायाकार्य आहे आणि निर्गुण श्रीहरी अगुण म्हणजे कार्य-कारणातीत आहे, मायातीत आहे. सगुण म्हणजे त्रिगुणात्मक बद्ध जीव गुणाचे म्हणजे संसारी आहेत तर अगुण म्हणजे निर्गुण श्रीहरी असंसारी आहे. अशा असंसारी हरिशिवाय (श्रीहरीच्या अनुभवाशिवाय) मन फुकट/व्यर्थ आहे. "**हरिविण मन व्यर्थ जाय।**"

"**तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा। येर तो पसारा वाऊगाचि॥**" एक श्रीहरीच सुखरुप आहे. जसा हरी सुखरुप तसेच त्याचे नामही सुखरुपच. म्हणून त्याच्या ठिकाणी, त्याच्या नामात मन ठेवणे हेच योग्य. अशा हरीच्या-नामाच्या ठिकाणी मन ठेवले तर चंचल अशा मनाची धाव मोडेल. श्री तुकोबारायांनी आपला अनुभव सांगितला. म्हणाले, "**आता कोठे धावे मन। तुमचे चरण देखिलिया॥१॥ भाग गेला, शीण गेला। अवघा झाला आनंद॥२॥ प्रेमरसे बैसली मिठी। अवडी लाठी मुखासी॥३॥**

**तुका म्हणे आम्हा जोगे। विठ्ठल घोगे खरे माप॥४॥**'' श्री एकनाथ महाराजपण ग्वाही देतात, ''**अवघेचि त्रैलोक्य आनंदाचे आता। चरणी जगन्नाथा चित्त ठेले॥**'' गीतेत भगवंत पण सांगत आहेत, ''**मय्येव मन आधत्स्व**'' ज्ञानोबारायांचे भाष्य तर फारच सुंदर, ''**तू मन हे मीची करी। माझ्या भजनी प्रेम धरी। सर्वत्र नमस्कारी। मज एकाते॥**''

चित्ताचा चैतन्याशी संयोग जडला तरच या जन्माचे सार्थक आहे. तेव्हा हे चित्त, जे हरीच्या-आनंदाच्या-आनंदकंद अशा पांडुरंगाच्या ठायी ठेवायचं तर त्या श्रीहरीचं स्वरूप कसं आहे हे आधी माहित व्हायला पाहिजे. नाही का ???

चंचल अशा मनाला एका हरिचे ठायी ठेवा, हरीचेच भजन करा असे सांगण्याचे कारण, सामान्यांना अव्यक्त स्वरुपाची उपासना करणे अशक्य असते. श्रीहरी सगुण-साकार असला तरी त्याची अव्यक्त निराकार स्थिती त्याच्या सगुण-साकार स्थितीतही कायम असते. म्हणून ज्ञानोबाराय सांगतात, ''**अव्यक्त निराकार, नाही ज्या आकार।**''

आद्य श्री शंकराचार्यांनी ''**तदव्यक्तमाह हि**'' या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात अव्यक्त म्हणजे ''**इंद्रियांना गोचर न होणारे**'' (म्हणजेच काय तर कोण्याही स्थूल इंद्रियाला न कळणारे) असा अर्थ दिला आहे. निराकार म्हणजे देश-काल-वस्तूंनी मर्यादित नसणारे. ज्ञानेश्वरीत श्रीगुरु म्हणतात, ''**जयाते अव्यक्त म्हणो ये कोठे। म्हणता स्तुति ऐसे नावडे। जे मना बुद्धी न सापडे। म्हणरुनिया॥**'' गीतेत भगवान स्वत: सांगतात, ''**अव्यक्त अक्षर इति उक्त तयाहः परमांगतियम्।**''

तो श्रीहरी ज्ञानस्वरुप आहे, स्वयंप्रकाश आहे, स्वसंवेद्य आहे. ''**साक्षीचेता केवलो निर्गुणश्च**'' असा आहे. ''**नाही रुप, नाही नांव। नाही ठाव धरावया॥**'' असं त्या अव्यक्त स्वरुपाचे सर्वांनी वर्णन केले आहे. तात्पर्य काय तर नाम सगुण आहे तसेच निर्गुण आहे. नाही-नाही तर नाम सगुण-निर्गुणाचेही पलीकडे केवळ **आनंदच** आहे.

महात्म्यांनी परमात्म्याच्या निर्गुण स्वरुपाचे वर्णन केले आहे. तसे त्याच्या सगुणस्वरुपाचे वर्णन पण केले आहे. **"नाही रुप नाही नाव। नाही ठाव धरावया॥"** असं वर्णन निर्गुणाचं केल्यावर **"गुण आला विटेवरी। पितांबरधारी सुंदर॥"** असं सगुण स्वरुपाचं वर्णन श्री तुकोबारायांनी केलेच आहे. आकाराला येणाऱ्या सगळ्याला नाम, रुप, संबंध, जीव, क्रिया, भेद हा प्रवाद तर आहेच आहे, पण काय मौज आहे पहा, परमात्मा आकाराला येऊन नामरुपांनी प्रकट झाल्यावरसुद्धा तो या सगळ्या प्रवादाच्या पलीकडे आहे. श्री ज्ञानराज म्हणतात, **"नाम, रुप, संबंधु। जाति, क्रिय, भेदू। हा आकारासीच प्रवादू। वस्तुसि नाही॥"**

म्हणून ह्या परमात्म्याला **"नाही ज्या आकार"** म्हटले आहे. सगुण साकार होऊनही **"हा"** अव्यक्त निराकारच आहे. आकार जड असतो, पण भगवंत आकारात येऊनही "चित्त" आहे. आकार म्हटला की तो नाशवंत असतोच पण हा मात्र अविनाशी आहे. आकार मर्यादित असतो, हा **बेटा** अमर्याद आहे. म्हणून श्री ज्ञानेश्वर महाराजांनी सगुण साकार असा झाल्यावरसुद्धा "श्रीहरीला" नाही ज्या आकार म्हटले आहे. अव्यक्त, निर्गुण, निराकार स्वरुप सदा जसेच्या तसे अबाधितच राहते.

पुढचं चरण आहे..... **"जेथोनि चराचर हरिसी भजे॥"** जेथोनि म्हणजे ज्या कारणापासून चराचर म्हणजेच स्थावर-जंगम जगत् कार्य उत्पत्तीला येते. "जेथोनि चराचर" या शब्दात तीन लक्षणे संभवतात. १) जेथोनि चराचर उत्पन्न होतात तो हरि. २) जेथोनि चराचर स्थितीला प्राप्त होतो तो हरि. आणि ३) जेथोनि चराचर लयाला जातात तो हरीच. भगवान स्वमुखाने गीतेत म्हणाले आहेत, **"मीचि एक सर्वा। या जगा जन्म पांडवा। मजचिपासूनि आघवा। निर्वाहो यांचा॥"** एका हरीच्या सत्तेतच उत्पत्ती, स्थिती आणि लय हे सर्व त्या भगवंताच्याच ठिकाणी घडते.

म्हणून आपल्या श्री तुकारामांनी सांगितले, **"चाले हे शरीर कोणाचिये सत्ते। कोण बोलविते हरिवीण। देखवी, ऐकवी, एक नारायण। तयाचे**

**भजन चुको नका॥''** श्री ज्ञानराज माऊली पण सांगताहेत, **''हरिसी भजे।''** एका भगवंताच्याच प्रकाशानेच अखिल दृश्य प्रकाशित होते, ज्ञात होते. अशा त्या ज्ञानस्वरुप श्रीहरीलाच भजा. **''पाहे पां, ॐ तत्सत् ऐसे। हे बोलणे तेथ नेतसे। जेथोनि का प्रकाशे। हे दृश्यजात॥''** म्हणून म्हणतात, **''हेचि भक्ति, हेचि ज्ञान। एक विठ्ठलचि जाण॥''** या अभंगाच्या शेवटच्या चरणात ज्ञानोबारायांनी आपला स्वानुभव सांगितला आहे.

### ''ज्ञानदेवा ध्यानी, रामकृष्ण मनी।''

नामस्मरणाचे दोन प्रकार आहेत - काहीजण नामाचा केवळ मानसिक जपच करतात. त्या नामजपाबरोबर आपल्या उपास्य देवतेची (की ज्याच्या नामाचा जप करतात) फक्त भावनाच ठेवतात. ज्या स्वरुपाचे नाम त्या नामीची भावना त्यांच्या चित्तात उत्पन्न झालेली असते (निदान नामाबरोबर, प्रत्येक नामाबरोबर उत्पन्न तरी व्हावयासच हवी, तरच नामस्मरण) नाम व नामी यातील अभेद जाणून ते नामावरच निर्भर असतात.

ही मंडळी नामावरच उपास्य देवतेची भावना ठेवतात. जसं आपण तांदूळाच्या राशीवरील सुपारीवर विघ्नविनायक गणेशाची भावना करतो पण आपल्या उपास्य देवतेच्या सगुण-साकार स्वरूपाचे स्पष्टरित्या ध्यान करत नाही. उत्तम पक्ष तो की **''नामजपाबरोबर-नामस्मरणाबरोबर आपल्याला प्रिय असणाऱ्या भगवंताच्या सगुण-साकार-चेतन स्वरुपाचे ध्यान करावे.''** श्री तुकाराम महाराज तर म्हणतात, **''बोलावा विठ्ठल, पहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव॥''**

''बोलावा'' मधून **नाम** व ''पहावा'' मधून **ध्यान** सांगून श्रीतुकोबा जीवभाव विठ्ठल म्हणजेच काय तर **ब्रह्मभाव** करावा असे सांगत आहेत. श्रीगुरु ज्ञानराजही ध्यानासहित नामस्मरणाचा अनुभव या चरणात प्रकट करत आहेत. काय म्हणताहेत पहा ना !!!, माझ्या ध्यानात आणि मनात अखंडाकारतेने राम-कृष्ण-हरि आहे त्यामुळे.....

## ''अनंत जन्मोनि पुण्य होय।''

या जन्मात किंवा जन्माला येऊन अगणित पुण्याची जोड होत आहे. ''**जन्मजन्मांतरी असेल पुण्यसामग्री। तरीच नाम जिव्हाग्री येईल श्रीरामाचे॥**'' ध्यानी मनी रामकृष्ण म्हणण्यात भगवत् साक्षात्काराचे साधन, नामाचे मनन-निदिध्यासन आहे असेच ते सांगताहेत. ''**या अनुस्मरतः चित्तं मय्यैव प्रविलीयते।**'' असे भागवतकार पण सांगतात. म्हणून सांगतात, ''**हरिमुखे म्हणा, हरिमुखे म्हणा**'' आणि त्याचबरोबर त्याच्या रुपाचे ध्यान करा.

* * * * *

# अभंग क्र. ४

**भावेविण भक्ति, भक्तिविण मुक्ति। बळेविण शक्ति, बोलू नये॥१॥**
**कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित। उगा राहे निवांत, शिणसी वाया॥२॥**
**सायास करिसी, प्रपंच दिननिशी। हरिसी न भजसी कवण्या गुणे॥३॥**
**ज्ञानदेव म्हणजे हरिजप करणे। तुटेल धरणे प्रपंचाचे॥४॥**

ज्ञानराजांनी या अभंगात **भावभक्तीचे** माहात्म्य सांगितले आहे. भावावाचून भक्ती नाही व भक्तीवाचून मुक्ती नाही. शरीरात बळ असल्यावाचून शक्तीने होणारी कोणतीही महत्त्वाची गोष्ट होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे **भाव**रहित माणसाकडून भक्ती होऊ शकत नाही व भक्तीहीन मनुष्य मोक्ष मिळवू शकत नाही (तर मोक्षावर मुकूटासारखा विराजमान होणारा **भक्तीप्रेमसुखभाव** काय अनुभवणार ???) भाव म्हणजे तरी काय ? आणि भावाचे स्वरुप तरी काय ?

भाव म्हणजे अस्तित्व. भगवंताच्या अस्तित्वाविषयी दृढ, अढळ श्रद्धा अंत:करणात नितांत असणे हे भावाचे स्वरूप. सर्वत्र एक फक्त त्याचीच सत्ता आहे, एका भगवंतावाचून/श्रीगुरुस्वरूपावाचून अन्य वस्तूच नाही असा दृढ विश्वास म्हणजे भाव. भगवंताच्या ठिकाणी असणारी अलोट करुणा, दया, क्षमा, घनदाट प्रेम, यावर असलेला पूर्ण विश्वास म्हणजे भाव. असा भाव हा भक्तीचा प्राण आहे. भगवंतावर/श्रीगुरुवर असणारे अत्मवत प्रेम म्हणजे भाव. त्याच्या अगाध, अमर्याद सामर्थ्याविषयी पक्की खात्री असणे म्हणजे भाव. हा भावही निष्कपट हवा, संशयरहित हवा. पूर्णत्वाचा आणि अतूट-अपरंपार हवा.

‘‘**तुका म्हणजे मुख्य पाहिजे हा भाव। भावापाशी देव शीघ्र उभा॥**’’ आपले एकनाथ महाराजही म्हणतात, ‘‘**भाव तोचि देव, भाव तोचि देव। ये अर्थी संदेह धरू नको॥**’’

**भाव** हा शब्द या प्रस्तुत अभंगात "**प्रेम**" या अर्थाने आला आहे. म्हणूनच भावेविण भक्ती म्हणजेच प्रेमरहित भक्ती व्यर्थ आहे असे माऊली म्हणतात. "**प्रेमविण श्रुतिस्मृति ज्ञान। प्रेमेविण ध्यान पूजन। प्रेमेविण श्रवण कीर्तन। वृथा जाण नृपनाथा॥**" असं "**एकनाथी भागवतात**" ही म्हटलं आहे. श्रीनाथराय आपल्या हरिपाठातही "**प्रेमाविण भजन, नाकाविण मोती। अर्थाविण पोथी वाचून काय ?॥**" असंच म्हणतात.

परमार्थप्राप्तीसाठी केल्या जाणाऱ्या श्रवण, मननादी सर्व क्रिया जर शुद्ध व निष्काम भावनेने केल्या तरच त्यांचा भक्तीत समावेश होतो. ज्ञानेश्वर महाराज म्हणाले, "**एक भाव नाही माझा। तरी पाल्हाळ ते॥**" समर्थ म्हणाले, "**जैसा भाव जयापाशी। तैसा देव तयासी। जाणे भाव अंतरसाक्षी। प्राणिमात्रांचा॥**" म्हणून भाव म्हणजे **प्रेम**, परमप्रेम आणि भक्ति म्हणजे परमप्रेमाने प्रकटणाऱ्या, परमप्रेमास्पद **आनंदकंद** भगवंताकडे अविरत, अखंड धावणारा अंत:करणाचा **भावप्रवाह** !!!

"भक्तिरसायन"कार तर म्हणाले, "**द्रुतस्य भगवद्धर्मात् धारावाहिकतां गता। सर्वेशे मनसो वृत्ति: भक्ति: इति अभिधीयते॥**" भक्तीचा गाजावाजा म्हणजे भक्ती नव्हे. व्रते, वैकल्ये, उपास, तापास, जप-जाप्य यांचे सोहळे म्हणजे भक्ती नाही तर नसलेल्या प्रेमाचे प्रदर्शन-विडंबनच. खरी भक्ती अथांग, अबोल आणि आंतरिक असते, त्याच प्रदर्शन नसते. भक्तीप्रेम नसताना लौकिक, शिष्टाचार म्हणून सोंग करतात. "**मोले घातले रडाया। नाही आसू आणि माया॥**" याचा काय उपयोग ना ???

अंगात शौर्य नसताना शूरत्त्वाच्या वल्गना करणं योग्य नाही. तसंच भगवंताबद्दल/श्रीगुरुबद्दल अकृत्रिम प्रेमाचा आंतरिक जिव्हाळा नसताना भावशून्य भक्तिक्रियाकरण निरर्थकच. शुद्ध प्रेमानेच क्रियेला मूल्य प्राप्त होते. भृगूचा लत्ताप्रहार हा प्रियोपचार झाला. आपल्या जनाबाईच्या शिव्यादेखील भक्तीत जमा झाल्या. विदूरपत्नीच्या केळीच्या साली, शबरीची बोरे,

सुदाम्याचे पोहे पंचपक्वान्नापेक्षाही अमृतस्वरुप झाले. भक्ती अशी **गोड** आहे. भक्तीचे योगाने अवघंच गोड ऽ गोड होऊन जातं, अमृतापेक्षाही.

भक्ती कशी आहे ? तिचं स्वरुप काय ? नारदमुनी तर म्हणतात, "**अनिर्वचनीयं, प्रेमस्वरुपम्। मुकास्वादनवत्॥**" आपले तुकोबाराय पण म्हणतात, "**प्रेम नसे सांगता, बोलता, दाविता। अनुभवे चित्ता चित्त जाणे॥**" श्री भक्ताचार्य नारदांनी प्रेमाची अनुभवसिद्ध व्याख्याच केली आहे, "**गुणरहितं, कामनारहितं, प्रतिक्षण वर्धमानं, अविच्छिन्नं, सूक्ष्म तरं, अनुभव रुपम्॥**" १) भक्तिप्रेम हे गुणरहित आहे, गुणांचा प्रवेश झाला की सकामता निर्माण होते, २) खऱ्या प्रेमभावात कोणतीही कामना नाही. श्रीगुरु ज्ञानोबाराय म्हणतात, "**माझेनि कामे सकाम। माझेनि प्रेमे सप्रेम। माझिया भुली सभ्रम। नेणती लोकू॥**"

एका आनंदकंद, श्रीगुरुवाचून अन्य कामना नसणे हीच निष्कामता. तुकाराम महाराज म्हणतात - "**निष्काम निष्फळ विठ्ठली विन्वास। पाहो नये आस आणिकांची॥ तुका म्हणे जीवभाव देवापायी। ठेऊनिया काही न मागती॥**"

सकाम प्रेम म्हणजे भक्ती नव्हे तर **व्यापार**, असं भक्तश्रेष्ठ बाळ प्रल्हाद म्हणतो आहे. भगवंतांनी त्याला "वर माग" म्हटल्यावरसुद्धा प्रल्हादाने कशाचीही इच्छा केली नाही. उलट तो म्हणाला, "**यस्य आशिष आशास्ते, नस भृत्यः सवै वणिक्॥**" हे भगवंता, "तुझी भक्ती करून जो काहीतरी मागतो **(प्रेम सोडून)** तो भक्त नव्हे तर केवळ व्यापारीच होय."

प्रतिक्षण वर्धमानं - भक्तिप्रेमात कधीच ओहोटी नाही-नसते. श्री तुकोबा म्हणताहेत "**अंगी प्रेमाचे भरते। न घे उतार-चढते॥**" श्री ज्ञानराजांनीही म्हटलेच आहे - "**का वर्षाकाळी सरिता। जैसी चढो लागे पांडुसूता। तैसी नीच नवी भजता। श्रद्धा दिसे॥ परिठाकिलियाही सागरु। जैसा मागीलही यावा अनिवारु। तिये गंगेचिया ऐसा पडिभारु। प्रेमभावा॥**

**मिळोनि मिळतचि असे। समुद्री गंगाजळ जैसे। तैसे सर्वेंद्रिया सहित। मजमाजी सूनि चित्त। रात्रिदिवस न म्हणत। उपासिती॥''**

भक्तिप्रेमभाव हा असा अविच्छिन्नं-अमर्याद आणि तसाच अखंड, तैलधारावत्-**राधेसारखा**. तसाच तो ''**सूक्ष्मतरं**'' भगवत्प्रेमभक्तिभाव श्रेष्ठ आहे खराच, पण स्थूल दृष्टीच्या बहिर्मुख लोकांना कळणे शक्य नाही. तर्ककठोर अंत:करणात-बुद्धीत हा भक्तिप्रेमाचा दिव्य अंकुर उगवतच नाही. गुणरहित-कामनारहित अशा पवित्र-प्रेमळ हृदयातच हा भक्तिप्रेमभावाचा अंकुर उगवतो-वाढतो-वाढतो. त्याचा मोठा वृक्ष होतो, त्याला प्रेमानंदमहारसाची अमृतफळे येतात.

हा आनंदस्वरुप भक्तिप्रेमभाव जसा सूक्ष्म तेवढाच तो ''**अनुभवरुपम्**'' आहे. तो शब्दातीत आहे. ''**ते सुख काय सांगो। वाचे बोलता नये॥**'' ज्ञानराज विचारताहेत, ''**येरवी काय प्रेमा। अनुवाद असे॥???**''' गोपी म्हणाल्या, ''**बोलेना, बोलू देईना।**'' पाण्यात असेपर्यंत आपण जसे बोलू शकत नाही तसे आनंदकंद-नंदनंदनाशी/श्रीगुरुस्वरूपाशी तदाकार-तन्मय-तद्रूप झाल्यावर वाणी विराम पावते. **(तरी पण देव बोलावा असे भक्ताला वाटते आणि भक्त बोलावा असे भगवंताला तर वाटतेच वाटते.)**

भगवद् उद्देशाने/आपल्या श्रीगुरुंसाठी केली जाणारी जी-जी क्रिया मग ती कोणत्याही स्वरूपाची असो माध्यमातून असो. ती भक्तीच आहे. वेगवेगळ्या आचार्यांनी भक्ती म्हणजे काय ? ते छान सांगितले आहे -

१) पूजादिसु अनुराग: इति पाराशर्य:।

२) कथादिषु इति गर्ग:। (श्रीगुरु-गार्ग्यगोत्रोत्पन्न)

३) आत्मरति अविरोधने इति शांडिल्य:।

४) नारदस्तु तदर्पित **अखिल आचारता, तद् विस्मरणे परमव्याकुलता इति॥**

भगवत्-सगुण-साकार-भगवंताच्या-श्रीगुरुच्या पूजादिकांच्या ठिकाणी

प्रेमभाव म्हणजे भक्तीच, असं श्रीवेद व्यास म्हणतात. नवविधा भक्तीत अर्चन-म्हणजे **पूजा** भक्तीचे स्थान मोठे आहे. निरतिशय प्रेमभावाने युक्त होऊन श्रीहरि-गुरुंचे पूजन करणे म्हणजे भक्ति. अर्चन-पूजा भक्ती अनेकांगी आहे. **पूजा** भक्तीत सर्व इंद्रिय-व्यापारांचा समावेश होतो. काय, केवढी आणि कशी ही **पूजा-भक्ती** श्रेष्ठ आहे नां ???

भक्तीप्रेमसुख अमर्याद आहे, अखंड आहे. या प्रेमसुखात अन्य वृत्तीच राहात नाही. अहोरात्र एकच एक निजध्यास-अभ्यास चालतो की **स्वरूपी** आनंद केव्हा लाभेल ? तसेच हे सूक्ष्मतर आहे आणि तितकेच ''अनुभवरुपम्''. हा भक्तीप्रेमभाव शब्दातीत आहे. आपले श्री ज्ञानोबाराय विचारत आहेत, **''येरवी काय प्रेमा अनुवाद असे ?॥'' ''बोलेना, बोलू देईना॥''** पाण्यात असेपर्यंत आपण जसे बोलू शकत नाही तसेच भगवंताशी/आनंदकंदाशी तदाकार झालेल्या भक्त-महात्म्याची वाणी विराम पावते.

अशाप्रकारे भगवत्प्रेमावाचून भक्ती अगदी व्यर्थ आहे. भावरहित भक्ती ही केवळ दांभिक भक्ति ठरेल. पूजादिक क्रियांमध्ये भाविकांची, महाभागवत, महावैष्णवांचीही संगती असते. तुकाराम महाराज म्हणतात, **''कथा त्रिवेणी संगम। देव, भक्त आणि नाम। तेथीचे उत्तम। चरणराज वंदिता॥''** गुरुदेवांची या बाबतीतली निंबाळची आठवण लक्षात घेण्यासारखी आहे. भगवंताला आवडणारी ही भक्ती आहे.

**''आवडे तयाचे, नाम घेता तयासि।''** नामसंकीर्तनाखेरीज बाकी सगळी साधने आपल्याला देवाकडे घेऊन जाणारी आहेत. नामस्मरण/संकीर्तन हेच एक असे अद्‌भूत साधन आहे की ते आपल्या बळावर भगवंतालाच आपल्याकडे खेचून आणते. **''नामासाठी देव घालीतसे उडी।''** असा या नामाचा अगाध महिमा आहे. संतांना आणि देवालाही अत्यंत आवडणारे एकच साधन ते म्हणजे **''नाम''**. तुकाराम महाराज म्हणतात, **''आम्हा आवडे नाम घेता। तो ही पिता संतोषे॥''**

या नामाच्या तुलनेत बाकी सर्व साधने दीन-दुबळी. ‘‘**हरिकीर्तनाचिया जोडी। सकळ साधने केली बापुडी॥**’’ श्री एकनाथमहाराज काय म्हणतात बघा, ‘‘**जो सुखैक मूर्ती निजस्वभावे। तो ही जन्मकर्मगुण वैभवे। गाता किर्तनी, अति सुखावे। स्वानंद गौरवे डुल्लतु॥**’’ नामसंकीर्तन चालले असताना, देहाभिमान आणि सर्व विकार नष्ट तर होतातच शिवाय भक्तिप्रेमभाव अधिकाधिक वृद्धिंगत होतो. ‘‘**प्रेमे छंदे नाचे डोले। हारपले देहभाव॥**’’ नामस्मरणात अष्टसात्विकभाव जागृत होतात.

ज्ञानराज म्हणतात, ‘‘**तैसेचि माते विश्वी कथित। कथितेनि तोषे कथू विसरत। तया विसरामाजी विरत। अंगे जीवे॥**’’ गर्गमुनी म्हणाले, ‘‘**श्रीकृष्ण गोविंद हरे ब्रुवन्तः श्लक्ष्णया गिरा। अहर्निशं हरौ लग्नाः तेहि भागवतोत्तमः॥**’’ जो कोणी राम, कृष्ण-हरि-गोविंद, हरे मुरारे असा सदैव भगवद् नामोच्चार करीत, अखंड भगवद्-आनंद ध्यानात निमग्न असतो तो भागवतोत्तम होय.

अखंड एक आत्म-आनंदरति असणे, याला विरोधी उत्पन्न होतील अशी कोणतीच क्रिया न करणे असे भक्तीचे प्रतिपादन शांडिल्य मुनींनी केले आहे. आद्य श्री शंकराचार्यांनी ‘‘**विवेक चूडामणित**’’ भक्तीचे लक्षण सांगितले आहे, ‘‘**मोक्ष साधनात भक्तीच श्रेष्ठ आहे.**’’ व स्वस्वरूपानुसंधान म्हणजेच भक्ती असे आचार्य म्हणतात. स्वस्वरूपानुसंधान म्हणजेच आत्मरति. ही भक्तीच आहे पण सामान्य जीवांना ती सहजसाध्य नाही.

नारदांच्या मतानुसार सर्व काही भगवद् अर्पण करणे, त्याचे (भगवंताचे) अखंड स्मरण असणे आणि क्षणभरही जर विस्मरण झाले तर परम व्याकुळ होणे, ही भक्तीच ‘‘**सर्वकर्मधर्म-समर्पण**’’ हे भक्तीचे एक प्रधान अंग आहे. गीतेत भगवान् सांगताता, ‘‘**यत्करोषि यद्श्नासि यज्जुहोशि ददासि यत्। यत्तपत्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥**’’ या सर्वधर्मकर्मसमर्पणाचा सोप्यात-सोपा प्रकार आपल्या ज्ञानराज माऊलींनी सांगितला -

‘‘**परि मने वाचा** देहे। **जैसा जो** व्यापार होये। **तो मी करितु** आहे। **ऐसे**

**न म्हणे॥ करणे, का न करणे। हे आघवे तोचि जाणे। विश्व चळतसे जेणे। परमात्मेनि॥ उणेया पुरेयाचे काही। उरो नेदी आपुलिया ठायी॥ माळिये जेऊते नेले। तेऊते निवांतचि गेले। तथा पाणिया ऐसे केले। होआवे गा॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति। इये ओझी नेघे मती। अखंड चित्तवृत्ति। माझे ठायी॥''**

प्रेरक एक भगवंतच आहे, म्हणून **सर्व** त्यालाच अर्पण करावे व चित्ताने अखंड त्याचेच चिंतन करावे आणि त्याचेच चिंतन करण्याचे एकमेव साधन **हरिपाठ - ''नाम''**.

सर्व कर्मे कृष्णाला समर्पण करावीत व चित्ताने अखंड त्याच सच्चिदानंदकंदाचे अखंड चिंतन करावे. भगवत् चिंतनात अंतर पडले तर चित्त किती व्याकूळ होते ??? त्याच्या सेवेत अंतराय झाला तर प्राण फुटतात !!! नामदेवराय म्हणतात, ''**तुझिये चरणीचे तुटता अनुसंधान। जाईल माझा प्राण तत्क्षणी॥**'' तुकोबा पण असंच म्हणतात, ''**भजनी विक्षेप तेचि पैं मरण।**'' नारदांनी तर नुसते स्मरण म्हटले नाही तर ''**विस्मरणे परमव्याकुलता**'' असं पद घालून भक्तीप्रेमाची तीव्रता सुचविली आहे आणि पुढे ''**यथा व्रजगोपिकानाम्**'' अशी पुस्ती जोडली आहे. गोपिकांप्रमाणे अविरत, अखंडपणे **प्रेमस्वरूप** भगवंताशी काया-वाचा-मने अनुरक्त राहणे म्हणजे भक्ती.

ज्ञानराज म्हणतात, ''**परि तेचि भक्ती ऐसी। पर्जन्याची सुटिका जैसी। धरेवाचूनि अनारिसी। गतिची नेणे॥ तैसे सर्वभावसंभारे। न धरत प्रेमसरे। मजमाजी संचरे। मीचि होऊनि॥**'' राधारमणचरणी भक्तीप्रेमयुक्त अखंड निष्ठा-सेवा-चिंतन हेच खऱ्या भक्तीचे स्वरूप. नाथ महाराज म्हणतात, ''**काया, वाचा मनसा। माझे भक्तिचा पडला ठसा। सेवा करिता नाठवे दिवस निशा। भक्तीची दशा या नाव॥**'' या अशा भक्तिवाचून मुक्ती शक्य नाही आणि अशा मुक्तीवर पुन्हा मुकुटमणी काय तर भक्तिच. आहे की नाही मौज.... या भक्तिची !!!

श्रुतीमातेने तर भक्तिहीन जीव आत्मज्ञानास अनाधिकारी म्हटला आहे. **''भक्तिविण मुक्ती बोलू नये''** असं महणून श्रीज्ञानराज माऊलीने भक्तिवाचून नुसत्या कोरड्या, शाब्दिक ज्ञानाने मुक्ती प्राप्त होते असे म्हणणाऱ्यांचा पूर्णत्वाने निषेध केला आहे. एकनाथ महाराज म्हणातात, **''भक्तिविण ज्ञान गिवसित वेडे। मूळ नाही तेथे फळ केवी जोडे?॥ भक्तियुक्त ज्ञान तेथे नाही पतन। भक्तिमाता तयाचे करीतसे जतन॥ एका जनार्दनी शुद्ध भक्ति सेवा। ब्रह्मज्ञान त्याच्या पाया लागे॥''** तुकोबाराय म्हणतात, **''तुका म्हणे होसी भावेचि तू मुक्त।''** किंवा **''भावचि कारण, भावचि कारण। मोक्षाचे साधन बोलियेले॥''**

असा भाव अंतरी निर्माण व्हायला पाहिजे. तो होण्यासाठी मन आनंदकंदाने निस्तरंग-नि:संशय व्हायला पाहिजे. निवांत राहिले पाहिजे आणि त्यासाठी ज्ञानराज या अभंगात पुढं म्हणतात, **''उगा राहे निवांत शिणसी वाया।''** आता निवांत राहणे म्हणजे काय? तर निवांत म्हणजे शांत.

**''निर्वातीचा दीप तेवतो निवांत। तैसी वृत्ती शांत असो द्यावी॥''** वाऱ्यामुळेच तरंग उठतात. मग निर्वात किंवा निवांत कसं व्हावं? वारा कशाचा तर संशयाचा-अदृढ श्रद्धेचा. वारे वाहतात फांद्या हलतात पण मुळं शांत-स्थिर असतात. आपण या मूळांसारखं साक्षीभूत व्हावं. आता साक्षीभूत म्हणजे तरी काय?

**''उदासीनत्वे सति बोद्धः साक्षी॥''** उदासीन म्हणजे उत्आसीन. म्हणजेच वर बसलेला. कशापासून वर? तर जनप्रवाहापासून वर. म्हणजेच अलग. प्रवाहाशी एकरूप न होता त्याहून अलग राहून स्थिरपणे प्रवाह न्याहाळणारा. आनंद म्हणतो, **''आला गेला मेघ, उदास गगन। तैसे राहो मन आनंद स्वरूपी। असोनिया जळी अलिप्त कमळ। राहो तैसा जीव संसारात॥''**

निवांत चित्त म्हणजे निरूपाधि चित्त! स्थिर चित्त! परमशांत चित्त! एकदा मी गुरूवर्यांना प्रश्न केला होता, **''परमात्मा म्हणजे काय?''** तर म्हणाले,

**“परम शांत अवस्था म्हणजे परमात्मा.”** क्षणभर एकांती बसून आपल्या मनालाच विचारावं, आपल्याला विश्रांती कोठे आहे? कुणाजवळ आहे? विश्रांती एक त्या आदंनघनाशीच, आनंदघनातच आहे.

अशी भक्ति-उपासना थोडी-फार सुखात होते की नाही, तोवर फार घाई झालेली असते भगवंत प्रसन्न होण्याची. पण ज्ञानराज आपल्याला विचारतात अशी घाई करून काय होणार नां? **“कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित।”** केंव्हा प्रसन्न होणार? तर श्रीगुरूवचन म्हणजे ब्रह्मवाक्य! अन्यथा कधी होणार नाही. प्रसन्नतेतील अडसर नामानेच-सेवेनेच दूर होतो. नामसेवा मोठ्या निष्ठेनेच. त्यात घिसाडघाई उपयोगाची नाही; भय उपयोगाचे नाही. तर नामात-सेवेत **दृढ आत्मविश्वास** हवा.

परमार्थात प्रयत्न प्रबळ आहेत. प्रयत्नांनी काय होत नाही ??? प्रयत्न केल्यावर काय असाध्य असते ??? **“असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे॥”** आपण माणसं प्रपंचासाठी हवे तेवढे सायास करतो, अपयश जरी आलं तरी पण न सोडता पुन्हा-पुन्हा प्रयत्न करतो. पण भगवत्प्राप्ती होत नाही म्हणून मग आता कशाला करा परमार्थ ??? मध्येच सोडून देतो, होय की नाही ??? वास्तविक परमार्थातच यशाची खात्री देता येते. पूर्णविराम फक्त एका परमार्थातच आहे. प्रपंचात स्वल्पविराम, अर्धविराम आहे. प्रश्नचिन्हे तर अगणित आहेत.

ज्ञानदेव महाराज म्हणतात, **“सायास करिसी प्रपंच दिननिशी। हरीसी न भजसी कवण्यागुणे॥”** ज्ञानेश्वरीत तर ते म्हणाले की, **“दृष्टादृष्टाचिये जोडी। भांडवल न सुटे कवडी। सर्वस्वे हानी, तेथ कोडी। वेचिती गा॥”** दृष्ट म्हणजे सगुण साक्षात्कार आणि अदृष्ट म्हणजे निर्गुण साक्षात्कार. या साक्षात्कारासाठी मनुष्य कवडीही खर्च करायला तयार नाही, काहीही कष्ट त्याला करावेसे वाटत नाहीत. मात्र ज्यात सर्वस्वे हानी आहे त्यासाठी मात्र कोट्यावधी धन आणि त्याचबरोबर हे मोलाचं सगळं आयुष्यही वेचायला तयार असतो.

प्रपंचाची भावना कशी असते ? तुकोबाराय सांगतात, **''वाढावे संतान। गृही व्हावे धन धान्य।। ल्यावे खावे, बरवे असावे सदैव। हीच धरी हाव संसारी।।''** मात्र मंदिरात जायचा त्याला शीण होतो, चव्हाट्यावर गप्पा मात्र मोठ्या अत्यादराने करतो. उपासना करत नाही पण उचापती मात्र खूप करतो, सुगंध सोडून माशी जशी दुर्गंधीच पसंत करते ना ? तसं हा भाग्यहीन भगवंत नको म्हणतो, त्याला विसरतो.

सगळ्या संतांनी याबाबतीत खूप प्रहार केलेत. अगदी कळवळ्याने, पोटतिडकीने त्यांनी आपल्याला प्रबोधन केलं आहे. काय थोर आश्चर्य आहे पहा ना, स्वहिताचा म्हणजे परमार्थाचा जरासुद्धा विचारच करत नाहीत. असं काय बळ आहे ? कोणाचा भरवसा आहे ? काय दम आहे ? शेवटी कोण कामास येणार आहे ? कशाची निश्चिंती आहे ? यमदूत आल्यावर काय जाब देणार ? मरणं कसं विसरली आहेत ? देवकीनंदनाला का बरे आठवत नाहीत ? त्या एका चक्रपाणीला का बरे विसरली आहेत, की जो या भवबंधनातून आपल्याला सोडवणारा आहे. केवळ उदरंभरणापलीकडे कशाचा विचारच नाही.

संतांनी ग्यानबाची मेख सांगितली पहा. उदरनिर्वाह सोडा, प्रपंच सोडा असं नाही सांगितलं. तर एवढंच मात्र ठासून सांगतात केवळ पोटपूजा. प्रपंच करण्यात आयुष्य घालवणं ही नागवण आहे, फसगत आहे. पोटापुरता प्रपंच करा, **पण ''आवश्यक तो राम''** म्हणाले. शरीर प्रपंचाला द्या **पण येथे अंत:करण द्या ना**. कोणाला द्या तर एक भगवंताला/श्रीगुरुला द्या म्हणतात. कारण तो भावाचा भुकेला आहे.

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **''माझिये भक्तिविण। जळो ते जियालेपण। अगा पृथ्वीवरी पाषाण। नसती कायी ?।।''** कधी न रागावणारे पण इथं जरा रागावूनच, आपल्याला धक्का देऊन विचारताहेत, व्यक्तिखेरीज जगणं हे फुकट, व्यर्थ आणि लाजिरवाणं नाही का ? पृथ्वीच्या पाठीवर असंख्य दगड-धोंडे पडले आहेत, काय त्यांचे जीवन. तसंच

भक्तिहीनाचं जगणं. नाथराय तर विचारतात, “**भक्तिवीण पशू कशासी जन्मला ?। सटवीने नेला कैसा नाही ?॥**”

भक्तिविना जीवन जडवत्, केवळ धोंडाच. मग काय करावं तर ज्ञानराज शेवटच्या चरणात म्हणतात, “**ज्ञानदेव म्हणजे हरिजप करणे। तुटेल धरणे प्रपंचाचे॥**” प्रकर्षाने पंचत्वाला जातो तो प्रपंच. जन्म, मृत्यू, जरा, व्याधी, दु:ख या पाच गोष्टी ज्यात प्रकर्षाने आहेत तो प्रपंच. सगळ्या दु:खाचं मूळ हा प्रपंच-संसार आहे. अनादि काळापासून हा प्रपंच-संसार जीवाच्या पाठीशी लागला आहे. एखाद्या धरणेकऱ्यासारखा !!! प्रपंचाचे **धरणे** म्हणजे प्रपंच सत्य वाटणे. आत्मज्ञानाने हे धरणे सुटते. म्हणजे प्रपंच खोटा आहे हे कळते. कळले तरी तो नि:शेष तुटत नाही.

यासाठी (म्हणजे सुटण्यासाठी) एकच एक उपाय तो म्हणजे “**हरिजप**”. नामस्मरणाने सगुण-साकार श्रीहरीचा साक्षात्कार होऊन त्याच्या नामाने-ध्यानाने त्याचीच सत्ता अनुभवास येते, संसार बंधन नि:शेष तुटते आणि जीव कृतार्थ होतो. म्हणून सांगतात, “**हरिमुखे म्हणा**”.

✻ ✻ ✻ ✻ ✻

# अभंग क्र. ५

**योग-याग-विधि येणे नोहे सिद्धि। वायाचि उपाधि दंभधर्म॥१॥**
**भावेविण देव, न कळे नि:संदेह। गुरुविण अनुभव कैसा कळे॥२॥**
**तपेविण दैवत, दिधल्याविण प्राप्त। गुजेविण हित कोण सांगे॥३॥**
**ज्ञानदेव सांगे दृष्टांताचि मात। साधूंचे संगती तरणोपाय॥४॥**

या अभंगात ज्ञानराजांनी अन्य साधनांचा, भगवत्प्राप्तीच्याच नामाशिवाय अन्य साधनांचा निषेध करून भावभक्तीचे श्रेष्ठत्व तसेच सत्संगतीचे महत्त्व प्रतिपादन केले आहे. योग म्हणजे अष्टांग योग. याग म्हणजे वेदात सांगितलेले नानाविध प्रकारचे लहान-मोठे यज्ञ. विधि म्हणजे वेदविहित नित्य, नैमित्तिक, आदी, वर्णाश्रमधर्मानुसार विविध कर्मे आणि सिद्धी या शब्दाचा अर्थ येथे ''मोक्ष'' असा आहे.

शास्त्रवचन असे आहे - ''**न यज्ञेन, न दानेन, न तपेन, न च कर्मणा।**''

''**ब्रह्मात्मैकत्त्वबोधेन मोक्ष: सिद्धति, न अन्यथा॥**'' श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, योग, याग, विधि इत्यादी साधनांचे आचरण करणे म्हणजे केवळ एक व्यर्थ उपाधिच आहे. त्यात शारीरिक व मानसिक कष्ट फार व फळ मात्र ''**नगण्य**'' म्हणून ''**वायाचि**'' म्हणाले. कदाचित अष्टांग योगाच्या अभ्यासाने आणिमादी सिद्धींचा जरी लाभ झाला तरी त्यायोगे लौकिक वाढून दंभ मात्र वाढेल. लौकिकात, उपाधीत अडकलेल्यांच्या आचरणाला माऊलींनी ''**दंभधर्म**'' म्हटलं आहे.

पतंजल महामुनींनी तर चित्तस्थिरतेचे एक महत्त्वाचे साधन म्हणजे योग असे म्हटले आहे. ज्ञानोबाराय तर येथे त्याला ''**वाया**'' म्हणताहेत !!! शिवाय वेदविहित कर्मे अवश्य आचरलीच पाहिजेत, असा शास्त्रसिद्धांत आहे. गीतेतसुद्धा याला अनेकानेक प्रमाणे मिळतात. ''**नियतं कुरु कर्म**

त्वं।'', ''**कर्मण्येवाधिकारस्ते।**'' ''**स्वे स्वे कर्मभिरत: संसिद्धिं लभते नर:।**'' ही आणिक अशी सगळी वचने तर कर्मयोगाचे अनुष्ठान करण्याचा आग्रह धरतात. ही कर्मे चित्तशुद्धी करतात. ''**चित्तस्य शुद्धये कर्म।**'' पण मोक्षसिद्धी प्राप्त करून मात्र देत नाहीत. ''**न तु वस्तूपलब्धये।**''

**भगवनमुखानेच** इतर साधनांची निरर्थकता सिद्ध होते. ''**नाहं वैदेर्न तपसा न दानेनं न चेज्यया। शक्य एवं विधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥**'' श्री एकनाथ महाराज म्हणतात, ''**मज वश करावयालागी। सामर्थ्य नाही अष्टांग योगी।**'', वेदाध्ययनाने भगवंत प्राप्त होत नाही. सगळी तपे पण या कामी बापुडी ठरतात, घर-दार सांडून, निरजाहोम करून संन्यास घेऊनसुद्धा भगवंत प्राप्ती न घडणारीच, श्रौत-स्मार्त कर्म केल्याने नुसती कर्मठता वाढायची एवढेच, होमाचे तर कष्टच. यम नियमात नुसताच शिणवटा, एवढंच काय तर ही सगळीच्या सगळी उपरोक्त साधने केवळ कष्टच.

आता श्रीगुरु ज्ञानदेव, योग, याग व विधी म्हणजेच विहित या साधनांचा उल्लेख करून पुढे ''**येणे नोहे सिद्धि**'' असं कोणत्या अर्थाने म्हणतात याचा विचार बारकाव्यांनी करावयास हवा नाही का ?

योगमार्गाची वाट अवघड, त्यात परमकष्ट. पुन्हा त्यात असंख्य विघ्नांचा कडकडाट आणि हा योग मार्ग एखाद्यालाच प्राप्त. अर्जुनाने तर भगवंताला विचारले आहे, ''हे जे साधन तुम्ही निरूपिले, ते काय कोणाही येरा-गबाळ्याला साधणार आहे ??? यावर भगवान पण म्हणाले, ''अरे हे अनुष्ठान अति अवघड, जितेंद्रियालासुद्धा योग्यतावशेच, नाहीतर कुठलं साधायला.''

तुकाराम महाराज तर म्हणाले, ''**बोल बोलता वाटे सोपे। करणी करता टीर कांपे॥**'' काय वाटेवर पडलेली गोष्ट आहे थोडीच ? रामकृष्ण परमहंसही म्हणाले, ''ही साधने या काळासाठी नाहीत. कलियुगात जीव अल्पायु व प्राण अन्नगत आहे. या साधनात अल्प जरी चूक झाली तरी

शरीरात व्याधि उत्पन्न होतात.'' अहो मग हरिपाठ हे केवढे तरी छान, खात्रीशीर साधन नां ???

योगाचा विचार झाला, आता ''यज्ञ''. यज्ञ हा प्रकारच फार-फार सूक्ष्म आहे. यात थोडीशी जरी चूक झाली तर प्रत्यवाय म्हणजे दोष लागतो. मग त्या दोषनिवारणार्थ भले-मोठे प्रायश्चित्त घ्यावे लागते. यज्ञ करून काही काल स्वर्गलोक मिळाला तरी ती काही कायमची सुखरूपता नाही. ''**पुण्याची पाऊटी सरे। सवेचि इंद्रपणाची उटी उतरे। आणि येऊ लागती माघारे। मृत्यू लोका॥**'' आहुती अर्पण करताना मंत्रोच्चारात विस्वर गेला तर सुख-फल इत्यादी कुठलं, पण मरण मात्र अगदी नक्की.

यज्ञसामग्री गोळा करणं अवघड. देश, काळ, वस्तू यांची शुद्धी, बारा भानगडी. यज्ञद्वारा धर्म घडला आणि जर तो वाचेच्या पिंपळावर बांधला म्हणजे त्याचा डांगोरा पिटला, गवगवा केला, जाहिरात केली तरीसुद्धा त्यातून निर्माण होणाऱ्या पुण्याचा क्षय होतो. याबाबत दिलीपराजाचं उदाहरण मार्मिक आहे. रघुवंशातला दिलीपराजा महापुण्यवान. शंभर यज्ञ केले, इंद्रपद मिळालं, स्वर्गात गेला, इंद्रानं त्याचं स्वागत केलं आणि विचारलं की, कोणत्या महत् पुण्य कर्मानं तुला हे पद मिळालं ??? राजानं आपण १०० यज्ञ कसे केले याचा पाढा वाचायला सुरुवात केली आणि काय ? तत्काळ पुण्यक्षय झाला. पुन्हा मर्त्यलोकी आला, झालं. ''यज्ञ'' म्हणजे सापशिडीच्या खेळासारखं, पुन्हा आपलं आहे तिथंच, नामजपयज्ञाचे मात्र तसे नाही.

आता ''विधि''. वेदविहित कर्मे जरी झाली तरी ती यथासांग होणं अवघड. समर्थ म्हणतात, ''**यथासांग ते कर्म काही घडेना। घडे कर्म, ते पुण्य गाठी पडेना॥**'' कर्म मुळातच सदोष. ''**काम्यकर्म जाण। अरचही होता विगुण। फळ नव्हे, परिदारुण। ते कर्मचि विघ्न उपजवी॥**'' ''**कर्म**'', ''**मी करितु असे।**'' या कर्ताभावनेने केली आणि कर्मफळाची आशा ठेवली की ती बंधनाला कारणभूत होतात. मुक्तीचं साधन होत नाही. शिवाय जो जो कर्म साधन करावे तो तो साधनाभिमान वाढतोच. यातून

अहंकारच वाढतो. अहंकारातूनच पुढे दंभाची वृद्धी होते. परत या कर्मकांडातच मन गुंतून पडलं की, भगवंताकडील लक्ष कमी-कमी होत जाते. भावशून्य कर्मे चित्तशुद्धीसुद्धा करू शकत नाहीत. म्हणून ज्ञानराज या अभंगाच्या दुसऱ्या चरणात म्हणतात - ‘‘**भावेविण देव न कळे नि:संदेह। गुरुविण अनुभव कैसा कळे ?॥**’’

भक्तीशिवाय कर्म-धर्म हा केवळ अधर्मच. भक्तीचं वर्म चुकलं तर मग सगळा अधर्मच. ‘‘**मनी नाही भाव आणि देवा मला पाव !!!**’’ कसं शक्य आहे सांगा बरं ??? तो तर भावाचा भुकेला आहे. ‘‘**देवा कारणे भाव तस्मात्। द्यावे न लगे फारसे वित्त। झाले एक चित्त तरी बहुत। एवढ्यासाठी नका करू वाताहात गां॥**’’ एक भावच त्या परमपुरुषाकडे घेऊन जातो. भक्तीच त्या भगवंताला आकलू शकते, भक्ती श्रेष्ठ आहे.

भक्तीच्या मापाने अनंत मोजला जातो, बांधला जातो. ‘‘**इतराने तत्वता न मोजवे॥**’’ स्वतंत्रपणे हा भाव किंवा भक्ती अनुभवास येणे शक्य होत नाही. आपल्याला जो पर्यंत संदेह म्हणजे संशय आहे, शंका आहे/आहेत तोपर्यंत अनुभव कसा काय येणार ???

आपल्या सर्व संदेहाचे निरसन एक श्रीगुरुच करू शकतात. विद्वान आपल्याला निरुत्तर तेवढं करतील. पण सद्गुरु आपल्याला संशयरहित करून सोडतात, आपलं समाधान करतात. आता मुख्य संशय कोणता ? तर एका श्रीहरीच्या अद्वैत सत्तेबद्दलचा आणि अनुभव कोणता म्हणाल तर एका श्रीहरीवाचून अन्य वस्तूच नाही हा. नामदेवराय म्हणतात, ‘‘**सद्गुरुवाचोनि नाम नये हाता। साधन साधिता कोटी गुणे॥ जैसा कांतेवीण करणे संसार। तैसा हा व्यापार साधनांचा॥ नामदेव म्हणे श्रीगुरुपासोनी। नाम घ्या जाणोनी, स्मरा काही॥**’’

हे श्रीगुरु असतात तरी कसे ??? तर नाथमहाराज म्हणतात, ‘‘**जो शब्दज्ञानी पारंगतु। ब्रह्मानंदे सदा डुल्लतु। शिष्य प्रबोधनी समर्थु। यथोचितु निजभावे॥**’’ श्रीगुरु शिष्याला साधनप्रवत्त करतात. नामसाधनाचा

आग्रह धरतात. शिष्याकडून काही वेळा अट्टाहासाने साधन करवून घेतात, आपली सर्वभावशक्ती शिष्याच्या साधनेपाठी खंबीरपणे उभी करतात. प्रसंगी रागवतात, बोलतात, पण सगळ्याचा हेतू एकच आपल्या शिष्याला बोध व्हावा, त्याचं नामसाधन उत्तम व्हावे, त्याला अनुभवरूपता यावी म्हणूनच ना ???

भगवंताजवळ भक्तिसुधेची जोड मागावी. तुकोबारायांच्या सारखे हाच निर्णय करतात, "**न करी मी आस, ना साधनी सायास।**" एका भक्तिप्रेमरसावाचून मला अन्य काही नको. महानारायणोपनिषदात असेच म्हटले आहे, "**भक्तिरेव भूयसी॥**" केवळ ही अशी भक्तीच त्या परमपुरुषाकडे नेते. भक्तीच त्या परमेश्वराचे दर्शन करून देते. भक्तीच श्रेष्ठ आहे. नव्हे-नव्हे भक्ती हा **पंचम** पुरुषार्थ आहे.

हा पंडिता-वाचका, ज्ञानिया, आत्मनिष्ठ, जीवनमुक्तांनाही अप्राप्य असणारा भक्तिभाव हा केवळ संतांच्या/श्रीगुरुंच्या कृपाप्रसादाचेच फळ असते. ही भावभक्तिची श्रीमंती, ऐश्वर्य हा त्या श्रीगुरुंच्याच अनिर्वचनीय प्रेमभावाची देणगी. यापेक्षा आणखी काय जास्त सांगणार ???

श्रीगुरु स्वत:च्या भक्तिप्रेमभावाच्या महारसात सदैव अवभृथ स्नान करत असतात आणि आपल्या प्रिय शिष्यांनाही न्हाऊं घालत असतात. शब्दज्ञानांत ते पारंगत असतातच, भक्तिप्रेमानंदात सदा डोलत असतात आणि अंतरंग शिष्याला निजभावे प्रबोधन करण्यात ते पूर्ण समर्थ असतात. मग असे सद्गुरु भेटल्यावर, "**आपणहून घरी आल्यावर**" काय होतं ? तर "**पाप ताप दैन्य जाय उठाउठी। झालिया भेटी हरिदासांची॥**" श्रीगुरुंच्या ठिकाणी जे भावबळ, भावशक्ती आहे ती "**ऐसे बळ नाही आणिकांचे अंगी। तपे, तीर्थे जगी, दाने व्रते॥**" भगवंताची ओळख करून देणारे, त्याचे प्रेम देणारे, ते वाढवणारे, सांभाळणारे एक श्रीगुरुच. तुमच्या भाषेत गुरुदेव. होय ना ???

पण असे श्रीगुरु दुर्लभ असतात. आधी भेटणं कठीण, बरं भेटलेच

(आणि भेटतात पूर्वपुण्याईनं) तर कळणं कठीण. कळले तरी पटणं कठीण आणि पटले तरी त्यांचा नित्य संग-संगती-सहवास लाभणं कठीणच, पण जर का महद्भाग्यानं संग लाभला तर मात्र अमोघ. त्यांची कृपाच आपलं सर्वत्र परम कल्याण करत असते.

ज्ञानराज ह्या अभंगात पुढं म्हणताहेत, "**तपेविण दैवत, दिघल्याविण प्राप्त। गुजेविण हित कोण सांगे ?॥**" तपावाचून देवता प्रसन्न होत नाहीत. आपण कुणाला काही दिल्याशिवाय आपल्याला काही मिळत नसतं आणि जीवीचं निजगुज असल्याशिवाय जीवीचा जिव्हाळा असल्याशिवाय "**हितगुज**" कोण करतं ??? पण हे तप म्हणजे तरी काय ???

तप शब्दाचा एक अर्थ आहे, कालवाचक म्हणजे बारा वर्षे इतका. तप म्हणजे तापवणे, तप म्हणजे झिजवणे, तप म्हणजे आटणे ("मी" पणा आटणे म्हणजे तप), तप म्हणजे काही नुसतं स्नान-दान, शास्त्रार्थ, वेदाध्ययन, योग, याग, शरीरशोषण नाही. मग तप म्हणजे नेमकं काय ? तर आपल्या हृदयी चिद्रूप अशी श्रीहरीचे/श्रीगुरुंचे सद्रूप चिंतन अखंड स्मरण म्हणजे तप. ज्याच्या योगाने दंभ, लोभ निःशेष अटतात, अहं समूळ तुटतो, हे खरं-खरं **तप**.

गीतेत तपाचे कायिक, वाचिक आणि मानसिक असे तीन प्रमुख प्रकार सांगितले आहेत. ज्ञानराज माऊलींनी सांगितले, "**ईश्वर/श्रीगुरु निणेयो सदा चित्ती वाहणे**" या नाव तप. तपाची आणिक एक व्याख्या श्रीगुरु ज्ञानराजांनी फारच छान केली आहे. देहादि संघातापासून आत्मारामाचे भिन्नत्व सिद्ध करून अनुभव आणून देणारा जो **विवेक** तो आपल्या अंतःकरणात सदैव जागविणे म्हणजे तप. नाथमहाराजांची तपाची व्याख्या अशीच सुंदर आहे, "**कामनारहित निष्पाप निरागस। श्रद्धापूर्वक सद्रूप-चिद्रूप। निष्कपट करिता तप। आनंदघन स्वरुप तैं भेटे॥**" आहे की नाही अती छान व्याख्या.

दिधल्याविण प्राप्त कसे होणार ? काही दान करत राहिलं तर धन प्राप्ती

आकस्मिक होते. आपण एक दाणा जमिनीत पेरतो-भूमातेला देतो तेव्हा ती अनंत दाणे-राशीच्या राशी देते नां !!! देव तर देण्याच्या बाबतीत ''घेसी तेव्हा देसी, ऐसा अससी उदार'' असा आहे. आम्ही म्हणतो, ''तो तर अनंतकोटी ब्रह्मांडनायक आहे.'' काय कमी आहे त्याला ? भगवंताला कशाला लागतं ? पण भगवान म्हणतात, मला प्रेमभावाची टंचाई आहे. मग म्हणतो, ''आपण साटं लोटं करू. तू आधी माझा हो म्हणजे मग मी तुझाच होईल !!! काय गंमत आहे नाही कां ???

भगवंताला ''**पत्र, पुष्प, फल, तोय**'' हे फक्त निमित्तमात्र हवं असतं. ''**येर पत्र, पुष्प, फळ। हे मिसचि केवळ। वाचूनि आमुच्या लाग निष्कळ। भक्तितत्त्व॥**'' सुदाम्याचे मूठभर पोहे त्याला चालतात-भावतात-आवडतात. ''**मी सुदाम्याच्या सोडी गांठी। पव्हयालागी॥**'' कारण ते शुद्ध, निर्मल अंतःकरणाने, मोठ्या प्रेमभावाने दिले आहेत. पुढं ज्ञानराज म्हणाले आहेत, ''**गुजेविण हित कोण सांगे ?।**''

श्रीगुरुच इतके उदार असतात की -

''**ये हृदयीचे ये हृदयी घातले। हृदया-हृदय एक जाहले॥**'' गुप्त म्हणजे गुह्य, गुप्त गोष्ट, अनुभव. हे निजगुज कुणी सर्वांसमोर उघडं करत नाही, केलं जात नाही. ज्याचा आपला जिव्हाळ्याचा, निकट, अंतरंग संबंध असतो, देह फक्त वेगळेपण ''**मन-चित्त**'' एकच असते. त्यालाच गूज सांगतात, तिथंच हट्ट, तिथंच राग-रुसवा, भांडण मात्र लटकं हं !!!

श्रीगुरुच आपले खरे आप्त, बंधू, सगे-सोयरे, सखा, मित्र, माय-बाप सारं-सारं काही असतात, कारण तेच एकमेव आपले हित पाहतात. आपल्या पाठीशी सदैव उभे असतात. श्रीगुरु आपला अमोल असा आत्मानुभव अत्यंत दक्षतापूर्वक जतन करून ठेवतात, गुप्त ठेवतात. श्रीगुरुदेव म्हणावयाचे, ''गुप्त अशा वस्तूचे ज्ञान करून देतात ते श्रीगुरु.'' मग श्रीगुरु हा अमोल ठेवा आपलं गुज कोणाला सांगतात ?

तर, ''**यालागी सुमनु आणि शुद्धमति। जो अनिंदकु अनन्यगती। पैं**

**गा गौप्यहि परि तयाप्रती। चाळविजे सुखे॥''** कृपावंत श्रीगुरु लाभले तर मग ते काय करतात ? आपला सर्वांगाने अंगीकार करतात. मग अंतरीची खूण दाखवून नाममंत्र सांगतात-देतात. नाममंत्रातील रहस्य-गुप्त वर्म आपल्या सूक्ष्म श्रवणेंद्रियात सांगतात आणि मग **त्याठिकाणी** शब्दाविण ध्वनी ऐकावयास येतो, खरं की नाही ? भगवंताची खूण दाखवून कृतार्थ करतात, आपल्या स्वानंदात आपल्याला एकरस करून टाकतात.

असं ''कायावाचामने'' श्रीगुरुस्वरूपाशी समरस झाल्यावर श्रीगुरु ''निजगुज'' आपल्या शिष्योत्तमाला सांगणार नाहीत तर मग कुणाला ? शिष्यही आपलं हृदय त्यांच्यासमोर मोकळं उघडं करत असतो.

या अभंगाच्या शेवटच्या चरणात ज्ञानराजमाऊली म्हणतात, **''ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात।''** दृष्टांत म्हणजे **अनुभव**. आपण जे दृष्टांत दिलेले पाहतो-ऐकतो (सिद्धांत समजण्यासाठी म्हणून) ते बहुतेक व्यवहारिक सत्तेतील म्हणजे लोकव्यवहारातले असतात. म्हणून येथे ''दृष्टांताची मात'' असा शब्दप्रयोग केला. ''दृष्टांताची मात'' म्हणजे 'स्वानुभवाची गोष्ट''. ज्ञानराजांचा असा ठाम सिद्धांतच आहे की संत/श्रीगुरुसंगतीवाचून, श्रीगुरुकृपेवाचून आत्मानुभव येणे शक्य नाही व मग स्वानुभवावाचून संसार-अविद्या बंधनातून तरून जाण्यास अन्य मार्ग नाही. म्हणजे श्रीगुरुकडून मिळालेल्या नामाचा विश्वास पटला पाहिजे आणि त्या विश्वासामुळे नामाचा लळा-छंद लागून **त्याचा** अनुभव आला पाहिजे. नाही का ???

यासाठी श्रीगुरुची/संतांची संगती आवश्य आहे. सेवा आवश्य आहे. विश्वासाची, श्रद्धेची नितांत गरज आहे. **''संताचिये पायी हा माझा विश्वास।''** किती तर **''सर्व भावे दास झालो त्यांचा॥ तेचि माझे हित करिती सकळ। जेणें हा गोपाळ कृपा करी॥''** श्रीगुरु हे प्रत्यक्ष ज्ञानमूर्तिच. ज्ञानाचं कोठार त्यांच्या चरणी तनु-मनु-जीवे लागावे आणि अगर्वता सर्वतोपरि सकळ दास्य करावे.

शेवटी सर्व साधने व सर्व मार्ग यांचे पर्यवसान श्रीगुरुसंगतीतच. दृष्टांताने

आत्मानुभवाची सामान्यत: कल्पना आली तरी अंतरंगीचा आनंदानुभव, श्रीगुरुसंगती, श्रीगुरुंशी एकरूप झाल्याशिवाय येतच नाही आणि कसा येणार ना ???

म्हणून श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज या अभंगाच्या शेवटच्या चरणात म्हणाले -

**"साधूचे संगती तरणोपाय॥"**

**"संसार तरावया जाण। श्रीगुरुसंगतीच कारण। त्यांचे भावे धरिल्या चरण। आत्मोद्धरण त्यांचेनि॥"** ज्ञानराज तर आपला रोख-ठोक अनुभवच सांगतात. **"ज्ञानदेव म्हणे तरलो-तरलो। आता उद्धरलो गुरुकृपे॥"** आपले श्री तुकाराममहाराजही म्हणतात, **"सद्‌गुरुवाचोनि सापडेना सोय। धरावे ते पाय आधी-आधी."** नामदेवरायांचा असाच निर्वाळा, **"सद्‌गुरुनायके कृपा मज केली"** म्हणजे काय केलं तर **"दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा।"**

आषाढी वारी सोहळ्याच्या योगाने, श्रीगुरु ज्ञानराजांच्या कृपाछत्राखाली अनेकानेक वैष्णवांच्या मांदियाळीत वाटचाल होत आहे. सर्व इंद्रियांना एकच आस आहे, ओढ आहे, त्या सच्चिदानंदकंद, षोडशकळा. पूर्ण सावळ्या परब्रह्म पांडूरंगाच्या दर्शनाची, स्पर्शनाची, आलिंगनाची, गुजगोष्टी करण्याची, भक्तिप्रेमरसास्वादाची, भावभक्तीला सुगंधाची आणि ह्या ओढीमुळे कष्ट कसे ते नाहीतच बघा. आहे तो केवळ आनंद.

ही संतमंडळी इतकी उदार असतात ना !!! **"उदार संत, उदार संत। भरले अनंत भांडार॥"** आलेल्याला, प्रत्येकाला दान देतात. इतके उदार असतात, इतके उदार असतात की बस्‌ !!! त्यात श्रीगुरुची उदारता काय वर्णावी ??? कामधेनू, कल्पतरू, परिस या कुणाचीच उपमा यांच्या उदारतेला मुळी शोभतच नाही. **"ये हृदयीचे ये हृदयी घातले। हृदया हृदय एक जाहले॥"** अशी. **"आपणा सारिखे करिती तात्काळ। नाही काळ वेळ तया लागी॥"**

गूज म्हणजे गुह्य, **अतिगुह्य** गोष्ट म्हणजे आत्मानुभव. हा जो

आनंदानुभव असतो ना ??? तो सर्वांसमोर उघड केला जात नाही. ज्याचा-आपला (गुरु-शिष्याचा) अति निकट संबंध असतो ना ??? त्यालाच गूज सांगतात. श्रीगुरु/संतच आपले खरे-खरे आप्त असतात. कारण ते सदैव आपले हितच पाहात असतात. **''तेचि माझे हित करिती सकळ। जेणे हा गोपाळ कृपा करी॥'' ''शोधूनिया आले संत। हिताहित जगाचे॥'' ''हित नाही ठावे जननी जनका।''** का तर ते फक्त लौकिक आचार शिकवतात. **गुप्त** वस्तूची, म्हणजे परब्रह्माची स्वानुभवाच्या पातळीवर ओळख करून देणारे फक्त संत/श्रीगुरुच.

संत/श्रीगुरु आपला अनुभव अत्यंत जपून, दक्षतेने जतन करून ठेवतात, गुप्त ठेवतात. त्याची वाच्यता करत नाहीत. मग कोणालाच सांगत नाहीत कां ??? तर सांगतात पण ही स्वानंदानुभवाची गूज गोष्ट कोणाच्या कानात सांगतात ? श्रीगुरु ज्ञानराज म्हणतात - **''यालागी सुमनु आणि शुद्धमति। जो अनिंदकु अनन्यगती। पैं गा गौप्यहि परि तयाप्रति। चाळविजे सुखे॥''**

कृपावंत सद्गुरु लाभला, त्याने का एकदा आपला अंगीकार केला की ते आपल्या शिष्याचे **अंतरंग** जाणून, अंतरीची खूण दाखवतात आणि नाममंत्रासहित **गूज** सांगतात. शब्दाविण ध्वनी ऐकवतात. **''तत्त्वमसि''** म्हणजे **''ते ब्रह्मच तू आहेस''** अशा वेदाच्या महावाक्याचे विवरण करून **नामाची** खूण आपल्या शिष्याच्या हाती देतात. शिष्याने ती **खूण** प्राणापलीकडे जपायची व जपायची असते.

दृष्टांत याचा अर्थ म्हणजे केवळ सिद्धांत कळण्यासाठी म्हणून सांगितले जाणारे व्यावहारिक उदाहरण नव्हे !!! **''ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात।''** याचा अर्थ स्वानुभवाची गोष्ट, शब्दपरिचय, अर्थपरिचय आणि **अर्थरुपता**. अर्थरुपता म्हणजे दृष्टांत. श्रीगुरुंच्या वचनाचा परिचय, मग त्या शब्दांच्या, बोधाच्या अखंड चिंतनातून त्या शब्दातील **अर्थपरिचय** आणि मग अर्थपरिचयाच्या सूक्ष्म अशा चिंतनाने **अर्थरुपता** म्हणजे स्वानंदसुखाचा-सूक्ष्म-अतिसूक्ष्म-प्रगाढ-खोल-अखंड असा **स्वानुभव**.

सगळे संतमहात्मे स्वात्मानुभवच सांगतात पहा. श्री तुकोबाराय म्हणतात, "**तुका म्हणे पोटी। देवा घालूनि, सांगू गोष्टी॥**" संतांच्या/श्रीगुरुच्या संगतीशिवाय असा स्वानुभव मिळतच नाही. गुरुकृपेशिवाय/संतकृपेशिवाय नाहीच नाही. श्री नामदेवराय आणि श्री पांडूरंग केवढा प्रेमा ना ??? पण "**हरि शिकवी नामयासी। जाई सद्गुरुसी शरण॥ नामया शरण भगवंतासी॥**" पण पांडुरंगाने निक्षून सांगितले की, नाम्या "**सद्गुरुवाचोनि सापडेना सोय। धरावे ते पाय आधि आधि॥**"

म्हणून श्री ज्ञानोबाराय पण या अभंगाच्या शेवटी सांगतात, "**साधूंचे संगती तरणोपाय।**" श्री नाथराय म्हणतात, "**संसार तरावया कारण। सत्संगतांच एक जाण। त्यांचे भावे धरिल्या चरण। दीनोद्धारण त्यांचेनि॥**" श्री तुकोबारायांची पण साक्ष अशीच आहे, "**याजसाठी संत पाय हे सेवावे। तरीच तरावे तुका म्हणे॥**" या सर्वांचे सार काय तर, "**संतचरण रज लागतां सहज। वासनेचे बीज जळोनि जाय॥ मग रामनामी उपजे आवडी। सुख घडोघडी वाढो लागे॥**" म्हणून "**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।**"

सगुण भक्तिप्रेमसुखरस स्वादाचा आनंदसुख सोहळा !!! त्याचे वर्णन काय शब्दांत करावे नां ??? "**ते सुख काय सांगो ?। वाचें बोलतां नये॥**" ज्ञानराज तर म्हणतात, "**देशे काळे वेदानुवादा। ज्या सुखाची न करवे मर्यादा। त्या सुखाची सुखसंपदा। मद्भक्त सदा भोगती॥**" या अभूतपूर्व, अद्भूत, अनुपम्य सुखाने अंतर्बाह्य रसरसलेले, लाडके डिंगर पंढरी रायाचे, ज्ञानियांचे चक्रवर्ती, महावैष्णव ज्ञानेश्वर माऊलीच्या कृपाछत्राखाली, षोडशकलापरिपूर्ण, आनंदाचा गाभा, रुक्मिणीरमण, षड्गुण ऐश्वर्यसंपन्न, भक्तांची वाट पाहात उभ्या असणाऱ्या सावळ्या परब्रह्माला भेटण्यासाठी.

ज्यांना सतसंगतीतून साधुबोध झाला ते काय उंचीच्या स्वानुभवात ठायीच मुरतात त्याचे सुंदर वर्णन ज्ञानेश्वरमहाराज हरिपाठांतील सहाव्या अभंगात सांगत आहेत.



# अभंग क्र. ६

**साधुबोध झाला, तो नुरोनिया ठेला। ठायीच मुराला अनुभव॥१॥**
**कापुराची वाती, उजळली ज्योति। ठायीच समाप्ती झाली जैसी॥२॥**
**मोक्षरेखे आला, भाग्ये विनटला। साधूंचा अंकिला हरिभक्त॥३॥**
**ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी। हरि दिसे जनी वनी आत्मतत्त्वी॥४॥**

हरिपाठातील हा महत्त्वपूर्ण असा अभंग आहे. या अभंगात अध्यायातील अंतिम सिद्धांताची अनुभूती व तत्प्राप्तीचा उपाय असा साध्य-साधनाचा विचार सांगितला आहे. संतांच्या संगतीने मानवी जीवनावर सबाह्यअंतरी काय परिणाम होतो ? त्या संगतीमुळे माणूस संसारसागरातून कसा तरून जातो ? तरणोपाय म्हणजे काय ? त्याचे स्वरूप काय ? ह्या सर्व गोष्टींचा मुलभूत असा विचार या प्रस्तुत अभंगात केला आहे. साधूंच्या संगतीत राहिल्यानंतर, त्यांना प्रणिपातपूर्वक शरणागती करून, सेवाभावाने, परिप्रश्न केल्यानंतर ते जो **आत्मबोध/नाम** देतात, त्या बोधाचे पूर्णस्वरूपाचा तपशीलासहित विचार-उलगडा-खुलासा या अभंगात ज्ञानराजांनी फार सुंदर केला आहे.

प्रथम साधु कोणाला म्हणावे ? त्यांची अंतरंग लक्षणे कोणती ? ते साधु-संत-सद्गुरु **बोध** कोणाला करतात ? कसा करतात ? आणि बोध म्हणजे तरी काय ? ह्याचा विचार करणं अत्यंत महत्त्वाचे आणि आवश्यक आहे.

साधू म्हणजे सद्भावाचे-आत्मभावाचे माहेरघरच !!! सगुण श्रीहरी व निर्गुण आत्मस्वरूप यांचे पूर्ण ऐक्य जाणून जो सर्वांगाने आनंदचैतन्यघन झाला, साधु-संत आणि तोच श्रीगुरु. “**हे विश्वचि माझे घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि पै झाला॥**” आणि अशा व्यापक, उन्नत सूक्ष्म अनुभूतीनंतरही “**याहीवरी पार्था। माझ्या भजनी आस्था।**” तो साधू.

"**अहं ब्रह्मास्मि**" आणि मग "**सर्वं खलिदं ब्रह्म**" अशा थोर ब्रह्मानुभवावर आरुढ होऊनही ज्याची "**भगवद्‌भजनी**" आस्था राहतेच किंबहुना "**आधि होता संत संग। तुका झाला पांडूरंग॥ त्याचे भजन राहीना। मुळ स्वभाव जाईना॥**" तोच साधू-महावैष्णव-संत-श्रीगुरु. भगवंताची अद्वैत सत्ता जाणून जो सर्वांगी-काया-वाचा-मने भगवंतावर/श्रीगुरुवर **निःसीम आत्मप्रेम** करतो तोच साधू/श्रीगुरु.

साधू म्हटला की, दया, क्षमा, शांती त्याच्या दासी, आत्मस्थिती हा त्यांचा स्थायीभाव, काम-क्रोध बंदीखान्यात घालून ते इंद्रियांचे स्वामी-गोसावी झालेले असतात, त्यांना जग ब्रह्मरुप झालेले असते, सर्वाभूती आत्मभाव ते साधु.

अशी साधूसंगत-संत-**श्रीगुरु** सेवा ही सर्व भयांचा नाश करून **अभय** देणारी असते आणि भयात भय श्रेष्ठ भय म्हणजे मरण-भय. साधू ते मरण-भय निवारतात. (मरण निवारत नाहीत, मरण हे शरीराला आहे आणि शरीर मरणारच) मरणाआधीच भगवंताशी एकरुप होण्याची जीवनकला "साधू-संत-श्रीगुरु" शिकवतात. साधूंच्या संगतीने भवनदी तरता येते. "जन्म-मरण" व्याधी नाहिशी करणारे हे भेषज म्हणजे दिव्य औषध रसायन आहे आणि हे औषध म्हणजे **आत्मबोध**.

साधूंची संगती कशासाठी ? कशाकरिता ? तर दुस्तर अशी भवनदी तरून जाण्याकरिता. भव नाम संसार. संसार म्हणजे सतत सरकणारा जन्म-मृत्यूचा फेरा आणि जन्म-मृत्यू म्हटलं की दुःखच दुःख. तुकोबाराय म्हणाले, "**जन्माचे ते मूळ पाहिलें शोधोनि। दुःखासी कारण जन्म घ्यावा॥**" म्हणून या जन्म-मरणरुपी भवनदीतून तरावयास हवे. या भवनदीतून आपल्याला पलीकडे नेणारी नौका कोणती ? तर "**बोध**". हा आत्मबोधच निःशेष अज्ञान निवृत्तीचे साधन आहे. असा आत्मबोध साधू-संत-श्रीगुरुच करतात. म्हणून समर्थ पण सांगतात, "**सदा संगती सज्जनाची करावी**".

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज पण म्हणतात, "**परि संतासवे नसता।**

**योगज्ञानी पैसता। गुरुचरण उपासिता। वैराग्येसी।। येणेचि सत्कर्मे। अशेष ही अज्ञान विरमे। जयांचे अहं विश्रामे। आत्मरुपी।।''** पण हा बोध होण्यासाठी तशाच अधिकाराची गरज आहे. विवेक आणि वैराग्याशिवाय बोधाची गोष्टच बोलण्यात काही अर्थ नाही. वैराग्याची शीव सुद्धा पहात नाहीत. आत्मानात्म-विवेकाची भाषेदेखील ज्यांना कळत नाही, आत्मज्ञानाची आस्थाच ज्यांना नाही मग आत्मज्ञान कोठले ? म्हणून साधूच्या संगतीत **''साधन चतुष्ट्यसंपन्नत्व''** आपल्या अंगी यावयास हवे .

आता साधूंच्या संगतीत, श्रीगुरुकृपेने जो बोध होतो, त्या बोधाचे स्वरूप काय ? व्यवहारात प्रत्येक पदार्थमानाच्या ज्ञानालाच बोध म्हणतात नाही का? पण ते योग्यच नाही. कारण ते अज्ञान किंवा अन्यथा ज्ञान आहे. ज्ञानराजांनी ज्ञानाची व्याख्या केली आहे. **''तरी परमात्मा ऐसे। जे एक वस्तू असे। ते जया दिसे। ज्ञानास्तव।। ते एकवाचूनि आने। जिथे भवस्वर्गादि ज्ञाने। ते अज्ञान, अैसा मने। निश्चयो केला।''**. श्रीसमर्थही म्हणतात, **''ज्ञान म्हणजे आत्मज्ञान। पहावे आपणासि आपण।''** मिथ्या ज्ञानाला अज्ञान म्हटले आहे तर यथार्थ, अबाधित ज्ञानालाच केवळ **''ज्ञान''** म्हटले आहे. अयार्थक ज्ञानामुळे/समजुतीमुळेच आपण आपल्याला **जीव** असे म्हणतो, समजतो.

**''अगा उपजणे आणि निमणे। हे साचचि जे का मानणे। तो जीव लोक मी म्हणे। संसार हन।।''** असा जो आपला जीवपणाचा समज, अशा जीवाला मी जीव नसून **''ब्रह्म''** आहे अशा अविनाशी बोधावर आणावयाचे आहे. हा ब्रह्मबोध म्हणजे जीवाला आपल्या स्वस्वरूपाची यथार्थ ओळख साधू-संत-श्रीगुरु करून देतात. **''पै अन्यथा बोध आघवा। मावळोनि पांडवा। बोधमात्रीचि जीवा। ठावो होय।।''** असा बोध.

श्रीगुरुकृपेने हा बोध प्राप्त झाल्यावर मग कोणत्याही कारणाने व प्रतिबंधाने हा बोध नाहीसा होत नाही, मळत नाही, कमी होत नाही. व्यावहारिक बोध हा बदलणारा असतो. तो देश, काल, वर्तमान, प्रसंग,

प्रतिबंध वा अल्पकारणाने बाधित होत असतो. तसा आत्मबोध कधीच बदलत नाही, त्यात फरक पडत नाही. गुणत्रयामुळे हा बोध (म्हणजे आत्मबोध) झाकळत नाही.

साधूंच्या/श्रीगुरुंच्या कृपाप्रसादे प्रथम "**मी ब्रह्म आहे**" हा बोध प्राप्त होतो. जोपर्यंत अज्ञान आहे, तोपर्यंत ते अज्ञान नाहीसं करणारी अशी ही "**ब्रह्माहमस्मि**" वृत्ती सतत उठत असते. अज्ञान आणि अज्ञान कार्य जे जे काही त्यांच्या पूर्ण विस्मृतीसाठी या बोधाची अत्यंत जरूरी असते. तोपर्यंत ही वृत्ती असते. पण शुद्ध ज्ञान स्वरुपी या ज्ञानवृत्तीचाही लय शुद्ध आत्मस्वरुपांत होतो. जसे इंधन-सर्पण आहे तो पर्यंतच अग्नि असतो. इंधन-सर्पण म्हणजे जळण्यासारखे काही राहिलेच नाही, मग आता अग्नि कुठे आणि कसा राहणार ??? तसा हा आत्मबोध पण अग्नीसारखा जागच्या जागीच शांत होतो.

"**सोऽहं तेही अस्तवले। जेथ सांगतेचि सांगणे झाले। द्रष्टत्वेसी विराले। दृश्य जेथ॥**" असा हा आत्मबोध अनिर्वचनीय आहे. कारण या बोधात त्रिपुटीचाच लय होतो. श्री तुकोबारायांनी हे प्रमेय सोप्या शब्दात सांगितले, "**देव पहावया गेलो। तेथे देवचि होवोनी ठेलो।**" ज्ञानोबाराय पण सांगतात, "**एवं वस्तूसि जाणो जातां। जाणणेचि जे वस्तू तत्वता। मग जाणणे आणि जाणतां। केवी उरे ?॥**"

म्हणून ज्ञानोबाराय या अभंगाच्या पहिल्याच चरणात म्हणतात, "**साधूबोध झाला, तो नुरोनिया ठेला।**"

"**मी ब्रह्म आहे**" असे वृत्तिज्ञान हाही एक अज्ञानाचाच भाग आहे. लोखंडाची बेडी आणि सोन्याची झाली तरी ती बेडीच की नाही ??? अविद्या ही स्थूल स्वरुपांत असता, ती "**मी देह आहे**" असा विपरीत बोध करविते आणि ती अविद्या स्थूलरूपाने नाश पावली तर मग "**मी ब्रह्म आहे**" अशा बोधाने शिल्लक राहते. अविद्या जिवंत असो अगर मेलेली, ती जीवाला बंधन करतेच. जिवंत अविद्या जीवास मी देह, मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी

दु:खी, मी जन्मणारा, मी मरणारा अशा बंधनात जखडून टाकते आणि मेलेली अविद्या मी मुक्त या मोक्षबंधनात अडकवते.

**“हा तत्त्वज्ञान दिवा। मरोनि इही लावावा। तरी हाही शीण लेवा। बोधरूपेचि॥ मोक्षचि बंध होये। तरी मोक्ष शब्द का साहे ?॥”** असे श्रीज्ञानराज विचारतात आणि त्याचे उत्तर त्यांनी **“अज्ञानाघरी त्राये। वाऊगीयांची॥”** अशा शब्दात दिले आहे. अज्ञानाच्या घरी यांची खोटीच प्रतिष्ठा आहे एवढेच. बागुलबोवा आहे का ? तर आईच्या दृष्टीने नाही पण लेकराच्या दृष्टीने तो खरा आहे. आहे की नाही मौज ? त्यामुळे बागुलबोवाच्या मृत्यूने बालक संतुष्ट होते पण माता ??? माता आणि इतरांच्या दृष्टीने तो नव्हताच, नाहीही. मग त्याचा मृत्यू कोण मानणार ? **“बंधनचि वावो। तेथ मोक्षा के प्रसवो। मरोनि केला ठावो। अविद्या तया॥”**

आत्मबोधाने अविद्या/अज्ञान मेले आणि त्या मेलेल्या अविद्येने मोक्षाला जागा करून दिली. आत्मज्ञान निखळ शुद्ध आहे. ते जर अन्य शब्दाचा आधार घेईल तर ते आपल्या स्वरूपाला विसरले असे होईल. जसे दिव्याला जर दुसऱ्या दिव्याची अपेक्षा झाली तर तो आपल्या स्वरूपाला प्रकाशाला विसरला असेच म्हणावयास हवे ना !!! तसेच आत्मस्वरूपाला आपल्या नित्य मुक्ततेचा विसरच पडला असेच म्हणावयास हवे. जर त्या नित्यमुक्त आत्मस्वरूपाने मोक्षाची अपेक्षा केली तर !!! बर्फाने शिताची, शस्त्राने शस्त्राची, अमृताने अन्य अमृताची अपेक्षा करण्यासारखेच होईल. **“तैसा ज्ञानस्वरूप आत्मा। ज्ञानेचि आपुली प्रभा। करीतसे सोऽहं मा। ऐसा बंधू॥”**

भगवान् श्रीकृष्ण उद्धवासारख्या भक्ताला याबाबत काय सांगताहेत पहा, “उद्धवा, आत्मज्ञानाचा अंगिकार करून संसाराची म्हणजेच कल्पित बंधाची निवृत्ति केली, एवढ्याने फक्त आठ आणे काम झाले पण ती निजवृत्तीसुद्धा टाकावी. उद्धवा अज्ञान नाहीसे झाल्यावर जो ज्ञानाभिमान उरतो तो

**ज्ञानाभिमान** टाकला तरच समाधान-सत्-चित्-आनंद/स्वानंद लाभतो. "मी ब्रह्म आहे" असा अभिमान हे शुद्ध ब्रह्माचे स्वरुप नाही तर अहंपणाने ते अशुद्धच आहे. तेव्हा मी ब्रह्म आहे हा अभिमान पण जावयास हवा. ज्ञानाचा **"मी ज्ञानी"** हा अभिनिवेश गेलाच पाहिजे. तो गेल्यावर जे उरते ते केवळ ब्रह्मस्वरुप. **"अज्ञान आटोनिया। ज्ञान येते उवाया। ज्ञानाज्ञान गिळोनिया। ज्ञानचि होय॥"** अज्ञानाबरोबर ज्ञानाचाही लेश उरला नाही म्हणजे केवळ फक्त स्वरूपज्ञानच शिल्लक राहते.

**"जो निरंजनी निदेला। तो आणिकी नाही देखिला। आपलाही निमाला। आठवू तया॥ परि जीवे नाही, नोहे। तैसे शुद्ध असणे आहे। हे बोलणेही न साहे। असे नाहीचे॥"** रानात झोपलेला राजा, त्याचे अन्य कुणाला भान नाही, इतकेच नाही तर झोपलेल्या त्या राजालाही झोपेत आपल्या राजेपणाचे भान नाही, तसेच जीव हा जोपर्यंत **"अहं ब्रह्मास्मि"** या वृत्तिरूप बोधात होता तोपर्यंत तो अनुभव शब्दाने सांगता येण्यासारखा होता. पण मग त्या अनुभवातला, **"सोऽहं"** ही अस्तंगत झाला, किंवा **"ब्रह्म मी हे सरे"** अशी स्वानंदता प्राप्त झाली की तो **आनंदानुभव** त्रिपुटीरहित असतो. तो शब्द काय सांगू शकणार ना ???

हा साधूबोध अनिर्वचनीय आहे. जसे आत्मस्वरूपाचे तसेच भक्तिप्रेमसुखाचे पण. **"प्रेम नये सांगता, बोलतां, दावितां। अनुभवे चित्ता चित्त जाणे॥"**

असाच साधुबोध होतो आणि झाल्यावर **"नुरोनिया ठेला"** अशा निर्विशेष रुपानेच शिल्लक राहतो. जीवाच्या विपरीत कल्पना नाहीशा होऊन जेव्हा जीवदशाच नष्ट होते तेव्हा आपण केवळ सच्चिदानंद भक्तिप्रेम स्वरुपातच उरतो यालाच, या उरण्यालाच श्रीज्ञानराजांनी **"नुरोनिया ठेला"** असं म्हणलेले आहे. ते म्हणतात, **"किंबहुना श्रीनिवृत्ति। ठेविले असे जिथे स्थिती। ते काय देऊं हाती। वाचेचिया ???॥"** श्रीगुरुकृपाप्रसादाने जी आनंदस्वरुपता लाभली ती वाचेच्या द्वारा कशी प्रगट करू ???

"मी ब्रह्म आहे" या बोधाचाही अभिनिवेश गेला पाहिजे. ह्या अहंकारात "ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान" त्रिपुटी असते. पण हा "अहं" गेल्यानंतर केवळ त्रिपुटीरहीत भान असते. "**जंवअज्ञान तव आटोनिया। ज्ञान येते उवाया। ज्ञान ज्ञान गिळूनिया। ज्ञानचि होय॥**" अज्ञानाचा, आत्मज्ञानाने नाश झाला असता केवळ स्वरूपज्ञानच शिल्लक राहते. तेच मुक्त कैवल्य. ज्ञानेश्वरमहाराज असे "कैवल्याचा पुतळा" आहेत. "**जो निरंजनी निदेला। तो आणिकी नाही देखिला। आपलाही निमाला। आठवू तया॥ परि जीवे नाही, नोहे। तैसे शुद्ध असणे आहे। हे बोलणे न साहे। असे नाहीचे॥**"

जो घनदाट अरण्यात झोपला आहे, त्याला आणिक दुसऱ्या कोणी पाहिला नाही, झोपल्यामुळे त्याला आपलाही आठव (आहे पणाचे भान) नाही, तरी जीव नाही असे नाही (दोन नकार म्हणजे एक होकार !!!) तसे "**शुद्ध असणे**" आहे आणि हे शुद्ध असणे "**आहे-नाही**" हे बोलणे सहन करत नाही. जोपर्यंत जीव "अहं ब्रह्मास्मि" या वृत्तिरुप बोधात असतो, तोपर्यंतच तो अनुभव शब्दांनी सांगण्यासारखा असतो, पण ज्या आत्मानुभवात "**सोऽहं तेहि अस्तवले**" किंवा "**मी ब्रह्म हे सरे**" अशी निःशब्द स्थिती प्राप्त होते तो अनुभव त्रिपुटीरहित असतो. मग शब्दाने काय आणि कसे सांगणार ? भक्तिप्रेमसुखावस्था पण अशीच अनिर्वचनीय आहे. श्रीतुकोबाराय म्हणतात, "**प्रेम नये सांगता-बोलता-दावितां। अनुभवे चित्ता चित्त जाणे॥**" या अभंगातील "नुरोनिया ठेला" याचा अर्थ, निर्विशेष रूपानेच राहिला असा आहे.

हीच निर्विशेष अवस्था छान उलगडून दाखविणारा श्री तुकाराम महाराजांचा एक सुंदर अभंग आहे. महाराज म्हणतात - "**बोलो अबोलणे, मरोनिया जिणे। असोनि नसणे जगिं आम्हा॥१॥ भोगी त्याग झाला, संगीच असंग। तोडियले लागमाग दोन्ही॥धृ.॥ तुका म्हणे नव्हे दिसतो मी तैसा। पुसणे ते पुसा पांडुरंगा॥३॥**

जीवाने आपल्या स्वरूपाविषयी केलेल्या विपरीत कल्पना जेव्हा नाहीशा होतात व त्यायोगे खोटी-भ्रांत जीवदशाच नष्ट होऊन जीव आपल्या सच्चिदानंद स्वरुपांत "**स्थित-शांत-दांत**" राहतो यालाच "नुरोनिया ठेला" असं म्हणतात. श्रीज्ञानराज आपल्या गुरुकृपेची अनुभूती अशीच सांगतात, "**किंबहुना श्रीनिवृत्ति। ठेविले असे जिये स्थिती। ते काय देऊ हाती। वाचेचिया ???॥**" श्रीगुरुकृपाशिर्वादामुळे त्यांनी काय ? किती ? कसं ? "**निजानंदकार**" करून सोडलंय ते वाचेने काय, किती आणि कसं सांगावं ना ???

ही "स्वानंदाकारता" न सांगण्या-बोलण्या अगर चर्चा करण्याजोगी. तर केवळ चित्तानेच चित्ताच्या ठिकाणी फक्त त्रिपुटीरहित होऊन अनुभवायची की ज्यात अनुभव-अनुभवाचा विषय आणि अनुभवणारे आपण एकमेकांशिवाय/ पेक्षा वेगळे यत्किंचितही उरतच नाही. अग्नी कापुराला जाळण्याचे निमित्ताने आपला आपणच नाश करून घेतो. अगदी तसेच अज्ञानाचा नाश करण्याच्या निमित्ताने हे "अहं ब्रह्मास्मि" वृत्तीज्ञानही आपलाच नाश करून घेते. "**मी ज्ञानी**" शहाणा, हा अहं गेल्याशिवाय **भक्तिप्रेमभाव** आकारास येईलच कसा आणि वाढणार तरी कसा ???

"**जेव्हा कापुर जळो सरे। तयाचि नाम अग्नि पुरे। मग उभयतातीत उरे। आकाश जेवी॥ तेथ ब्रह्म-आत्मा-ईशु। यथा बोला मोडे सौरसु। न बोलणेचाही पैसु। नाही तेथ॥ ने बोलणेहि न बोलोनी। जे बोलिजे तोंड भरोनि। जाणीव नेणीव नेणोनि। जाणिजे जे॥**" भक्तिप्रेमभावातही न बोलताच तोंड भरून बोलता येते.

ज्ञानाने आपण सर्व जाणू शकतो पण स्वत:ला (स्वरुपाला) मात्र नाही. कारण आपण स्वरूपत: ज्ञानाच्याही मागे म्हणजेच ज्ञानाचेही प्रकाशक आहोत. "**स्वसंवेद्या आत्मरूपा**" असे. डोळा सर्व कांही पाहू शकतो पण तो स्वत:ला पाहू शकत नाही म्हणून **स्वरूपांस** जाणणे राहात नाही तर **होणे** घडून येते. होणे म्हणजे आपण -आपल्या सच्चिदानंद रुपात-श्रीगुरुरूपांतच राहणे. श्रीगुरुस्वरूपांत राहण्यात-वावरण्यात-गढून जाण्यातच समाधान आहे.

समाधान अनुभवजन्य आणि अवाच्य असते. यात बोधानेच बोध बोधावा, आनंदानेच आनंद भोगावा, सुखानेच सुख घ्यावे, प्रभेनेच प्रभेला आलिंगावे, ऐक्यभावच ऐक्याला यावा, विश्रामच विश्रांतीला यावा, अनुभवाने अनुभव घ्यावा, भक्तिप्रेमसुखानेच भक्तिप्रेमसुख भोगावे असे आहे. तेच म्हणजे "**अनुभव ठायीचे मुरणे**".

कल्पित पदार्थ ज्याच्यावर कल्पिला जातो त्यालाच शास्त्रात अधिष्ठान असे म्हणतात आणि त्या सर्व कल्पित पदार्थांची अधिष्ठानातच निवृत्ती होत असते. हेच ज्ञानेश्वर महाराज या अभंगातील "**ठायीच समाप्ती झाली जैसी**" या चरणात सांगतात. "ठायीच समाप्ती" म्हणजे ज्या अधिष्ठानावर/आत्मस्वरूपावर जीवदशा भासली तीच जीवदशा आत्मस्वरूपी समाप्त होते. मग जीव जीवपणाने न उरता ब्रह्मपणाने शिल्लक राहतो. आत्मविचाराने जरी ही अवस्था प्राप्त होत असली तरी या प्राप्तीत म्हणजे अनुभवात/बोधात "मी ब्रह्म" अशी जाणीव शिल्लक राहतेच आणि हाच ज्ञानाचा "**बंध**" आहे. हा ज्ञानबंध **भक्तीवाचून** सुटत नाही. ज्ञानाच्या ठिकाणी हे ज्ञानबंधन तोडण्याचे सामर्थ्य नाही कारण ते ज्ञानातूनच निर्माण झालेले आहे.

म्हणून श्री एकनाथ महाराजांनी हा बंध तोडण्याचे एकमेव साधन सांगितले, "**निर्विकल्प स्वरूप स्थिती। अवश्य पावणे आहे चित्ती। तै करावी भगवद्‌भक्ती। उत्कट प्रीती अविश्रम॥**" जसा कापूर जळून गेला की कापूर व ज्योती दोन्हीपण अंतर्धान पावतात तसेच "मी देह आहे" ही अज्ञान वृत्ती व "मी ब्रह्म आहे" ही ज्ञानवृत्ती या दोन्ही भावांचा उपशम झाला पाहिजे. हीच अढळ अशी हरिसायुज्यता !!! सर्व भावातील केवळ स्थिती-कैवल्य. आपले श्री तुकोबारायही सांगतात, "**लवण मेळविता जळे। उरले काय निराळे ?॥ तुका म्हणे झाली/होती (म्हणजे आहेच)। तुझी माझी एक ज्योती॥**"

असा हा केवळ अद्वैत प्रत्यय. त्याची शब्दाने चर्चा करणे हे सुद्धा योग्य नाही. आता तिसरे चरण -

**''मोक्ष रेखे आला भाग्ये विनटला। साधूंचा अंकिला हरिभक्त॥''**

या मोक्षाच्या रेखेवर म्हणजेच भूमिकेवर आलेला जो कोणी आहे तो भाग्याने विनटलेला आहे म्हणजेच मोठा दैववान आहे हेच खरे भाग्य. याच्यापुढे इतर सर्व भाग्यांना भाग्य म्हणावयाचे म्हणजे फळ्यावर काढलेल्या सूर्याच्या चित्रालाच सूर्य म्हणण्यासारखे. त्यांना भाग्य म्हणण्याचे कारणच नाही. व्यावहारिक जनाची भाग्याची व्याख्या काय ? **''ज्यासी प्रपंचाचा अति विस्तार। त्यासी म्हणती भाग्य थोर। जो नाना भोगे पाळी शरीर। सुकृती नर त्या म्हणती॥''**

अध्यात्माच्या, संतांच्यादृष्टीने भाग्य कोणते ? ज्ञानोबाराय सांगतात, भाग्य - **''एवं जीवधर्महीन। जो जीवेसी अभिन्न। देखे तो सुनयन। ज्ञानियांमाजी॥ ज्ञानाचा डोळा डोळसा। माजी तो वीरेशा। हे स्तुती नव्हे बहुवसा। भाग्याचा तो॥''** श्री तुकाराम महाराज म्हणतात, **''तुका म्हणे भाग्य या नावे बोलिजे। संसारी जन्मिजे। याचिलागी॥''**

या अवस्थेत भक्ताला भगवंताचा सगुण साक्षात्कार होतो. हा अनुभव अलौकिक, ज्याचा त्यानेच स्वच्या ठिकाणी जाणण्याचा. त्यामुळे भक्त त्याची वाच्यता करीत नाही, गुप्तता राखतो. तरीही पण तो लपवून ठेवता येत नाही. कारण ती **''परा अवस्था''** लपून राहात नाही. जसा पिकलेल्या फणसाचा सुवास पसरल्याशिवाय राहात नाही. या अलभ्या लाभामुळे हा भक्तश्रेष्ठ संपूर्ण परमात्मज्ञान व सगळ्या दैवी संपत्तीचा निधीच होतो !!!

एखाद्या किल्ल्याच्या तटाला लहानसा झरोका असेल तर त्यातून डोकावून पाहिल्यास दुर्गाच्या आतील भागाचे स्वरुप कळते तसेच या महावैष्णवाचे सम्यग् जीवन म्हणजे अगोचर, अमेय, अनंत परमात्म्यास जाणण्याचे गवाक्षच !!!

ज्ञानराज म्हणाले, **''परि हेचि आत्मसिद्धि। जो कोणी भाग्यनिधि। श्रीगुरुकृपालब्धी। काळी पावे॥''** ही गुरुकृपा प्राप्त होणे, हे भाग्य आहे,

दैव आहे. दैव म्हणजे काय ??? "**दैव जैसे कवतिके। काहीच दैन्य न देखे।।**" कोणत्याही प्रकारचे दैन्य ज्या अवस्थेत नसते त्याला "**दैव**" म्हणतात. ज्ञानराज द्वैतभावासच दैन्य म्हणतात. "**सत्वशुद्धि साहाकारे। गुरुकृपामृत तुषारे। सासिवलेनि ओसरे। द्वैत दैन्य।।**"

आत्मबोधानेच जीव या द्वैताच्या दैन्यातून व सर्व पारपंत्र्यातून मुक्त होतो व स्वतंत्र-स्वसुखाचा-स्वानंदाचा पूर्ण अनुभव घेतो. अशा आनंदाकार झालेल्या हरिभक्ताचे, त्याच्या भाग्याचे वर्णन किती व कसे करावे ??? "**अहो भाग्यम्, अहो भाग्यं। हरिनाम रतात्मनाम्।।**"

ज्याला "हरिनामरतात्मता" लाभली त्याचे भाग्य केवढे मोठे ? त्याच्या भाग्याचे वर्णन-गुणगान नारदपुराणांत फार छान केले आहे. असे भाग्य त्याला का प्राप्त होते ? तर तो अत्यंत निरभिमान व विनम्र असतो. "**अखंड अगर्वता होवोनि असती। तयांची विनय हेचि संपत्ती।**" असं श्री ज्ञानदेवांनी वर्णन केलं आहे. "**लघुत्वाचेनि मुद्दले। बैसला गुरुत्त्वाचे सेले।**" असे असतात नामधारक. मोठे नम्र आणि कसे म्हणाल तर ???

"**साधूंचा अंकिला हरिभक्त।**" अंकिला म्हणजे आज्ञाधारक सेवक. साधूंनी ज्याची अधिकारता जाणून आपलासा केलं आहे असं. "**इया श्री गुरुचरण सेवा। हो पात्र तया दैवा। जे सकळार्थ मेळावा। पाटु बांधे।।**" किवा माऊलीचीच आणखी एक ओवी पहा, "**अवघियाची दैवा। जन्मभूमि हे सेवा। जे ब्रह्म करी जीवा। शौच्यातेही।।**" साधूंचा/श्रीगुरुंचा अंकित झाल्याशिवाय हे नामाचे प्रेम कोणालाही प्राप्त होत नाही !!! श्री ज्ञानराज म्हणतात, "**तैसे सबाह्य आपुले। जेणे गुरुकुळी ओपिले। आपणपे केले। भक्तीचे घर।।**" सर्व साधन-संपन्न आहे पण श्रीगुरुंचा अंकित नसेल तर महत्प्रयासाने संपादन केलेली साधनेदेखील व्यर्थ ठरतात.

"**म्हणौनि भाग्य जै सानुकूळ। जालिया, उद्यम-केले सफळ। तैसे श्रुताश्रित सकळ। गुरुकृपा माच।।**" अगदी हरिभक्त जरी असला तरी तो साधूंचा/श्रीगुरुंचा अंकित असावा लागतो. किंबहुना "**साधूंचा अंकिला**" हे

इथे हरिभक्ताचे विशेषण म्हणूनच वापरले आहे. हरिभक्ती तर करतोय पण श्रीगुरुंचा जर अंकिला नसेल तर त्याची हरिभक्ती व्यर्थ आहे. श्री तुकोबाराय याबाबत काय म्हणतात ते बघा, **''अवघा भार वाढे देवा। संत-सद्गुरुसेवा न घडता॥''**

संत-सद्गुरुसंगतीमुळे आत्मनिरीक्षण करता येते व त्यामुळेच दोषनिवृत्ती कशी करावयाची ते कळते. अन्यथा केवळ स्वप्रयत्नाने हे कधीच साधता येत नाही. एक संस्कृत वचन आहे **''अयंहि परमो लाभो नृणां साधू समागमः।''** श्री तुकाराम महाराज म्हणतात, **''संत मारगी चालती। त्यांची लागो मज माती। काय ? करावीत साधने। काय नव्हे ? एक तेणे॥ तुका म्हणजे सद्गुरुपायी। जीव ठेविला निश्चयी॥''**

श्री ज्ञानराजही या अभंगाच्या शेवटी म्हणत आहेत, **''ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी।''** म्हणतात, मला संतसज्जनांच्या/श्रीसद्गुरुंच्याच संगतीचीच गोडी म्हणजे मोठी आवड आहे. श्रीसंत-श्रीगुरु संगतीची आवड कशी असावी याबाबत श्रीभगवान अर्जुनाला म्हणताहेत, **''आत्मज्ञाने चोखडी। संत ते माझी रूपडी। तेथ दृष्टी पडो आवडी। कामिनी जैसी॥''** संतांचे/श्रीगुरुंचे परमात्मानुभवी सिद्धांचे आपल्या घरी आगमन होणे, त्यांची संगत-सहवास लाभणे, त्यांचा प्रेमभाव प्राप्त होणे ही एक दुर्लभ पण मोठी भाग्याची पर्वणीच आहे.

तुकोबाराय पण याला पुष्टी देतात, **''सर्व सुखे आजि येथेचि वोळली। संतांची (सद्गुरुंची) देखिली चरणांबुजे॥''** कारण मग नामाचा-नामस्मरणाचा-नामघोषाचा, भजनाचा, कीर्तनाचा, भक्तीप्रेमाचा, ब्रह्मानंदाचा महापूर घरात लोटतो.

**''माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया॥१॥**
**आवडे ज्या हरि अंतरापासुनी। ऐसियांचे मनी आर्त माझे॥२॥**
**तयालागी जीव (सद्गुरुसाठी) होतो कासावीस। पाहतील वास नयन हे॥३॥**
**तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा। गाऊ या गोपाळा गुरुसंगे॥४॥**

या सगळ्याचा परिपाक होतो.

**"हरि दिसे जनी-वनी आत्मतत्त्वी॥"** यात जनी म्हणजे जननधर्माने युक्त अशा सर्व चेतन प्राणीमात्रात. वनी म्हणजे सर्वत्र-अचेतन पदार्थातही आणि आत्मतत्त्वी म्हणजे आपल्या आत्मस्वरुपात. हरि आपल्या हृदयात, तसेच सर्व चराचरात दिसतो अशी अवस्था काय ? तिची सुखरुपता काय ? याचे वर्णन भगवंतांनी अर्जुनाला विवरण करून सांगितले आहे पहा. ज्याला जनी-वनी एक हरीच दिसू लागला त्याला **"अपार सर्व सुख"** प्राप्त होते. **"आनंदाचे डोही आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे॥"** अवघा रंग एक होतो, श्रीरंग रंगी रंगून जातो.

जनी म्हणजे सर्व जगांत-लोकांत एवढाच अर्थ नाही तर जननधर्माने युक्त अशा सर्व तचेतन प्राणीमात्रांत आणि वनी म्हणजे फक्त वनातच असं नाही काही; मग अर्थातच सर्व दृश्य, स्थूल, जड, अचर, अचेतन वस्तूमात्रांत सुद्धा. आत्मतत्त्वी म्हणजे आपल्या **"स्वात्मस्वरुपांत"**. एकच श्रीहरी-श्रीगुरु-श्रीकृष्ण आपल्या हृदयात, तसेच सर्व चराचरात प्रत्ययास, अनुभवास येताना, दिसताना, काय उंच अवस्था/बोध आहे याचे वर्णन करून त्या **अवस्थेची** परमसुखरुपता भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला वर्णन करून कथन केली. श्रीगुरु ज्ञानेश्वरमहाराजांचे त्यावरील भाष्य पहा. ज्ञानोबाराय म्हणतात - **एरव्ही तैंची अर्जुना। होइजे ब्रह्मसंपन्ना। जैं या भूतकृती भिन्ना। दिसती एकी॥ मग जया तया कडे। ब्रह्मचि दिसे उघडे। किंबहुना जोडे। अपार सुख॥**

भिन्न-भिन्न वस्तूमात्रांत एकच परमात्मा अनुभवण्यास/प्रत्ययास येणे हीच, अर्जुना, ब्रह्मसंपन्नता. मग अशा ब्रह्मसंपन्नतेवर आरुढ झाल्यावर त्याच्या दृष्टीस एकमेव "उघडे ब्रह्मच" जिकडे-तिकडे दिसावयास लागते किंबहुना असं दिसणं हीच अपरंपार सुखरुपता.

सामान्य मनुष्यही दृश्य पाहतो आणि वरील बोधावर आरुढ झालेले महावैष्णवही दृश्य पहातातच. पण सामान्यजन भेददृष्टीने आणि परमभागवत अभेददृष्टीने. सर्वसामान्यांच्या दृष्टीत जनी, वनी, आत्मतत्त्वी एक हरीच

दिसणे शक्य नाही. या भेददृष्टीला-भेदज्ञानालाच वेदांतदर्शनात **''अज्ञान''** म्हणतात व हे अज्ञानच सगळ्या संसार-दु:खाचे बीज आहे. जनी, वनी, आत्मतत्त्वी एक श्रीहरीच प्रचितीला येणे याचेच नाव **''ज्ञान''**. हे ज्याला प्राप्त होते त्याला संसार म्हणजे जन्ममरण नाही. **''नारायण भूती न कळे जयासी। तया गर्भवासी येणे जाणे॥''**, असं तुकोबाराय म्हणतात.

कोणी म्हणेल की, संतसंगतीची/श्रीगुरुसंगतीची ज्याला गोडी आहे, त्याला जनी, वनी, आत्मतत्त्वी हरी दिसतो !!! अगदी बरोबर !!! पण सर्वत्र जर एकच श्रीहरी आहे, तर मग सर्वांनाच त्याची प्रतीती यायला नको का ??? इथे ज्ञानी-अज्ञानी असा भेद का ? वास्तविक हरी सर्वत्र सम असेल तर तो सर्वांनाच दिसायला हवा नाही का ? या शंकेचे श्रीज्ञानराजांनी फार छान उत्तर दिलं आहे. ज्ञानराज माऊली म्हणाली - **''येरव्ही संकल्पाचिये सांजवेळे। नावके तिमिरेजती बुद्धीचे डोळे। अखंडितचि, परि झांवळे। ''भूतभिन्न'' ऐसे देखे॥ तैंचि संकल्पाचि सांज जैं लोपे। तरी अखंडितचि आहे स्वरूपे। जैसी शंका जात खेवो लोपे। सापपण मोळेचे''**

दृश्यानुरुप दर्शन हा जरी नियम असला तरी प्रतिबंधक दोषांमुळे काही वेळेस, दृश्य जसेच्या तसे प्रतीतीला येत नाही (वरील ओवीमधील दृष्टांताप्रमाणे). काही वेळेस त्याचे सामान्य ज्ञान होते; तर काही वेळेस त्याच्या मुलभूत स्वरूपाहून विपरीत ज्ञान-भान होते. जसं पडला आहे निळमण्यांचा रत्नहार पण हा नवरत्न हारच आहे हे कळत नाही तर येथें **काहीतरी** पडले आहे एवढेच समजते आणि काही वेळा हाराचे ज्ञान-भान न होता हा एक मोठा विषारी सर्पच लोळत आहे असे विपरीत ज्ञान-भान होते.

सर्वसामान्य जीवांचीच काय पण मोठ-मोठे शास्त्रकार, दर्शनकारसुद्धा जीवब्रह्मैक्य मानावयास तयार नाहीत. त्यांच्या मते जीवात्मा हा अल्पज्ञ, अल्पशक्तिमान, मर्यादित, कर्ता, सुखी-दु:खी, भोक्ता, विकारी असा आहे तर परमात्मा सर्वदा, सर्वशक्तिमान, निर्विकार, अकर्ता, अभोक्ता, सर्वज्ञ, सुखरूप आहे. परंतु हा भेद **काल्पनिक** आहे, वास्तव नाही.

जीवब्रह्माची ऐक्यता, देव-भक्तांची एकता, श्रीगुरु-सत्‌शिष्याची एकरसता-एकरुपता स्वभावत:च आहे, **कृत्रिम** नाही. तेथे भेदाला अणुमात्र वाव नाही. आरशांत पाहताना एकच एक, आपल्याला आरशांत दुजेपणानी पाहात असला तरी जो जसा एकटा-एकच तसंच हे अद्वैत. अज्ञानांत प्रतिबिंबीत झालेला जीव आपणाला जरी बिंबापेक्षा वेगळं समजत असला तरी तो मुळात **बिंबच** आहे. हरिभक्तीचा परिणाम, गुरुबोधाचा परिणाम काय तर श्रीहरीचे "**चिद्‌घनस्वरुपांत दर्शन**" असे सगुण दर्शन होते ही; पण एवढाच का परमात्मा ? तसं झालं तर तो सांत, सोपाधिक-मर्यादित ठरेल. पण भगवंत अनंत-अपार-सर्वव्यापी आहे. म्हणून वैष्णवाला सर्वत्र, सर्वपदार्थांत, सर्वकाळी एक श्रीहरीच दिसतो. मग या दर्शनात अपार सुखरूपता आहे. "**ज्ञानदेवा गोडी संगति सज्जनि। हरी दिसे जनी, वनी, आत्मतत्त्वी॥**"

* * * * *

# अभंग क्र. ७

**पर्वताप्रमाणे पातक करणे। वज्रलेप होणे अभक्तांसी॥१॥**
**नाही ज्यासी भक्ति, तो पतित अभक्त। हरिसी न भजत, दैवहत॥२॥**
**अनंत वाचाळ, बरळती बरळ। त्यां कैसेनि गोपाळ पावे हरी॥३॥**
**ज्ञानदेवा-प्रमाण आत्मा हा निधान। सर्वांघटी पूर्ण एक नांदे॥४॥**

या सातव्या अभंगात श्री ज्ञानदेवांनी अभक्तांची लक्षणे व अभक्तीचे फळ, परिणाम सांगितले आहेत. उद्देश काय तर कोणीही, कधीही, कुठेही, कशामुळेही अभक्त असू नये/होऊ नये. अभक्त कोण ? अभक्त कोणाला म्हणावे ? याची व्याख्या दुसऱ्या चरणात करतात, ''नाही ज्यासी भक्ती, तो पतित अभक्त'' जो हरीची प्रेमस्वरुप भक्ती करीत नाही तोच अभक्त. **''जयासी नावडे विठोबाचे (म्हणजे भगवंताचे) नाम। जाणावा तो अधम तुका म्हणे॥''**

असे काही **हरीचे लाल** या जगात आहेत की कित्येकजणांना हरिभक्ती करावी, मनापासून करावी असे कधी आतून वाटतच नाही. का म्हणाल तर ते आपल्या हाडा-मांसाच्या स्थूल, नश्वर अशा देहालाच सर्वस्व मानतात. त्यांच्या विचारांची मजल इंद्रियजन्यसुखाच्या पलीकडे कधी जातच नाही !!! देहाचे सुख तेच त्यांचे सुख व देहदु:ख ते त्यांचेच दु:ख असं त्यांचे तत्त्वज्ञान ??? जोवर जीवन आहे तो तोवर इंद्रियजन्य सुखोपभोगात दंग व्हावं हाच जीवनाचा हेतू, दृष्टीकोन. ''**देह खंडा नाम आत्मा।**'' किंवा ''**देहचि आपणपे मानिती।**'' अशी प्रबळ देहबुद्धी. मग काय ? ''**यावत् जीवेत् सुखंजीवेत्। ऋणं कृत्वा घृतं पीबेत॥**'' हीच धारणा.

अशाच धारणेमुळे मग हे विश्व निर्माण करणारा, त्याचे अचूकपणे नियंत्रण करणारा ''**परमेश्वर**'' नामक कोणी एक सर्वसमर्थ, सर्वज्ञ, न्यायी, पण तितकाच करुणापारावार शास्ता आहे याची त्यांना जाणीवच नाही आणि

जरी कोणी करून दिली तरी त्यांना कळत नाही, पटत नाही, त्यांची **''ऐशी हे विश्वव्यवस्था''** आणि त्याचा व्यवस्थापक या सूत्रावर, मूल्यावर मुळीच श्रद्धा नाही. गोड परमार्थ कडू आणि कडू विषय तो गोडू जीवासि जाला असेच ते असतात.

श्री तुकाराम महाराज आपल्या एका अभंगात त्यांचे वर्णन करतात -

**''शूकरासी विष्ठा माने सावकाश। मिष्टांन्नाची त्यास काय गोडी ?॥**
**तेवी अभक्तासी आवडे पाखांड। न लगे त्या गोड परमार्थ॥**
**श्वानासी भोजन दिले पंचामृत। तरी त्याचे चित्त हाडावरी॥''**

भगवंताच्या ठिकाणी प्रवृत्ती आणि प्रपंचापासून निवृत्ती हे ते जाणतच नाहीत. पावित्र्य, सदाचार, भक्तिभाव यापैकी त्यांच्या ठायी काहीही नसते. देहभरण **''खाना-पिना-मजा करना''** हेच एक मात्र ध्येय. मग इतकी देहासक्ती शिगेला पावल्यावर भक्ती कोठली ??? आणि कशी होणार ना ??? आपण भगवंताला ओळखत नाही, त्याचे स्मरण करत नाही, त्याला शरण जात नाही, त्याच्या ठिकाणी आपला **''भक्तीप्रेमभाव''** नाही आणि हा सर्वच भाग म्हणजेच पर्वताप्रमाणे पातक आहे हा विचार त्यांच्या मनात सुद्धा कधी येत नाही.

याच पापबुद्धीचा **(भगवंताच्या विसराचा)** परिपाक तर सद्सद्विवेकहीनता, देहसुखवाद, दुरात्मता म्हणजे आत्मारामापासून दूर-दूर राहणे (आणि दूरदर्शन पाहाणे) हेच पापसंस्कार. मग तेच वज्रलेप होतात.

असा जरी पापी असला तरी त्याला जर अनुताप झाला व तो मग भगवंताची उपासना अनन्यभावाने करील तर तो सर्व वज्रलेप झालेल्या पापांपासून मुक्त होतो. भगवंतांनी गीतेत अभिवचन दिले आहे, **''अपिचेत् सुदाराचारो भजते माम् अनन्यभाक्। साधुरेवसमन्तव्यो सम्यक व्यवसितोहि सः॥''** अनुतापयुक्त अशा नामस्मरणाने (मणी ओढल्याने नाही) सर्व पातके तर जळतातच, नाही नाही तर नामधारक नामीशी एकरुप होतो. **''राम म्हणता रामचि होईजे। पदी बैसोनि पदवी घेईजे॥''**

लेप मग तो कोणताही असो स्थूल शरीरापासून सर्वप्रकारे वेगळाच ना !!! तो काही शरीराचा भाग नव्हे. ज्या कारणास्तव तो लावला जातो ते काम/ त्याचा उपयोग झाल्यावर तो काढूनच/धुवून टाकावा लागतो. काही लेप उन्हाने पाघळतात, काही लेप वाळले की गळून जातात, उदाहरणार्थ मातीचे कुल्ले, वाळल्यावर गळूनच पडतात ना ??? काही लेप पाण्याने धुतल्याने निघून जातात, पण काही लेप मात्र असे असतात की ते आपोआप तर जात नाहीतच एवढंच नाही तर पाण्याने धुतल्यावर पण जात नाहीत (लगेच) त्यांच्यावर कशाचाच परिणाम होत नाही; उदाहरणार्थ प्लॅस्टर. पण त्यापेक्षासुद्धा भगवद्‌विग्रहाची झीज झाल्यावर त्यावर केलेला वज्रलेप. अभक्ताची पातके वज्रलेपासारखीच. याचा अर्थ असा की ती त्या अभक्ताला दु:खभोग दिल्यावाचून सुटत/संपत नाहीत.

कोणी म्हणेल पातकांची निवृत्ती कशाला व्हायला हवी ??? ती राहिली म्हणून काय बिघडत ??? तर याचं उत्तर असं की, पातकांचे फळ दु:ख आहे. सर्व दु:खाला कारण पातकेच आहेत. पापे जर शिल्लक राहिली तर त्या पातकी माणसाला आकल्प दु:खच भोगावं लागतं आणि ''**मजलागी दु:ख व्हावे। ऐसे कोणी भावीना जीवे।**'' ज्ञानराज म्हणतात, ''**मग विधीची वाफ चुकवी। अन्यायाचे बीज विरुढवी। कुकर्माचा करी। राबु जरी॥ मग तयाचि सारिखे। अखंभाड पाप पिके। मग जन्मकोटी दु:खे। भोगी जीव॥**'' भागवतकार म्हणाले, जे आत्मस्वरूप भगवंताची भक्ती करत नाहीत व पापकर्मच करतात ते दु:खच भोगतात. नाथमहाराज म्हणतात, ''**मनुष्यदेही जे भजन नष्ट। ते होती गा स्थानभ्रष्ट। मग अध:पाते भोगिती दु:खकष्ट। अति उद्‌भट यातना॥**'' भगवान् श्रीकृष्ण गीतेत सांगतात, ''**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि-जन्मनि। मामप्राप्यैव कौंतेय, ततो यान्त्यधमांगतिम्॥**'' जन्मोजन्मी आसुरी प्रकृतिचा जन्म पावणाऱ्या मूढांना माझी प्राप्ती होत नाही. ते अत्यंत अधम-नीच अशा लोह-लोष्ट-पाषाणादी गतीला जातात. ज्ञानराज अभंगाच्या दुसऱ्याच चरणात म्हणतात, ''**नाही ज्यासी भक्ति तो पतित अभक्त।**''

भक्तीचा ओलावा ज्याच्या हृदयात नाही, मग तो कोणीही जरी असला तरी अभक्तच व अभक्ती हेच मोठं पातक. ज्ञानोबाराय तर म्हणतात, “**नामासी विन्मुख तो नर पापिया।**” त्यांनी एक छान दृष्टांत दिला, “जोपर्यंत सूर्याचा उदय होत नाही तोपर्यंत त्या वेळेला रात्र म्हणतात, तसं भगवंताची भक्ति नाही, नामस्मरण नाही तर मग बाकी सर्व महापापच नाही कां ??? ज्याच्या मुखी नाही नाम, तो अभक्तच आणि अभक्तापुढे सदैव दु:खाचेच ताट वाढून ठेवलेले असते. असा हरिभजन-नामस्मरण न करणारा दैवहत, दुर्दैवी, करंटा, भाग्यहीनच. “**करंटे कपाळ ज्याचे नाम नये वाचे॥**” मानवदेही हरिभक्ती हेच भाग्य. हीच श्रीमंती. नाथराय म्हणतात, “**निजभाग्याची परमजोडी। महासुखाची आवडी गाढी। सकळ गोडियांची परमगोडी। भक्ती रोकडी श्रीहरीची॥**” तुकोबाराय पण असंच म्हणतात, “**जाणे भक्तीचा जिव्हाळा। तोचि दैवाचा पुतळा॥**”

भाग्यवान/दैववान कोण हे ज्ञानराजांनी एका ठिकाणी स्पष्ट केले आहे, “**सदैव सभाग्य तोचि हरिरंगी नाचे॥**” सर्व प्रकारच्या दैन्याची निवृत्ती म्हणजेच खरे दैव. भगवत्नामातून जेव्हा भगवत्प्रसाद होतो, तेव्हा जीव सर्व प्रकारच्या दैन्यदुर्गतीपासून पुर्णत: मुक्त होतो आणि भाग्याचा पुतळाच होतो. आचार्योपासनेच्या संदर्भात ज्ञानराज म्हणाले, “**आघवियाची दैवा। जन्मभूमी हे सेवा। जे ब्रह्म करी जीवा। शौच्यातेहि॥**” श्रीगुरुसेवेतून गुरुप्रसाद, हरिप्रसाद.

“**याच्चित: सर्व दुर्गाणि, मत्प्रसादात् तरिष्यसि।**” “**मग अभिन्न इया सेवा। मियाचि भरेल जेव्हा। माझा प्रसाद जाण तेव्हा। संपूर्ण जाहला॥ तेथ सकळ दु:खधामे। भुंजीजती जिथे मृत्यू जन्मे। तिथे दुर्गमेचि सुगमे। होती तुज॥**”

तुकोबा म्हणतात, नामाने “**हरि आला हाता। मग कैची भय चिंता॥**”??? भय, मोह, चिंता, दैन्य, यातून सर्वथैव मुक्तता, हेच खरे दैवाचे लक्षण.

नामस्मरणरुपी हरिभक्तीनेच जीव या सर्वप्रकारच्या दैन्यातून कायमचा मुक्त होतो.

आणि असा मुक्त तोच भाग्यवान आणि भाग्यवान असा की, मुक्त होऊनसुद्धा **नामाशिवाय** राहात नाही.

भगवद्‌भक्तीच्या योगाने जीव भाग्यवान होतो, पण ज्यांना भक्ति काय, प्रेमभक्ती, भक्तीप्रेमसुख काय याची जाणच नाही असे, "**अनंत वाचाळ बरळती बरळ।**" वाचाळ अनंत म्हणजे संख्येने पुष्कळच असतात आणि ते वाचाळ अनंत विविध प्रकारे बरळतच असतात. "वाचाळ" म्हणजे वृथा-अर्थशून्य बडबड करणारे. त्यांच्या या वृथा बडबडीला "बरळणे" म्हटले आहे. "बरळणे" जसे झोपेत असते, जागृतीत नसते. तशीच यांची ही बडबड स्व-स्वरूपाच्या अज्ञानरूप निद्रेतीलच असते.

वाचाळांचेसुद्धा प्रकार दोन आहेत. १) आस्तिक वाचाळ २) नास्तिक वाचाळ. आस्तिक वाचाळ म्हरजे वेद मानणारे, नास्तिक म्हणजे वेद न मानणारे व देवही न मानणारे. नास्तिक कोण ? तर चार्वाक देहात्मवादी. प्रत्यक्ष प्रमाण हे एकच प्रमाण मानणारे. यांची बुद्धी मात्र कुशाग्र असते. त्यांना वाक्‌चातुर्याचे मोठे वरदान लाभलेले असते. पण त्याचा उपयोग ते दुसऱ्यांना मूर्ख ठरविण्यात, स्वत: भोगासक्तीत राहून देव-धर्म-नीतीची कुचेष्टा करण्यासाठीच करतात. "**हरिनाम**" उच्चारण्याचा तर विचारही त्यांच्या मनाला कधीच शिवत नाही.

नाथराय म्हणतात, "**जेथ उच्चारु नाही नामाचा। ते जाणावी वांझ वाचा। न धरी हर्षु हरिकथेचा। निष्फळ उद्योग बुद्धीचा तो।।**" ही मंडळी देहालाच देव मानतात. यांना भक्ती म्हणजे प्रेमा फक्त भोजनाचाच असतो आणि मरण हीच त्यांच्या दृष्टीने सायुज्य मुक्ती असते. श्री तुकाराम महाराजांनी त्यांचे वर्णन अगदी यथार्थ अशा शब्दात केले आहे. "**देह तोचि देव, भोजन ते भक्ति। आणि मरण ते मुक्ति पाखंड्यांची।।**" जग सत्य, ब्रह्म मिथ्या, धर्माधर्मव्यवस्थितीरहित आहे, भगवद्‌रहित आहे असे यांचे मत.

आता आस्तिक वाचाळ काय असतात ??? जे वेद-प्रामाण्य मानतात पण भगवंत प्रमाण मानीत नाहीत. त्यांनी पुष्कळच धर्मग्रंथ वाचलेले-श्रवण केलेले असतात तरी पण आत्मानुभवात ते केवळ कोरडे पाषाणच असतात. सदैव आपल्याच वृथा पांडित्याचे सतत प्रदर्शन करत असतात. निष्फळ वाद उकरून काढण्यात मोठे उत्साही असतात. वेदांनी सांगितलेली यज्ञादी कर्मे करून त्यांच्याद्वारा पुण्य गाठीस बांधून स्वर्गात जावे व तेथील दिव्य-अतिदिव्य भोग भोगावेत हाच त्यांचा मानस. वेदाधारे बोलतात, केवळ कर्मकांडाची प्रतिष्ठाच गातात, कर्म करतात आणि **''या विषयावाचून काही। आणिक सर्वथा रम्य नाही।''** असेच यांना वाटते. पारत्रिक (म्हणजे स्वर्गातील-इतर लोकांतील) वैषयिक सुखाला लालचावलेले हे जरी स्वत:ला वैदिक म्हणत असले तरी वेदांच्या खऱ्या रहस्याला न ओळखून व्यर्थ बडबड करतात. ज्ञानोबाराय म्हणतात, **''मुखाने नामस्मरण न करता जे जे काही बोलणे ते अवघे बरळणेच.''**

हरिप्राप्तीकरिता हा वाचाळपणा सोडला पाहिजे व वाचेने उच्चार व चित्ताने अखंड **''नामस्मरणच''** करावयास हवे. नाथमहाराज बघा काय म्हणतात, **''जो नित्य जपे भगवद्नाम। तो जाणावा मजचिसम॥''** नाथांनी हे वाक्य भगवंताच्या मुखात उद्धवाला उपदेश करत असतानाचे म्हणून सांगितले आहे.

नामस्मरणाची अखंड आवड ज्याच्या ठिकाणी आहे, जेथे अखंड **नाम** आहे त्यांच्यावर भगवत्कृपा होते. मग जेथे नाम नाही त्यांना श्रीगोपाळाची प्राप्तता कशी होणार ??? म्हणून श्री ज्ञानराज या कडव्यात पुढं असं म्हणाले, **''त्यां कैसेनि गोपाळ पावे हरी॥''**

या चरणातील **''गोपाळ''** हे पद सहेतुक आहे पहा. ''गो'' म्हणजे गाय आणि ''गो'' म्हणजे वाणी. १) जो ''गोपाळ कृष्ण'' पशूंचादेखील सांभाळ, प्रतिपाळ करतो तो माणसाला सांभाळणार नाही का ? पण हे **वाचाळ** इतके पामर की पशूच्याही योग्यतेचे नाहीत. मग गोपाळ कसा पावणार त्यांना ? २) वाणीचा जो पालक-नियंता तो गोपाळ.

माणूस जर आपल्या वाणीचा उपयोग तिच्या पालकाच्या इच्छेनुसार/ **आवडीनुसार** करील तर मग वाणीचा पालक "**गोपाळ**" त्याच्यावर सहजच प्रसन्न होईल. भगवंताला आवड आहे त्याच्या नामस्मरण करणाऱ्याची. संत पण सांगतात, "**आम्हा आवडे नाम घेता। तोहि पिता संतोषे॥**" "**नामासाठी देव घालीतसे उडी।**" मग नाम घ्यावयाचे सोडून निरर्थक बाष्फळ बडबड करावी का ? बोलायचेच झाले तर नामाला **पोषक** अशी भगवंतचर्चा जरूर करावी.

ज्ञानराज हरिपाठाच्या या सातव्या अभंगाच्या शेवटच्या चरणात म्हणतात, "**ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान।**" ते म्हणताहेत, मला जर काही प्रमाण असेल तर "**आत्मा**" हा एकच प्रमाण आहे. तो आत्मा कसा आहे तर अज, अविच्छिन्न, अविनाशी परब्रह्म असून त्याचे नित्य-निरंकुश अस्तित्व इतर कोणावरही अवलंबून नाही. ते स्वयंप्रमाण आहे. त्याच्या सिद्धीसाठी तर्क, अनुमान, न्याय इत्यादी प्रमाणांची मुळीच आवश्यकता नाही. ह्या आत्मवस्तूचा प्रत्यक्ष अनुभव येणे हेच त्याचे एकमेव सर्वात श्रेष्ठ बलवत्तर असे प्रमाण आहे !!!

सर्वसामान्यत: परमार्थविन्मुख अशा जीवांना आत्मा हा प्रमाण म्हणजेच अनुभवाचा नसतो. जरी सर्वांच्या परमप्रेमाचा विषय आत्माच असला (म्हणजे आहे हं) तरी या आत्मवस्तूच्या "**सर्वांघटी पूर्ण एक**" या स्वरूपाची सर्वांना जाणीव नसते. यालाच अज्ञान किंवा विपरीत ज्ञान असे म्हणतात. हे आत्म्याचे अज्ञानच सर्व अनर्थांना, दु:खाला कारण आहे. दर्शनकारामध्येसुद्धा या आत्मस्वरूपाविषयी एकवाक्यता नाही.

कोणी ह्या आत्म्याला -

१) चैतन्य विशिष्ट देहमात्र मानतात.

२) तर कोणी चेतन इंद्रियांना आत्मा मानतात.

३) कोणी मनच आत्मा आहे असं मानतात.

४) तर कोणी बुद्धीलाच आत्मा मानतात.

५) शून्यवादी तर शून्यच आत्मा मानतात.

६) नैय्यायिक आत्मा कर्ता-भोक्ता मानतात.

७) तर सांख्यकार आत्मा केवळ भोक्ताच मानतात.

आपापल्या मताप्रमाणे (श्री ज्ञानेश्वर महाराज या मतवाद्यांना वाचाळ मानतात/म्हणतात) आणि तसे ते आहेतच.

पण हे आत्म्याचे खरे स्वरूप नाही. वास्तवात आत्मा हा देहादिकांहून अगदीच वेगळा आहे. श्रीगुरु ज्ञानराज तर जागोजागी, अनेक अंगांनी, अनेक प्रकारे देह व आत्मा यामधील फरक स्पष्ट करतात. ''**उजेडिया आणि अंधारेया। जो पाडु मृता उभेया। तोचि गा आत्मया। देहा जाण॥**''

देह नश्वर आहे, आत्मा अविनाशी आहे, देह विकारी आहे, आत्मा तर अविकारी आहे, देह जड आहे, आत्मा चेतन आहे, देह अशुचि आहे. आत्मा हा अत्यंत विशुद्ध आहे, देह अनित्य आहे, आत्मा हा नित्य आहे, देह अज्ञानी आहे, आत्मा ज्ञानमय-ज्ञानस्वरुप आहे. देह दु:खरुप आहे, आत्मा सुखरूप आहे.

श्री ज्ञानराज म्हणतात, ''**या देहाची हे दशा। आणि आत्मा तो एथ ऐसा। नित्य शुद्ध अपैसा। अनादिपणे॥**'' आत्म्याचे स्वरूप सांगताना या अभंगात माऊली म्हणतात, ''**आत्मा हा निधान। सर्वाघटी पूर्ण एक नांदे॥**''

निधान म्हणजे भांडार, सर्वज्ञान, सर्वसामर्थ्य, सर्वऐश्वर्य, सर्वयोग, क्रिया-कौशल्य, या सर्वांचे भांडार म्हणजे हा श्रीहरि. निधान शब्दाचा व्यापक अर्थ श्री ज्ञानेश्वर महाराजांनी नवव्या अध्यायांत आणिक स्पष्ट करून सांगितला आहे.

**''इथे नाम रुपे लोटती। वर्ण व्यक्ती आटती।**
**जातींचे भेद फिटती। जैं आकारू नाही॥**
**तैं संकल्प, वासना संस्कार। माघौते रचावया चराचर।**
**जेथे राहोनी असती अमर। तें निधान मी॥**''

प्रलयानंतर पुन्हा जगदाकाराची रचना करण्यासाठी, जीवांचे बीजरुप संकल्प-वासना-संस्कार जेथे जसेच्या तसे राखून ठेवले जातात ते "निधान" "मी" असं भगवान म्हणत आहेत. हे निधान म्हणजेच **आत्मा सर्वाघटी** एकच आहे. घट म्हणजे जीवदेह. देह जरी नश्वर असला तरी त्यात वास करणारा आत्मा अनंतत्त्वामुळे सर्वभूतमात्रांत एकच आहे. भगवान सांगतात, "**अहं आत्मा गुडाकेश, सर्वभूताशयस्थितः।**" किंवा "**देहि नित्यं अवध्यः अयं देहे सर्वस्य भारत।**" देहोपाधीने हा परिच्छिन्न होत नाही. त्याच्या एकत्त्वात अंतर पडत नाही, तो **पूर्ण** म्हणजे जो या आत्मस्वरुपाशी **ज्ञानाने, भक्तीने, सेवेने, प्रेमाने** एकरूप होतो. नामधारक परिपूर्ण होतो आणि एक म्हणजे एकमेवाद्वितीय असा भगवंत/आत्मा **प्रमाण** करणे म्हणजे भगवंताशी/श्रीगुरुशी एक होणे. **आत्मा** या शब्दांने सगुण-निर्गुण, भगवंत/सद्गुरु, भक्त-शिष्य **ऐक्य** दर्शविले आहे.



# अभंग क्र. ८

**संतांचे संगती, मनोमार्गे गती। आकळावा श्रीपती येणे पंथे॥१॥**
**रामकृष्ण वाचा, भाव हा जिवाचा। आत्मा जो शिवाचा राम जप॥२॥**
**एकतत्त्व नाम, साधिती साधन। द्वैताचे बंधन न बाधिजे॥३॥**
**नामामृत गोडी, वैष्णवा लाधली। योगिया साधली जीवनकळा॥४॥**
**सत्वर उच्चार प्रल्हादी बिंबला। उद्धवा लाधला कृष्णदाता॥५॥**
**ज्ञानदेव म्हणे, नाम हे सुलभ। सर्वत्र दुर्लभ, विरळा जाणे॥६॥**

या वरील आठव्या अभंगात ज्ञानराजांनी सत्संगतीपूर्वक होणाऱ्या अशा दिव्य नामस्मरणाचे महत्त्व सांगितले आहे. श्रीपती आकळण्याचा म्हणजेच भगवंत पूर्णत्त्वाने स्वाधीन ठेवण्याचा मार्ग या प्रस्तुत अभंगात सांगितला. संतांच्या/श्रीगुरुंच्या संगतीमध्ये एका मनोमार्गानेच गती म्हणजे गमन, हाच भगवंत आपलासा करण्याचा उत्तम पंथ आहे. प्रत्येक प्राणीमात्र व्यावहारीक जीवनात नित्य या मनोमार्गानेच चालत असतो. कोणाचाही, कोणताही व्यवहार मनावाचून होत नाही.

श्री ज्ञानदेव म्हणतात, "**आवडे ते वृत्ती किरिटी। आधी मनौनिचि घे उठी। मग ते वाचा दिठी। करासी ये॥ वाचूनि मनीचि नाही। ते वाचेसी उमटेल काई ?। बीजेवीण भुई। अंकुर असे॥**" श्री तुकाराम महाराजही हेच सांगतात, "**अंतरीचे धावे, स्वभावे बाहेरी। धरिताही परी आवरेना॥**"

सर्व इंद्रियांचे व्यवहार मनाआधीन आहेत. हे मन सर्व बाह्येंद्रियांचे नियामक प्रेरक आहे. जीवाचे गमन हेसुद्धा सर्वतोप्रमारे मनोमार्गानेच होत असते. पण ते गमनागमन सामान्यत: शब्दादी पंचविषयांकडेच झालेले सर्वत्र दिसून येते.

''मनोमार्गगति'' म्हणजे मनाच्या वृत्तीचा नैसर्गिकपणे वाहणारा प्रवाह. तो स्वैर, अनिर्बंध व बाहेरच धावणारा असतो. ह्या मनाची स्थूलाकडची धाव थांबवून ती धाव सूक्ष्माकडे (म्हणजे) भगवंताकडे करण्याचे कार्य संत/श्रीगुरु करत असतात. **''ते पहाटेविण पाहावित। अमृतेवीण जीववित। योगेविण दावित। कैवल्य डोळा॥''** अशी संतांच्या ठिकाणी मनाला भगवंताकडे वळवण्याची हातोटी असते म्हणून ज्ञानराज माऊली म्हणतात, **''संतांचे संगती, मनोमार्गे गती।''**

मनावर असे सुसंस्कार करावयास हवेत की त्याचा मार्ग, त्याची गती ही साधूंच्या, संतांच्या-श्रीगुरुंच्या प्रबोधनाप्रमाणे वागणारी होईल. संतजीवनाचा आदर्श, संतसहवास, संतवाङ्मय पुढे ठेवल्याने मनोमार्ग गती बाहेर धावण्याची थांबून (म्हणजे दूरदर्शन बघायचे सोडून) ईश्वराभिमुख वळेल. मनुष्याच्या क्रियाशील जीवनाचा समग्र प्रवाह भगवद्सन्मुख होणे हेच तर भक्तीचे आदर्श, प्रमुख लक्षण आहे. नारद पंचरात्रात म्हटले आहे, **''मनोगति: अविच्छिन्ना। हरी प्रेमपरिप्लुता। अभिसंधि विनिर्मुक्ता भक्ति: विष्णु: शंकरी॥''**

अशा निष्काम, एकधारा, निर्मल भक्तीनेच श्रीहरीला वश करता येते. पण जगाची रीतच अशी आहे की **''श्रीपतीला''** आकळण्यापेक्षा केवळ नुसत्या **''श्री''** लाच आकळण्याचा प्रयत्न करण्यातच सगळेजण गढून गेलेले असतात. मात्र जे विवेकी असतात ते **''ज्याची लक्ष्मी, तोच आपण बळकट धरावा''** असे म्हणतात. श्रीहरीला आकळण्यासाठी **''मनोमार्गेच''** जावयास हवे !!! का ???

तर **''मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो:॥ बंधाय विषयासक्तं, मुक्त्यै निर्विषयं मन:॥''** असं योगवासिष्ठांत श्री वसिष्ठ मुनींनी श्रीरामरायास सांगितले. आपले श्री तुकाराम महाराजही काय सांगतात पहा, **''मन करा रे प्रसन्न। सर्वसिद्धीचे कारण। मोक्ष अथवा बंधन। सुख-समाधान इच्छा ते॥''**

श्रीपती हातात येण्यासाठी बाह्य जड जगत आणि जगद्अंत:पाती अनेक जड कार्याकडे धावणारे आसक्त मन काही उपयोगाचे नाही. ते अत्यंत विशुद्ध पाहिजे. ज्ञानराज म्हणतात, "**तरी जयाचे चोखटे मानसी। मी होउनि असे क्षेत्र संन्यासी।।**" आपले तुकोबाराय पण सांगतात, "**तुका म्हणे चित्त करा रे निर्मळ। येऊनि गोपाळ राहे तेथे।।**" "**योगी ध्यानी ध्याती**" तरी त्यांचे मानस सोडून जातो आणि चोखट मनाच्या भक्तअंत:करणात कायमचा क्षेत्रसंन्यासी (म्हणजे एकदा एका जागी वास केल्यावर (संन्यास घेताना) शेवटपर्यंत कायमस्वरूपी निवास करूनच राहतो.)

पण चित्त हे चंचल आहे. "**चंचलं हि मन:**" चित्ताची चंचलता हेच सर्व दु:खाचे बीज आहे. ही चंचलता नष्ट होऊन त्यात भक्तिप्रेम निर्माण व्हावयास पाहिजे, म्हणजे मग त्या भक्तिप्रेमाने श्रीहरि आकळला जाईल. त्यासाठी एकमेव सत्संगतीच उपयोगी आहे. संतांच्या/श्रीगुरुच्या सहवासातच "**कर्म-उपासनेने**" अंत:करणावरील मल-विक्षेप दोष नष्ट होतात व मनोनिग्रह ही साधतो. साधन मग कोणतेही असो, ते संतसंगतीत/श्रीगुरुसंगतीत केले तर अधिकाधिक फलद्रूप होते. नाहीतर त्यात पूर्व, वर्तमान प्रतिबंध/विघ्ने येण्याचा दाट संभव.

पण ही संगती संतांची/श्रीगुरुंची कशी मिळणार ??? नाथमहाराज म्हणतात, "**कोटी जन्मांची पुण्यसंपत्ती। जरी गाठी असेल आयती। तैं जोडे माझे संतांची संगती। सत्संगे भक्ती उल्हासे।।**" संत कोण ??? पण त्या आधी कोण संत नाहीत ते पहावयास हवे !!! "**भक्ति ज्याची थोडी। पूर्ण विषयाची गोडी। धिक् त्याचे साधुपण। विटाळूनि वर्ते मन।।**" कवित्त्व करणारे, संतांचे आप्त, वेष संतांचा असणारे, आडनावाचे हे काही संत नव्हेत. दु:ख, आघात, संकटे, अपमान यांचे घावावर घाव बसूनही ज्यांची शांती बिघडत नाही ते संत.

भागवताच्या अकराव्या स्कंधात, अध्याय १४ मध्ये संत लक्षणे ठळकपणे अशी आली आहेत, "**निरपेक्षं, मुनिं, शांतं, निर्वेदं, समदर्शनं।**" निरपेक्ष

म्हणजे अपेक्षारहित, मुनि म्हणजे मननशील आणि मनन ही कशाचे ? तर संसाराचे नाही, एक गुरुतत्त्वाचे/बोधाचे, भगवंतांचे.

शांत म्हणजे देहाच्या ठिकाणी ''मी देह आहे'' अशी अहंता न स्फुरणे. काम, क्रोध, लोभ विराले मग अनुभवास येणारी अवस्था म्हणजे शांत. निर्वैर म्हणजे आपण तर कोणाही जीवाशी वैर करावयाचे नाहीच नाही, पण त्याचबरोबर माझे/मजविषयक पण वैर अन्य कोणाच्या जीवाचे ठिकाणी नाही असा दृढ विश्वास.

समदर्शन म्हणजे सारखे पाहणे. सम म्हणजे परमात्मतत्त्व. ते पाहणे म्हणजे समदर्शन आणि मौज अशी की ही समता बाणली की सहजच निर्वैरता प्राप्त होते. जोपर्यंत द्वैताचे-दुजेपणाचे भान आहे तोपर्यंत विरोधाचे-वैराचे कारण ना !!! ??? जेथे आपण सर्व एकच आहोत ही भावना, अनुभूती आहे तेथे कोण ? कुणाचा ? आणि कां म्हणून वैरी ???

नाथ महाराज म्हणतात, ''**आपणचि विश्व जाहला। तरी भेदभाव सहजचि गेला। म्हणोनि द्वेषु ठेला। तया पुरुषा।।**'' ''**निरपेक्षता आणि माझे भजन। शांती आणि समदर्शन। पाचवे ते निर्वैर जाण। पंचलक्षण मुख्यत्त्वे।।**'' निळोबा म्हणतात, ''**तेचि संत, तेचि संत। ज्यांचा हेत विठ्ठली। नेणती काही टाणा-टोणा। नामस्मरणावांचूनि।। काया, वाचा आणि मने। धाले, चिंतने डुल्लती।। निळा म्हणे विरक्त देही। आठवचि नाही विषयाचा।।**''

पण अशा संतांची संगतच कशाला हवी ? श्रीगुरुच्या संगतीतच कशाला राहावयास हवे ? तर मनुष्य हा संगप्रधान प्राणी आहे. जन्मापासून मरेपर्यंत तो ज्या संगतीत राहतो, वाढतो, त्यांच्या संगतीचा परिणाम त्याच्या समग्र जीवनावर होतो. दुष्टाच्या संगे दुष्ट, चोराच्याबरोबर चोर, तपस्व्याच्या संगतीत तापसी, संतांच्या/श्रीगुरुंच्या संगतीत संत आणि नामधारकाच्या संगतीत नुसता नामधारक नाही तर नामी म्हणजे भगवंतच होतो. त्याला हरिनाम, हरिनामाचे प्रेम व नाम-हरि-कथा यांची आवड लागते व मग ती क्रमश: वाढते.

संतसंगत-श्रीगुरुंची संगत फार-फार महत्त्वाची. सत्संगत म्हणजे काय याचे छान उत्तर वज्रसूचि उपनिषदात दिले आहे. "**सत्संग: स्वर्ग:। असज्जनसंसर्ग: एव नरक:॥**" आपले श्री तुकाराम महाराज पण असंच म्हणतात, "**संतांचा संग, तो पै स्वर्गवास। नर्क तो उदास निर्गळा॥**" नारदभक्तिसूत्रात नारदांनी "**दु:संग: सर्वथैव त्याज्य:।**" असंच सांगितलं आहे. नाथ महाराज म्हणतात, "**निमिषार्ध होता सत्संग। तेणे संगे होय भवभंग॥**"

काया, वाचा, मने तर श्रीगुरुजवळ/संतांजवळ असावेच पण ती संगती आणिक घट्ट कशी करावी याबाबत श्री ज्ञानराजांचे विचार फारच मननीय असे आहेत. "**परि ते करिती ऐसे। अभिमान दवडूनि देशे। एकाचिया विश्वासे। टेकती बोला॥ जे हिताहित देखती। हानी कणवा घेपती। पुसोनि शिणु हरती। देती सुख॥ तयांचेनि मुखे जे निघे। तेतुले आदरे चांगे। ऐकोनिया अंगे। मने होती। तया ऐकणे याचेनि नावे। ठेविती गा आघवे। तया अक्षरासी, जीवे। लोण करिती॥**"

श्रीगुरुच्या मुखातून जी-जी अक्षरे निघतात त्यावरून आपला जीव ओवाळून टाकणं म्हणजे त्याच अक्षरांना अनुसरणं म्हणजेच संतसंगतीने मनोमार्ग गमन करणं. "**मग अपेक्षित जे आपुले। तेहि सांगतील पुसिले। जेणे अंत:करण बोधले। संकल्पा नये॥**" श्रीगुरुच्या उपदेशाने ज्ञानसंपन्न झालेले अंत:करण पुन्हा सांसारिक संकल्पाकडे वळत नाही. श्रीपती आपलासा करण्याचा हाच एकमेव मार्ग आहे.

ज्ञानराज म्हणतात, "**हे चराचर आघवे। जिये प्रकृतिआंत सांठवे। ते शिणली जेथ विसवे। ते परमगती मी॥**" अहोरात्र दृश्याकडे धावणारे मन, शीण पावून जेथे लक्ष पावते, स्थिर होते ते आत्मस्वरुप म्हणजे मनोमार्गाची गती. संत/श्रीगुरुसंगतीत ही मनोमार्ग गती सुकर होते. "**जेथ संसार चित्र उमटे। तो मनोरूप पटु फाटे।**" सत्संगतीतच हा भाव उदित होतो. नाथमहाराज म्हणतात, "**माझिया भक्तांचे संगती। साधका लाभे माझी भक्ती। अभेद भजने माझी प्राप्ती। जाण निश्चिती उद्धवा॥**"

या अभंगाच्या दुसऱ्या चरणात ज्ञानदेव म्हणताहेत, **"रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा। आत्मा जो शिवाचा रामजप॥"** आपल्या वाणीने (क्रमश: वैखरी, मध्यमा, पश्यंति, परा) **"रामकृष्णहरि"** असा नित्य जप करणं हाच जिवाचा अत्यंत शुभप्रद असा भाव आहे. एका नामाशिवाय आणि नामस्वरुप श्रीगुरुशिवाय अन्य दुसरा भाव म्हणजे भावना जीवाला अतिशय घातक आहे. नाथराय म्हणतात, **"रामकृष्ण वासुदेवा। धरी हाचि दृढ भावा। आणिकाचा हेवा। दुरी करी आदरे॥"**

**"सांडी मांडी परते टाकी। रामकृष्णहरि नाम घोकी। मोक्ष येईल सुखी। नाम स्मरता आदरे॥"** भगवान श्रीकृष्ण तर उद्धवाला सांगताहेत, **"माझे जन्म, नाम, कीर्ती, गुण। जे वाचेसी नाही पठण। ते वाचा पिशाचिका जाण। वृथालापन वटवटी॥ माझे नामाविण जे वदन। ते केवळ मद्यप्याचे भाजन॥"** मुखाने नाम आणि अंत:करणी स्मरण हीच ज्ञानराज सर्वश्रेष्ठ अशी **वेदपाठशाळा** म्हणतात.

नामजप हा शिवाचा प्रत्यक्ष आत्माच आहे. आत्माराम हा सर्वांच्या निरतिशय प्रेमाचा विषय आहे. मनुष्य सर्वांवर जे प्रेम करतो ते आत्मारामाकरिताच करतो. बृहदारण्य उपनिषद् सांगतं, **"आत्मनस्तु कामार्थ सर्वं प्रियं भवति।" द्रव्यापेक्षा पुत्र प्रिय, पुत्रापेक्षा देह प्रिय, देहापेक्षा इंद्रिये प्रिय, इंद्रियांपेक्षा प्राण प्रिय आणि प्राणापेक्षा आत्मा प्रिय आहे.**

श्री शंकरांना हा नामजप आत्मारामाइतका प्रिय आहे. नामाच्या ठिकाणी त्यांचे प्रेम निर्निमित्त आणि अत्यंत निष्काम असे आहे. एक आत्मस्वरूप आणि स्वरूपाकार असलेले श्रीगुरुप्रेमच केवळ निर्निमित्त आणि निष्काम असते. भक्तिप्रेम असंच असतं - निर्हेतुक, निर्निमित्त आणि निष्काम !!! शंकर भगवान सांगताहेत, "भगवंता, आपल्या नामामुळे तृप्त झालेला मी काशीत वास करतो आणि आसन्न-मरण जीवांना नामाचा उपदेश करतो."

हरिपाठाच्या आठव्या अभंगातील तिसऱ्या चरणात ज्ञानराज पुढे

म्हणतात, "**एकतत्त्व-नाम साधिती साधन। द्वैताचे बंधन न बाधिजे॥**" तत्त्व म्हणजे सार, साध्य. नाम हेच परमतत्त्व. "**नामा म्हणे तत्त्व नाम हेचि सार। हेचि धरी साचे, येर वृथा॥**" "**वेदाचे ही बीज हरि हरि अक्षरे। पवित्र सोपारे हेचि एक॥**" श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज पण म्हणतात, "**म्हणौनि त्र्यक्षर हे नाम। नव्हे, जाण केवळ ब्रह्म॥**" नाम हेच एकमेव श्रेष्ठ तत्त्व आहे. "एक-तत्त्व-नाम" म्हणजे अद्वैतनाम. नाम व नामी आणि नामरूपाशी एकरूप झालेले श्रीगुरु-शिष्य यात एवढासुद्धा भेद नाही.

"**तुका म्हणे नाम। चैतन्य निजधाम॥**" जे नामधारक "**नाम**" या एकाच साधनाचे साधन करतात म्हणजेच अखंड नामस्मरण करतात, त्यांना द्वैताच्या-दूजेपणाच्या बंधनाची बाधा होत नाही. तसं पाहिलं तर जवळ जवळ सर्व जगाला या अज्ञानकार्याची, द्वैताची बाधा झालेली आहे. **भयाचे** मूळ या द्वैतातच आहे. सर्व **बंधनांना** कारण द्वैतच आहे. द्वैत हे अज्ञान मूलक आहे. सर्व जीव या द्वैत बंधनात अडकलेले आहेत. ज्ञानराज तर म्हणतात, "हे द्वैतच सर्व प्रकारच्या दैन्याचे कारण एवढंच नाही तर हा वेगळेपणाच दैन्य आहे. या द्वैताची, परकेपणाची निवृत्ती एका नामानेच होते. जो सतत **प्रीतीपूर्वक** नाम घेतो त्याला भगवान् बुद्धियोग देतात की ज्यामुळे भगवंत/ श्रीगुरु आणि आपण समीप, नुसते समीपच नाही तर एकरूप होतो. मग आकार दोन तरी अंत:करण एक आणि त्या अंत:करणात ज्ञान-भाव-भक्तीदीप प्रकाशित होतो, ज्यामुळे भेदभावाचा-परकेपणाचा अंध:कार दूर होतो.

श्रीगुरुंचे/भगवंताचे नाम व रूप दोन्हीही अत्यंत निरुपाधिक आहेत. नामस्मरणाच्याद्वारा त्या श्रीहरीरूपाचे ध्यान होऊन सर्वत्र एकतत्त्वरूप श्रीहरीचाच प्रत्यय येतो. या पुढील चरणात ज्ञानराज म्हणाले, "**नामामृत गोडी वैष्णवा लाधली। योगिया साधली जीवनकळा॥**" हरिनाम हे **द्वैत** पूर्णत्त्वाने निवृत्त करील असे एकमेव दिव्य औषध आहे. इतकेच नाही तर ते अतिशय रसाळ, सुमधुर अमृत-दिव्यअमृत आहे. "**सा अमृतस्वरुपा च**" असं नारद म्हणतात. हे नामामृत सेवन करण्याने जीवनावर काय परिणाम घडतो ??? तर जीवनाची समग्र कळाच बदलून जाते !!! जीवन सगळ्या दैवी गुणांच्या

दिव्य सौरभाने/सुगंधाने दरवळते, ज्ञानतेजाने झळाळते व स्वानंदसुखाने सुखरुप होऊन **आनंदस्वरुपी** डोलू लागते.

आपले श्री तुकाराम महाराज म्हणतात, "**नाम घेता कंठी, शीतल शरीर। इंद्रिया व्यापार नाठविती॥ गोड हे गोमटे, अमृताही वाड। केला काई वाड, माझे चित्ती। प्रेमरसे झाली, पुष्ट अंगकांती। त्रिविध नासती ताप क्षणे॥**" अमृत याचा अर्थ मरणरहित, नाशरहित वस्तू. फक्त भगवंत/श्रीगुरु व त्यांचे नाम हेच अविनाशी आहे. तुकोबा म्हणतात, "**सत्य साच खरे। नाम विठोबाचे बरे॥**" ज्ञानराज म्हणतात, "**अमृत, रसस्वादनी, रस सकळ॥**"

पण नाम हे नुसते अमृत नाही तर **नाम** हे केवळ परमामृत आहे, नाम गोड आहे. गोडी म्हणजे अवीट **प्रेमभाव**. अत्यंत प्रिय वस्तु खरी तर तीच की जिचा कधीच कंटाळा येत नाही. भगवत्प्राप्तीची इतर सर्व साधने भगवत्प्राप्तीनंतर सुटतात, सुटतील पण भगवत्नामस्मरण हेच एकमेव साधन असे आहे की ते मात्र अखंड चालूच राहते. तुकाराममहाराज आपला स्वानुभव सांगतात, "**माझी मज झाली, अनावर वाचा। छंद या नामाचा घेतलासे॥**"

एक अशी शंका घेतली जाते की मग सर्व जीवांची प्रवृत्ती या गोड नामाकडे कां बरे होत नाही ??? तर तुकोबांनी सांगितले, "**रोग्या विषतुल्य लागे हे मिष्टान्न। पक्वान्नाची त्यास काय गोडी ???॥**" बहिर्मुख अशा वासनाधीन जीवांना या नामामृताची गोडी नसते. ज्याला नाम आवडत नाही त्याला सगळ्या संतांनी कपाळ करंटा म्हटलेले आहे.

मात्र भाग्यवान् अशा वैष्णवांना नामामृताची गोडी लाभलेली आहे. मुळची थोडी आवड, प्रेम आणि त्यात श्रीगुरुचा अनुग्रह + श्रीगुरुकृपा मग त्याला नामाची अधिकच गोडी लागते आणि लाभते पण.

नामामृताची गोडी, गुरुसेवेची, गुरुभजनाची, गुरुप्रेमाची गोडी म्हणजे साजुक तुपात तळलेली हलकी-खुसखुशीत, केशरयुक्त अंबट गोड मधुर पाक जिच्यातून ठिबकतो अशी जिलेबीच.

"**महावैष्णवांना**" नामामृताची गोडी लाभते. बहिर्मुख जीवांना या अमृताची गोडी नसते. "**रोग्या विषतुल्य लागे हे मिष्टान्न॥**" तशी अभक्तांना कुठली नामाची गोडी ??? यासाठी एक वैष्णवच पाहिजेत. नामदेवराय म्हणतात, "**नामामृत गोडी आहे वैष्णवांसी। येरा प्राकृतांसी कळेचिना॥ प्राकृत हे जन भुलले विषयी। नामाचिया गावी कैसे जाती॥**" आता वैष्णव कोण ते पाहावयास हवे. नाथमहाराज म्हणतात, "**जाती उत्तम भक्तिहीन। तो वैष्णव नव्हे जाण। अथवा करी दांभिक भजन। वैष्णवपण त्या नाही॥ जाणीव शहाणीव ज्ञातेपण। सांडूनि कुळाचा अभिमान। जो मज होय अनन्य शरण। वैष्णव जाण तो माझा॥**" भगवान श्रीकृष्ण उद्धवाला हे समजून सांगत आहेत. तुकाराम महाराज म्हणतात, "**वैष्णव तो जया। अवघी देवावरी माया॥ नाही आणिक प्रमाण। तन, मन, तृण, जन॥**" एका भगवंताला, श्रीगुरुला आपल्या संपूर्ण भक्तिभावप्रेमाचा विषय करणाऱ्यास, फक्त त्यालाच वैष्णव म्हटले आहे.

या अभंगात श्रीगुरु ज्ञानराज पुढे म्हणतात, "**योगिया साधली जीवनकळा॥**" योग्यांना जशी जीवनकला साधते, तशी वैष्णवांना नामामृताची गोडी लागते. आता योग्यांना जीवनकला कशी साधते ? त्यासाठी ते योगी कसा अभ्यास करतात ? वायु आणि अग्नी यांनी शुद्ध केलेल्या शरीरात, म्हणजेच हृदयात जी अति शुद्ध व तितकीच अतिसूक्ष्म आणि योगी सिद्धांनी ध्यानात धरलेली **जीवनकला**, नादाच्याही पलीकडे असते. या जीवनकलेचे ते सतत ध्यान करत असतात.

नाथरायांनी भागवतात त्याचे सुंदर वर्णन केले आहे, "**ते देही सबाह्य परिपूर्ण। असोनि सूक्ष्मत्वे अलक्ष्य जाण। तीते हृत्पद्मी योगीजन। लक्षिती आसत प्राणायामे॥ ती अण्वी जीवनकळा अव्यक्त। तीते करोनिया व्यक्त। योगी निजभाव युक्त। हृदयी चिंतीत महामूर्ती॥**" या प्रकारे योग्यांना ही जीवनकळा म्हणजेच **सतरावी** कला साधते. पण तरीसुद्धा योग्यांची ही जीवनकळा **वैष्णव भक्तांच्या भक्तीप्रेमगोडीची बरोबरी करू**

**शकत नाही**. कारण योग्यांना जीवनकलेचे सुख फक्त योगदशेपुरतेच मिळते, सतत नाही. पण नामामृताची गोडी लाभलेल्या भक्तांना तेच नाही तर त्याच्यापेक्षा कितीतरी पटींनी श्रेष्ठ असे **भक्तिप्रेमसुख** अखंड लाभते.

सर्व योगीजनांपेक्षा भगवद्‌भक्त अखंड ब्रह्मानंद अनुभवत असतो. भगवानच गीतेत सांगतात पहा, "**योगिनामपि सर्वेषां मद्‌गतेनांतरात्मना। श्रद्धावान भजते यो मां समे युक्ततमो मत:॥**" "**मुक्तीवरील भक्ति जाण। अखंड मुखी नारायण॥**"

या अभंगातील पुढच्या चरणात श्रीगुरु ज्ञानराज माऊलींनी पुराणातील (श्रीमद्‌भागवत महापुराणातील) दोन महावैष्णवांचे दाखले दिले आहेत, "**सत्वर उच्चार प्रल्हादी बिंबला। उद्धवा लाधला कृष्णदाता॥**" सर्व महावैष्णवांत प्रल्हाद तर अग्रगण्यच. वैष्णवांच्या यादीत व्यासांनी प्रथम प्रल्हादाच्या नामाचा उच्चार केला आहे. भक्तिप्रेमाच्या साम्राज्यात बाळ प्रल्हादाची योग्यता असाधारण आहे.

ज्ञानराज म्हणतात, "**भक्तिचेनि अधिलेपणे। दैत्यी देवा आणिले उणे। माझे नृसिंहत्त्व लेणे। जयाचेनि महिमे॥ तो प्रल्हादु गा मजसाठी। घेता बहुते संकटे सदा किरिटी। कां जे मियां द्यावे, ते गोठी। तयाचिया जोडे॥**"

बालवयात प्रल्हादाला शिकवण्यासाठी त्याच्या बापाने षंडामर्क नावाचे शिक्षक नेमले. एकदा पित्याने प्रल्हादाला विचारले, "गुरुजीपासून काय शिकलास ???" बाळ प्रल्हादाने उत्तर दिले, "**श्रवणं, कीर्तनं, विष्णो: स्मरणं, पादसेवनम्। अर्चनं, वंदनं, दास्यं, सख्यं, आत्मनिवेदनम्॥**"

या विविध नऊ लक्षणांनी, छटांनी युक्त अशी भगवंताची नवविधाभक्ती ज्याच्या योगाने अंत:करणात साक्षात् उत्पन्न होते ते अध्ययन/अभ्यास असा माझा निश्चय आहे. पाठशाळेत पण प्रल्हाद अन्य असुरबालकांनाही हाच भागवतधर्माचा उपदेश करीत असे. "**कौमारे आचरेत् प्राज्ञो, धर्मान् भागवतानिह। दुर्लभं मानुषं जन्म तदपि ध्रुवमर्थदम्॥**" केवळ भगवत

नामाविषयी **परिपूर्ण** निष्ठा. मग कितीही आघात आले/झाले तरी या **नामनिष्ठेपासून** न ढळणं हेच रहस्य.

आज दिवाळी पाडवा. ''**संत आले घरा। तोचि दिवाळी दसरा॥**'' किंवा ''**दसरा दिवाळी तोचि आम्हा सण। सखे संतजन भेटतील॥**'' आपल्या हृदयाच्या पणतीत, श्रीगुरुकृपेचे स्नेहभरणे, त्यात भिजलेली आपल्या ''**भाव-भक्ति-प्रेम-श्रद्धा**'' हीच घट्ट वळलेली वात आणि मग गुरुकृपानुग्रहाने उजळलेली, अखंड तेवत असणारी, झळझळीत अशी लख्ख प्रकाशणारी आत्मज्योत. आत्मस्वरुपाचे प्रकाशन करणारी. आत्मविवेकाच्या ज्योती-असंख्य. आत्मज्ञानाचा लखलखीत प्रकाश, स्व-स्वरूपानुभूतीचा रुचकर, मधुर, स्वादिष्ट फराळ आणि आत्मतृप्तीच्या गोड ढेकरा. निजानंदाच्या फुलबाजा, भक्तिभावाची सुंदर फुले उधळणारे आत्मसाक्षात्काराचे भुईनळे, देहभावाच्या कपटे करून टाकणाऱ्या फटाक्यांच्या माळा, स्वानंदाकाशात फुटून आकाश तेजोमय करून टाकणारे बार, कसा **आनंदी-आनंद** !!! मंगल-अभ्यंगस्नानाचा सोहळा, मधुर भक्तीभावाच्या चांदीच्या वाटीत उपासनेचे सुगंधी मसाला तेल, सेवा-प्रेम-भावाचे केशर, कस्तुरी-दवणा, नागरमोथा, गव्हळा, कचरा-जटामासी-चंदनचुरा आदि युक्त उटणे आणि समर्पणभावाचा भरपूर स्निग्धपदार्थांनीयुक्त असा मंद सुवासिक साबण, श्रद्धा-विश्वास यांचे निर्मळ-उष्णोदक अगदी भरपूर अंग पुसायला अतिशुद्ध तलम, मऊसूत असं पुण्याईचं वस्त्र, नेसायला आत्मशांतीची वस्त्रे आणि ल्यायला आत्मसुखाची लेणी-अलंकार, आदरभावाच्या ज्योतींची निरांजने, शुभेच्छा-शुभाशीर्वादाच्या अक्षता, भालप्रदेशी भाव-भक्तिचा कस्तुरी तिलक, बसायला भक्कम आधारभावाचा चंदनी पाट !!! आणखी काय राहिलयं सांगा. अरे ! अत्तर राहिलंच की !!! तत्सुखसुखीत्त्वाचे अत्तर. कसा काय जमला दिवाळीचा थाट ??? सांगा बरं ???

गंमतच झाली बघा, वास्तवात आपला चालू विवरण-लेखन विषय हरिपाठ. आठव्या अभंगातील ''**उद्धवा लाधला कृष्णदाता।**'' ह्याची मीमांसा, वर्णन-व्याख्यान. पण मौज अशी झाली की नेहमीप्रमाणे मायना

लिहिला आणि आत्मदिवाळीचे वर्णन कागदावर कसे उतरले कळलेच नाही बघा. ह्या दिवाळीच्या वर्णनात जरा इकडे-तिकडे झाल्याची शक्यता नाकारता येत नाही पण खरंच सांगतो तुम्हाला (म्हणजे लिहितच आहे) पत्राचा पहिला परिच्छेद कागदावर कसा काय उतरला माझं मलाच कळलं नाही. नवनवोन्मेषशालिनी देवी सरस्वतीचीच कृपा, एवढंच फार तर म्हणू शकतो. आपणा सर्वांना या दिपावलीच्या निमित्ताने अंत:करणपूर्वक अनेकानेक सप्रेम शुभाशर्वाद. आशिर्वादाशिवाय दुसरं काय देणार ना ??? ''आशिर्वाद'' असं म्हणणं हा सुद्धा एक सूक्ष्म अहंकारच !!! कशाचा म्हणाल तर फक्त वाढलेल्या आणि वाढत राहणाऱ्या वयाचा, बाकी काही नाही.

श्रीगुरु ज्ञानराजांनी दुसरा वैष्णव म्हणून उद्धवाचा दाखला दिला आहे. नाथरायांनी लिहिले आहे, ''**निजभृत्य म्हणणे। उद्धवासी या कारणे। निजगुज श्रीकृष्णे। त्यासीच बोलणे सर्वदा॥**'' भगवान श्रीकृष्णांनी निजधामास जाताना आत्मज्ञानाचे-भक्तिप्रेमभावाचे सर्व गुह्य-रहस्य उद्धवाला सांगितले.

या अभंगाच्या शेवटच्या चरणात ज्ञानराज म्हणताहेत, ''**ज्ञानदेव म्हणे नाम हे सुलभ। सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे॥८॥**'' नाम हे कठिण नाही, ते सुलभ आहे. आपले तुकोबाराय पण सांगतात, ''**तुका म्हणे साधन सुलभ गोमटे।**'' नारदांसारखे भक्ताचार्य पण छातीठोकपणे सांगतात, ''**अन्यस्मात् सौलभ्यं भक्तौ।**'' कर्म, ज्ञान, योग इत्यादी सर्व बाकी साधनांपेक्षा ''**नाम**'' अत्यंत सुलभ साधन आहे. ''**तुका म्हणे आहे सोपे सर्वांहुनी**'', असं म्हणतात.

सुलभपणाच्या काही खुणा सांगतो. १) प्रत्येकाला साधन करता येते, कोणालाही नाम घेता येते. २) या साधनाला स्थलकालाची अट नाही. नाम (भगवंताचे) कोठेही व केव्हाही घेता येते. ३) कोणत्याही परिस्थितीत साधन करता आले पाहिजे. परिस्थिती कशीही असली तरी नाम घेता येते. ४) एकदा अनुग्रह झाल्यावर आपले नामस्मरणच आपल्याला मार्गदर्शन करते. श्रीगुरु

तर पाठीशी असतातच. ५) नामाने नकळत, सहज अंतरंगात बदल होतात. ६) संसारात राहून साधन करता येते. संसार सोडावा लागत नाही. ७) नामाने आलेल्या सहज सिद्धीत धोका नाही. ८) कोणत्याही साधनाचा शेवट शरणागती. नामाने ही शरणागती आपोआप साधते. ९) नाम आणि भगवंत एकच. त्यामुळे नामधारक सतत भगवंताजवळ/श्रीगुरुजवळ त्यांच्या सहवासात राहू शकतो आणि शेवटचा भाग, नामाला चिकटून राहण्यास संतकृपेची नितांत गरज, संत-श्रीगुरु ती करतातच.

पण जितकं नाम सुलभ, तितकेच ते दुर्लभ. कारण आरंभशूरच फार. अंत:करणातून उसळणारी, निष्काम-निर्हेतुक भक्ती हवी, चिरस्थायी हवी. नामापाशी, नामांत स्थिर असावे.



# अभंग क्र. ९

**विष्णुवीण जप, व्यर्थ त्याचे ज्ञान। रामकृष्णी मन नाही ज्याचे।।१।।**
**उपजोनी करंटा, नेणे अद्वैत वाटा। रामकृष्णी पैठा कैसा होय ?।।२।।**
**द्वैताची झाडणी, गुरुविण ज्ञान। तया कैचे कीर्तन घडे ? नामी।।३।।**
**ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान। नामपाठ मौन प्रपंचाचे।।४।।**

या अभंगात श्रीगुरु ज्ञानराजांनी नामस्मरणाचे आणखी महात्म्य सांगितले आहे. मागील अभंगात ''नाम जप सुलभ'' असे सांगितल्यामुळे, मग त्याचे फळही सामान्यच असेल, असे कुणाला कदाचित वाटेल !!! म्हणून श्री ज्ञानेश्वर महाराज या अभंगात ''ज्ञानी जरी झाला, तरी पण जर विष्णुजप करीत नसेल किंवा त्याबद्दल सामान्य बुद्धी ठेवत असेल (त्याला नामाचे प्रेम नसेल, श्रद्धा नसेल, भाव नसेल, विश्वास नसेल) तर त्याचे ज्ञान (**पोकळ**) व्यर्थ होय. म्हणजेच अगदीच निष्फळ असते असे म्हणतात.''

महामती व्यास भागवतात म्हणतात, ''**नैष्कर्म्य अपि अच्युतभाव वर्जितम्। न शोभते ज्ञानं, अलं निरंजनम्।।**'' भक्ताचार्य नारद आपल्या भक्तिसूत्रांत म्हणतात, ''**सा कर्म, ज्ञान, योगेभ्याऽपि अधिकतरा फलरूपत्त्वात्।।**'' नाथमहाराज म्हणाले, ''ज्ञाते पंडित आहेत, ज्ञानाच्या अहंकाराने ताठ होऊन उन्मत्तपणे त्यांनी **नामस्मरण**स्वरूप भक्तिपंथाची अवहेलना केली तर वर्णामध्ये अग्रगण्य असले तरी अध:पतनी पडतील.

भले ज्ञानी असतील, नैतकर्म्य म्हणजे कर्मातीत असे शुद्ध ज्ञान जरी असले तरी ते भगवद्भाववर्जित असले तर त्यांना काही शोभा नाही. एक हरीभक्ती हीच ज्ञानोत्पादक, तशीच **ज्ञानसंरक्षक** आहे. कारण ज्ञानदाता एक भगवंत/श्रीगुरुच आहे ना ??? उपासना योग्य दैवत म्हणून सगळ्यांनी एका महाविष्णूंचाच (अगर विष्णुस्वरूप दैवतांचाच) गुणगौरव केला आहे. या

अभंगातील "विष्णु" हे नाम सर्वव्यापी, सर्वज्ञानी, सर्वांतर्यामी, सत्तत्त्व याच अर्थाने आले आहे.

तुकोबारायांनी, "**उजवे वाम भाग। तुका म्हणजे एकचि अंग॥**" अशी हरि-हरांची एकरूपता सांगितली आहे. कधीही गौण देवतांची आराधना करू नये. कारण आपण ज्या विशिष्ट अशा देवाची उपासना करू त्या देवतेच्या स्वरूपाशी भक्त एकरूप होत असतो. श्रीविष्णूचे त्याच प्रकारातील विष्णूस्वरूप देवतांचे उपासक निरंजन परमात्मसत्तेत लीन होतात. तर यक्ष, किन्नर, गंधर्व, भूत, पिशाच्च, वेताळ, ग्रामदैवते, दिशांच्या देवता, रक्षपाल, ग्राम्यदेवता, तमोगुणी, रजोगुणी देवतांचे उपासक/पूजक त्या त्या उपास्य देवतांचे दास होतात.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेत भगवान् सांगतात, "**देवान् देव यजो यान्ति। मद्‌भक्ताः यान्ति मां अपि॥**" हा धोका टाळण्यासाठी "**उपास्य दैवत**" म्हणून भृगूऋषींनी गौरवलेल्या श्रीविष्णु अगर श्रीविष्णुस्वरूपच असणाऱ्या श्रीकृष्ण-विठ्ठल अशा देवतांचीच उपासना, पूजा, सेवा, भक्ती करावी. नाथमहाराज म्हणाले, "**जो मायेचा नियंता। तो विष्णु मोक्षाचा दाता॥**"

वेदांचा, शास्त्रांचा, पुराणांचा अभ्यास करून मिळवलेले ज्ञान हे केवळ शाब्दिक असते, अनुभवजन्य नसते. भक्तीप्रेमावाचून अनुभवजन्य ज्ञान होतच नाही. म्हणून तर ज्ञानराज माऊली या अभंगातील पहिल्या चरणाच्या सुरवातीलाच म्हणाले, "**विष्णुविण जप, व्यर्थ त्याचे ज्ञान।**"

पण वेदान्त सिद्धांत असा आहे की, "**ज्ञान हे स्वतःसिद्ध आहे.**" मग विष्णुजप कशाला ??? तर याचे उत्तर असे की, ज्ञान जरी स्वयंभू असलं तरी ते शुद्ध अशा चित्तातच प्रतीतीला येते. आपल्या श्री तुकाराम महाराजांनी फार छान सांगितलं पहा, "**नाही निर्मळ जीवन। काय करील साबण ?॥ तैसे चित्त शुद्ध नाही। तेथे बोध करील काई ?॥**" आणि चित्तशुद्धी होण्याचा नामस्मरण हाच सुगम मार्ग आहे. चित्ताची मलीनता व चंचलता नष्ट होण्याचा एकमेव उपाय म्हणजे विष्णुजप-नामस्मरण, हाच आहे.

आत्मज्ञान प्राप्तीकरीता मनाच्या शुद्धतेची तशीच स्थिरतेची, एकाग्रतेची फारच आवश्यकता आहे. ज्ञानराज म्हणतात, "**मोक्ष देईल ज्ञान। येथ नाही कीर आन। परि ते थारे, ऐसे मन। शुद्ध होआवे॥**" ज्याचे मन "**रामकृष्णी**" नाही, त्याच्या मनाची अशी शुद्धी होऊ शकत नाही. अशा अवस्थेत आत्मज्ञान उत्पन्नच होत नाही आणि जर यदाकदाचित झाले तरी ते टिकू शकत नाही, फलदायी होत नाही. आत्मज्ञान झाल्याची एक खूण आहे, मोठी ठळक खूण आहे, विषय हे विषयरूपाने भासत नाहीत तर ते विषयही ब्रह्मरूपानेच अनुभवास येतात.

श्री तुकोबाराय सांगतात, "**विषय तो त्यांचा झाला नारायण।**" आणि असं होत नसेल तर खरं आत्मज्ञान झालेलंच नाही असं समजण्यास काही एक हरकत नाही. म्हणून श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज या हरिपाठाच्या नवव्या अभंगात प्रथम चरणात म्हणाले, "**व्यर्थ त्याचे ज्ञान।**" कारण का ? तर "**रामकृष्णी मन नाही ज्याचे।**" उपासना ही मनापासून व्हावयास हवी. त्यात मन नसेल तर तो जप यांत्रिक होतो, नुसती कवायत, निष्प्रेम होतो म्हणून निरर्थक ठरतो. म्हणजेच निष्फळ होतो. ज्ञानराज एका ठिकाणी सांगतात, "**चित्तवृत्ती विन्यासावी। आत्मरुपी.**"

गीतेत भगवानही म्हणाले, "**मय्येव मन आधत्स्व, मयि बुद्धिं निवेशय।**" किंवा "**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते।**" यावरच माऊलीचं भाष्य पहा, फार सुंदर आहे, "**सर्वेन्द्रियासहित। मजमाजी सूनि चित्त। रात्र, दिवस न म्हणत। उपासिती जे॥ परि ठाकिलियाही सागरू। जैसा मागील यावा अनिवारु। तिये गंगेचिया ऐसा पडिभारु। प्रेमभावा॥ कां वर्षाकाळी सरिता। जैसी चढो लागे पांडुसूता। तैसी नित्य नवी भजता। श्रद्धा दिसे॥**"

वरील दाखल्यासारखं "**प्रेम-भक्ति-भाव**" हे चढतं वाढतं असतं. ज्याला रामकृष्णी प्रेमभाव नाही, त्याचं रामकृष्णी मन नाही म्हणून त्याचा जप व्यर्थ आहे व त्याचे ज्ञानही व्यर्थच आहे. आता "**रामकृष्ण**" याच नामाचा

उल्लेख ज्ञानदेवांनी का केला आहे ? कारण एकसहस्त्र नामावर्तनाचे फळ एका **राम**नामाने होते तर तीन सहस्त्र नामावर्तनाचे फळ एका **कृष्ण**नामाने होते.

ब्रह्मवैवर्त पुराणात याला प्रमाण आहे, "**नाम्ना सहस्त्रं दिव्यानां स्मरणे यत् पलं लभेत। तत्फलं लभते नूनं रामोच्चारणमात्रत:।। नाम्ना सहस्त्र दिव्यानां त्रिरावृत्या तु यत् फलम्। एकवृत्त्या तु कृष्णस्य तत् फलं लभते नर:।।**"

या अभंगातील पुढचं चरण असं आहे, "**उपजोनी करंटा, नेणे अद्वैत वाटा। रामकृष्णी पैठा कैसा होय।।**" उपजोनी म्हणजे जन्माला-मनुष्यजन्माला येऊन. मनुष्यजन्म हा भाग्याचा आहे, तसाच तो दुर्लभ आहे. भगवंताच्या कृपेनेच प्राप्त होणार आहे. आता भाग्याचा का ???

श्रीसमर्थ म्हणतात, "**आयुष्याचे नि साधने। सच्चिदानंद पदवी घेणे। ऐसा अधिकार नारायणे। मानवा दिधला।।**" अशा ईश्वरदत्त देणगीचा अनुभव न घेणारा करंटाच नाही तर काय ना ??? करंटा म्हणजे भाग्यहीन, अविवेकी, मतिमंद, आळशी. उपनिषद् ग्रंथात करंटा या शब्दासाठी "कृपण" हा प्रतिशब्द आलेला आहे. "बृहदारण्य" उपनिषदांत "**यो या एतद् अक्षरं गार्ग्य, विदित्वा अस्मात् लोकात् प्रैति स कृपण:**" असा मंत्र आहे.

याचा अर्थ असा आहे, मनुष्य जन्माला येऊन या अक्षर तत्त्वाचे ज्ञान करून न घेताच (अक्षर परमात्म स्वरूपाने अनुभूती न घेताच) जो कोणी हा मृत्यूलोक सोडून जातो तो कृपणच, म्हणजेच करंटा. असा करंटा मनुष्य "रामकृष्णी" पैठा कैसा होय ? तो नामात रत कसा होणार ? कारण कपाळ करंट्या माणसाला सत्य-असत्य, नित्य-अनित्य, आत्म-अनात्म असा विवेक करता येत नाही म्हणून त्याला भगवंताचे ज्ञान आकलन होत नाही. म्हणून अध्यात्मदृष्ट्या तो भाग्यहीनच नाही का ??? ज्याच्या विचारांना अद्वैत भूमिका लाभलेली नाही तो सुद्धा असाच कृपण/करंटा. अशा माणसाने जरी

उपासना केली तरी अद्वैत भूमिका नसल्याने भक्त-भगवंत, श्रीगुरु-सत्शिष्य, नाम-नामी यांचे ऐक्य जाणत नाही. या द्वैतरहित एकरसतेला, एकरूपतेला तो सदैव पारखाच राहतो म्हणून करंटा.

ज्याचे मन निष्काम भक्तीत लागत नाही, ज्याला अद्वैताची बैठक नाही अशा भेदबुद्धींनी, भेदभावानी प्रदर्शनीय उपासना-नाट्य करणाऱ्याला सगुण साक्षात्काराचा लाभ कुठला व्हायला ? तो होणंसुद्धा कठीणच ना !!! मग असा व्यापारी वृत्तीचा उपासक (भगवंताला ओरबाडणारा) ''रामकृष्णी पैठा'' कसा होणार ना ??? ''रामकृष्णी पैठा'' होणे म्हणजेच सगुण साक्षात्कार. असा सगुण साक्षात्कार या कपाळ करंट्याला मुळीच शक्य नाही. जर सगुण साक्षात्कारच नाही तर मग श्रीहरीशी तत्त्वत: सायुज्यता पावणे हे तर केवळ अशक्यच ना !!! महद्‌भाग्याने दुर्लभ असणारा असा हा मानवजन्म. त्याचं सार्थक एका ''हरिप्राप्ती'' होणे यातच आहे.

भगवत्पूज्यपाद श्रीमद् आद्य शंकराचार्य आपल्या (विवेकचूडामणि) या ग्रंथात म्हणतात, ''**लब्ध्वो कथंचिद् नरजन्म दुर्लभम्। यो स्वात्ममुक्तो न यतेत मूढधी:।।**'' आत्मसाक्षात्कारासाठी जो प्रयत्न करीत नाही तो मूढधी (म्हणजे समर्थांच्या भाषेत महामूर्ख आहे.) ''पैठा'' म्हणजे प्रतिष्ठा (लौकिक नव्हे तर आत्मप्रतिष्ठा म्हणजेच आत्मभावावर स्थानापन्न होणं) एकात्मता-समरसता, श्रीगुरु-श्रीभगवंताशी, अद्वैत वाटेने ही भक्तिप्रेमाची वाटचाल केल्याशिवाय ही एकरूपता, समरसता कशी साधणार ???

द्वैतात अडकलेल्या-सापडलेल्या जीवाला श्रीगुरु ज्ञानराज करंटा म्हणतात. जन्माला येऊन या अद्वैतानंदाची ओळख करून घेण्यात, हा अद्वैतानंद अनुभवण्यातच या नरदेहाची खरी-खरी सार्थकता आहे. हेच सर्व परमार्थाचे वर्म आहे. सर्व संत महात्म्यांनी हाच मार्ग चोखाळला आहे. श्री तुकाराम महाराज म्हणतात, ''**वर्म ते एक आहे, दृढ धरावा भावो। जाणीव नागवण लागो नेदी ते ठाव। म्हणोनि संग टाकी, सेवी अद्वैतभावो। तुका म्हणे हाचि संती, मागे केला उपावो।।**'' संत आणिक सांगतात,

**"मन हे मोगरा, अर्पूनि गुरुवरा। पुनरपि संसारा येणे नाही॥"** हे समरसत्व कसं साधायचं ???

तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **"मग म्हणे एक सच्चिदानंद। मीचि एक स्वत: सिद्ध। आपणेनसी भेद। नेणोनि जाणे॥"** हेही म्हणणे थोडेच किंबहुना द्वैत उरलेचा नाही. मग त्या अद्वैत-अभेद-एकरूप-समरसतेत भक्ती उल्हासित होते. महाराज विचारतात तद्रूप न होता भगवद्/श्रीगुरु भक्तीचा लाभ कसा होणार ??? मग या अद्वैत वाटा जाणत नाही तो करंटा. त्याला सगुण-साकार श्रीहरीच्या ठायी कसा प्रेमभाव-एकविधभाव होणार ???

या अभंगाच्या पुढल्या चरणात आपले श्री ज्ञानराज विचारतात, **"द्वैताची झाडणी, गुरुविण ज्ञान। तया कैचे कीर्तन घडेल नामी॥"** आता आधी द्वैत व अद्वैत म्हणजे नेमकं काय ते पहावयास पाहिजे. श्रीमद् आद्य शंकराचार्य म्हणतात, **"प्रत्यक्षात अनवगतं, श्रुत्या प्रतिपारनीयम् अद्वैतम्। द्वैतं न प्रतिपाद्यं, तस्य स्वतएव सिद्धत्त्वात॥"** म्हणजे अद्वैत हे प्रत्यक्षादी कोणत्याही प्रमाणांनी प्रतीत होणारे नसून केवळ उपनिषद् ग्रंथ अनुभवानीच सिद्ध सांगतात. पण द्वैत मात्र प्रत्यक्षादी प्रमाणांनीच प्रतीत होणारे आहे. त्याचे प्रतिपादन करावे लागत नाही आणि केलेही जात नाही.

अद्वैत हे सहजसिद्ध आहे. द्वैत मात्र प्रतीतीला येते. (उदा. डोळे २, कान २, पाय २, टाळ २, टिपऱ्या २) पण दृश्य एक, श्रुती १, चाळणे १, नाद १. मग ही प्रत्यक्षात दिसणारी पण खरोखर नसणारी भेदभावाची प्रतीतीच झाडून टाकली पाहिजे. **"द्वैताची झाडणी"** करावयास पाहिजे. झाडणी करणे म्हणजे बाधित करणे. केवळ अज्ञानानेच ही द्वैतप्रतीती येते. ते अज्ञान नष्ट करणे हे आपले पहिले कर्तव्य आहे. अज्ञानाने निर्माण-अनुभवास येणाऱ्या अर्थार्थाची निवृत्ती ज्ञानाशिवाय अन्य कशानेच कशी होणार ??? ही निवृत्ती ज्ञानानेच होणार ना !!! आणि हे यथार्थ ज्ञान एका श्रीसद्गुरुशिवाय प्राप्त होणार नाही.

गीता सांगते, **"ते ज्ञान पै गा बरवे। जरी मनी आथी जाणावे। तरी**

**संता या भजावे। सर्वस्वेसी॥"** नाथमहाराज तर म्हणतात, "**सद्गुरुवाचोनि नाम नये हाता। साधन साधिता कोटिगुणे॥"** मग द्वैताची झाडणी गुरुशिवाय कशी होणार ? कोण करणार ???

श्रीगुरु कोण ??? "**जो काया, वाचा, मने। अतिकृपाळू दीनाकरणे। तोडी शिष्याची भवबंधने। उठवी ठाणे अहंकाराचे॥ सद्गुरुतोचि जाण। जो अपरोक्ष सांगे ज्ञान। देहत्रय निरसून। परमपदी ठेवी॥"** गुरुकृपेने स्वरूपज्ञान प्राप्त होऊन द्वैताची झाडणी होते. द्वैत बाधित होते. जर द्वैत सत्यत्त्वाने राहिलं, ऐक्य-एकरूपता साधली नाही तर बहिर्मुख शिष्याची प्रवृत्ती भगवत्प्राप्तीकडे आणि तत्प्राप्त्यर्थ जे नामस्मरण साधन त्याकडे कशी होणार ??? म्हणून ज्ञानराज म्हणताहेत, "**तया कैचे कीर्तन घडेल नामी ???॥"**

हरिपाठातील या नवव्या अभंगात शेवटच्या चरणात श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान। नामपाठ मौन प्रपंचाचे॥"** श्री हरिगुरुकृपेने द्वैताची समूळ झाडणी होऊन आत्मज्ञान प्राप्त झाले म्हणजे तो साधक भक्त-शिष्य भगवद्ध्यानाकडे प्रवृत्त होतो. नामस्मरण/नामजप करताना आपल्या प्रिय उपास्य दैवताची चिन्मय-चालती-बोलती-हसती सच्चिदानंद छबी आपल्या मन:चक्षूंपुढे तरळली पाहिजे. नामस्मरण होत असतानाही "हे" चिन्मय स्वरुप-गोड रूप अधिकाधिक तेजस्वी बोलकं होत आहे व आपण त्या तेज:पूंज, प्रकाशमान, आनंदघन, चालत्या-बोलत्या रूपाच्या समीप जात आहोत, त्याच्यातलं व अपल्यातलं अंतर कमी-कमी होता-होता आपण त्या स्वरूपाशी "**काया-वाचा-मने**" एकरूप झालो आहोत अशी दृढ भावना अनुभवता आली पाहिजे यालाच ध्यान-सगुण ध्यान म्हणतात.

अशा गाढ एकरूपतेच्या भावनेतूनच सगुण साक्षात्काराचा प्रत्यय येईल आणि येतो !!! श्रीनाथराय म्हणतात, "**दीपकळिका हाती चढे। तरी घरभरी प्रकाश सापडे। माझी मूर्ती जैं ध्यानी जडे। तै आनंद-चैतन्य आतुडे हृदयांतरी॥"** ध्यानाचे अनेक प्रकार आहेत १) प्रतीक ध्यान म्हणजे

अन्य वस्तूचे अन्य रूपाने ध्यान. उदा. शाळिग्राम शिळेचे विष्णुरूपाने ध्यान, बाणाचे शिवरूपाने ध्यान. २) ध्येयानुसार ध्यान म्हणजे शंक, चक्र, गदा, पद्मधारी चतुर्भुज मूर्तीचे जे ध्यान ते ध्येयानुसार ध्यान.

ध्यान केव्हांही विधी, विश्वास व इच्छा यावाचून होत नाही. विधी म्हणजे ''ध्यान करावे'' असे प्रेरक शास्त्रवचन, विश्वास म्हणजे श्रीगुरु/शास्त्र वचनावर असणारी गाढ-प्रगाढ श्रद्धा, इच्छा म्हणजे अंत:करणाची तत्संबंधातील वृत्ती. अशा सर्व त्रयींच्या योगांने चित्ताची झालेली निरंतर ध्येयाकारता म्हणजे ध्यान. ''**तत्र प्रत्यैकता ध्यानम्।**'' असं पतंजल महामुनी योगसूत्रात सांगतात. प्रत्ययाची एकतानता म्हणजे ध्यान. ''**ध्येयसवतं मनो यस्य, ध्येयमेव अनुपश्यति। नान्यपदार्थं जानाति ध्यानमेतत् प्रकीर्तितम्॥**'' ज्याचे मन ध्येयाच्या ठिकाणीच आसक्त असते, जो ध्येयासच पाहतो, अन्य पदार्थांना जाणत नाही व अखेर ध्येयरूपच बनतो अशा अवस्थेला **ध्यान** म्हणतात. एक ''**श्रीगुरु-श्रीहरि**'' हेच ध्येय. मग ध्याना स्मरणाने-एकरुपतेने-ध्यानाने ध्येयस्वरूप होतो.

श्री ज्ञानराज म्हणतात, ''**भ्रमरीच्या ध्यासे भ्रमरीच होय। कीटकत्व जाय पालटोनि॥ ब्रह्मध्यासे स्वये ब्रह्मचि होइजे। जीवत्व लोपिजे सहजचि॥**''

आता ध्यानाचा तिसरा प्रकार म्हणजे अहंग्रह ध्यान. ''**अहं ब्रह्म अस्मि**'' या ध्यानात ध्येयानुसार फक्त ध्येयाकारवृत्ती असते, पण ब्रह्मध्यानांत परब्रह्माचे आत्मारामाशी अभेद चिंतन करून ध्यान असते. (जसे शिष्याने श्रीगुरुशी अभेदाने-एकरूपतेने असावयास पाहिजे/असते) म्हणून याला अहंग्रह ध्यान म्हणतात.

श्रीगुरु भगवंताचा आपल्याशी अभेद करून एकरूप होऊन चिंतन करणे म्हणजेच **अभेदध्यान**. अद्वैत-एकरूपता अशा निरंतर ध्यानाने आत्मज्ञान होते. चित्तस्थिरतेचा ध्यान हा एकमेव उपाय आहे की ज्या ध्यानात **नामस्मरण** आहेच. कित्येक ग्रंथांत प्रणव-ध्यान, ॐकार ध्यानही सांगितले आहे.

नामस्मरणासहित होणारे सगुण ध्यान (सुरवातीस त्याचे विवरण आलेलेच आहे). हे सर्वात अधिक उपयुक्त, सुलभ आणि श्रेष्ठ ध्यान आहे. श्री तुकोबाराय म्हणून प्रार्थना करतात, "**राहो आता हेचि ध्यान**" कशाचे तर "**सुंदर ते ध्यान, उभे विटेवरी। कर कटावरी ठेवोनिया॥**" अशा राजस सुकुमार पांडुरंगाचे.

अशा लावण्यसंपन्न, कांतीमान् सगुण-साकार-चालत्या-बोलत्या पांडूरंगाचे ध्यानाने लोचने रूपी जडतात आणि मन-बुद्धि-चित्त अहंकार श्रीगुरु-श्रीहरि चरणी स्थिर होतात.

नामस्मरणात ध्यानाला खूपच महत्त्व आहे बरं कां. भक्तिशास्त्रकारांनी चतुर्विध प्रकारचे भगवत्ध्यान सांगितले आहे १) रूपध्यान, २) गुणध्यान, ३) क्रीडाध्यान आणि ४) सेवाध्यान. "**ध्यानं रूपगुणसेवादे: सृष्ट चिंतनम्**" असं "**भक्तिरसामृतसिंधु**" या भक्तिशास्त्रातील रहस्य स्पष्ट करून सांगणाऱ्या ग्रंथात म्हटले आहे. पद्मपुराणात ध्यानमाहात्म्य सांगताना महामती व्यास म्हणतात, "**यथा काष्ठे स्थितो वन्हि: मथनात् एव दृश्यते। एवं सर्वगतो विष्णु: ध्यानात् एव प्रदृश्यते॥**"

काष्ठात व्यापून असणारा अग्नी जसा एकामेकावर घासूनच प्रगट होतो तसा सर्वगत असा परमात्मा ध्यानाने प्रतीतीस येतो. "योगवासिष्ठात" तर ध्यान हेच खरे ईश्वराचे पूजन आहे असे म्हटले आहे. कुलगुरु श्री वसिष्ठ प्रभू श्रीरामाला सांगताहेत राम, "**पूजनं ध्यानमेव अन्तर न अन्यद् तस्य पूजनं। तस्मात् त्रिभुवनाधार नित्यं ध्यानेन पूजयेत॥**" ध्यानातच पूजनाचा अंतर्भाव आहे. भगवंताच्या ध्यानाशिवाय (विशेषत: सगुण-साकार सुंदर रूप ध्यानाशिवाय) अन्य पूजन काही खरे नव्हे. त्रिभुवनाधार भगवंताची पूजा नित्य ध्यानानेच करावी. आपले श्री तुकोबाराय काय म्हणतात ? म्हणतात, "**करावी ते पूजा मनेचि उत्तम।**"

नाथमहाराजही म्हणतात, "**मजवेगळे जे जे ध्यान। तेचि जीवासी दृढ बंधन। या लागी सांडोनि प्रपंचाचे ध्यान। माझे चिंतन करावे॥**

**काया, वाचा आणि मन। पुरुष (म्हणजे स्त्रियांनीसुद्धा) एकाग्र करोन। जे जे वस्तूचे करी ध्यान। तद्रूप जाण तो तो (ती ती ) होय॥''**

ध्यानाने तन्मयता कशी प्राप्त होते याबद्दल एकनाथ महाराजांनी प्रत्यक्ष शिव-विष्णुंचा सुंदर दाखला दिला आहे, ''**शिव श्याम तमोगुणी। तो शुद्धा विष्णूच्या ध्यानी।**'' आणि ''**विष्णु श्याम शिवचिंतनी। विनटले गुणी येरयेरा॥**''

अशा या ध्यानाने, मग ते वर सांगितलेल्या प्रकारापैकी कोणतेही ध्यान असो व नामपाठाने (नामस्मरणाने) प्रपंचाचे मौन होते म्हणजेच संसार निवृत्ती होते. अशाप्रकारे नामस्मरणाने आणि ध्यानाने प्रपंचाचा उपशम, शांती कशी होते ते पहावयास हवे. नामसाधनेने एकदा का भगवंताचे ध्यान दृढ झाले की अंत:करण तद्रूप होते व प्रपंचाचा विसर पडतो.

अध्यात्मशास्त्रकार असं म्हणतात की हा सगळा प्रपंच मनोमात्र आहे. नाथराय म्हणतात, ''**देहादि अहंकारपर्यंत। पिंडब्रह्मांड जे भासत। ते मनोमात्र विळसत। मिथ्याभूत संसार॥**''

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज पण ज्ञानेश्वरीच्या पाचव्या अध्यायात म्हणतात, ''**जेथ हे संसार चित्र उमटे। तो मनोरूप पटु फाटे। जैसे सरोवर आटे। मग प्रतिमा नाही॥**''

अशाप्रकारे संसार मनोमूल आहे, मनकल्पित आहे. नामाने व ध्यानाने मनाचा मनपणाच नाहीसा होतो. ते तन्मय होते. तुकाराम महाराज सांगतात, ''**मन हे राम झाले। राम म्हणता रामचि होईजे।**'' श्री ज्ञानदेव पण सांगतात, ''**कां जे यया मनाचे एक निके। जे दिखिलिया गोडीचिया ठाया सोके। म्हणौनि अनुभवसुखचि कौतुके। दावित जाईजे॥**''

नामदेवरायही म्हणतात, ''**नामा म्हणजे केशवासी ध्यासी। केशवचि होसी अरे जना॥**'' असे हे नाम-ध्यान माहात्म्य आहे. ज्ञानराज आपला स्वत:चा अनुभव एका अभंगात सांगतात, ''**ज्ञानदेवा चित्त कृष्ण ध्यानी रत। जन्म, जरा, मृत्यू हारपली॥**'' आता कोणी म्हणेल की एकांतात,

आसनादी विधीने युक्त होऊन ध्यान करणे फार कठीण !!! पण नाथरायांनी उत्तर दिले, ‘‘**माझे करिता नामसंकीर्तन। विघ्न निर्दळण हरिनामे॥ जेथ नामाचा घडघडाट। तेथ उपसर्गा न चले वाट। महाविघ्नांचा कडकडाट। करी सपाट हरिनामे॥**’’ सगुण ध्यान व नामपाठ यांच्या योगाने संसाराची शांती होते. कर्मासह केलेल्या नामस्मरणाने त्या कर्माचे फल मिळते, तर भगवद्ध्यानासह (सगुण) केलेल्या **नामस्मरणाने** भगवदाकारता प्राप्त होते. ‘‘**नाम पाठ मौन प्रपंचाचे**’’.



# अभंग क्र. १०

**त्रिवेणी संगमी नाना तीर्थे भ्रमी। चित्त नाही नामी, तरी ते व्यर्थ॥१॥**

**नामासी विन्मुख तो नर पापिया। हरिवीण धावया न पवे कोणी॥२॥**

**पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मिक। नामे तिन्ही लोक उद्धरती॥३॥**

**ज्ञानदेव म्हणजे नाम जपा हरीचे। परंपरा त्याचे कुळ शुद्ध॥४॥**

शास्त्रात पुण्यप्राप्तीची जी अनेकानेक साधने सांगितली आहेत, त्यात तीर्थयात्रांचा अंतर्भाव अगत्याने केलेला आहे. या सर्व तीर्थात प्रयाग तीर्थाचे महत्त्व विशेष आहे. गंगा, यमुना आणि सरस्वती या तीन तीर्थस्थानी असणाऱ्या नद्यांचा संगम प्रयागक्षेत्री आहे. म्हणून सर्व तीर्थात हे तीर्थ श्रेष्ठ समजले जाते. यात स्नान केल्याने लोक स्वर्गाला जातात अशी या क्षेत्राची-तीर्थक्षेत्राची महती पुराणात वर्णिली आहे.

आदिपुराणात या गंगा-यमुनांचे माहात्म्य पुढीलप्रमाणे वर्णिले आहे - **"श्रीगंगा द्रवरूपेण, त्रैलोक्यं व्याप्त तिष्ठति। न गंगासदृशं तीर्थं स्वयमेवद्रुतो हरिः॥ कृष्णवामांगसंभूता यमुना कृष्णरूपिणी। न जलं यमुनावाटि, साक्षाद् ब्रह्मैव तज्जलं॥"**

गंगा ही द्रवरूपाने त्रैलोक्यात व्यापून राहिली आहे. गंगेसारखे अन्य तीर्थ नाही. कारण तिच्या रूपाने प्रत्यक्ष श्रीहरीच द्रवरूपतेला प्राप्त झाला आहे. तसेच श्रीकृष्णाच्या डाव्या अंगापासून झालेली यमुना ही कृष्णरूपिणीच आहे म्हणून यमुनाजलास सामान्य पाणी म्हणून पाहू नये, तर ते पाणी केवळ ब्रह्मरूपच आहे. श्री नाथराय म्हणतात, **"तुझिया चरणीची गंगा। सकळ पातके ने भंगा।"**

**"ते पायवणी श्रीरंगा। पवित्र जगाते करी॥"** पण ही सगळे तीर्थे श्रद्धावानालाच पावन करू शकतात. नाही कां ?

एकदा काशीक्षेत्री गंगाघाटावरून येणाऱ्या मार्गावर श्रीशिव कुष्ठरोग्याच्या रूपात बसले होते. माता पार्वती येणाऱ्या जाणाऱ्यांना विनवीत होत्या, जो कोणी अजिबात पापी नसेल त्यांनी माझ्या या पतीराजांना स्पर्श केला तर त्यांचं कुष्ठ जाईल. कोणी आहे का ? असा पुण्यात्मा !!! पार्वतीमातेचे ते बोलणे-विनंती ऐकून एक खेडूत त्यांच्याजवळ आला आणि म्हणू लागला, ''मी एवढ्यात आलोच.'' आणि तो गंगास्नानाला गेला. स्नान करून आला आणि म्हणाला, ''आता मी गंगास्नानी पावन झालोय. मी आपल्या पतींना स्पर्श करतो. त्यांचा रोग बरा होईल. कारण माझी सर्व पापे गंगास्नानाने गेली आहेत. त्याची श्रद्धा पाहून शिवपार्वती आपल्या मूळ स्वरूपांत प्रकट झाले. पुराणात कथा आहे. तात्पर्य काय तर **श्रद्धा**.

गंगा-यमुना या नद्यांना जे पावनत्व आले आहे ते भगवंताच्या सान्निध्यामुळेच, नाहीतर संतांच्या सेवेने-सहवासाने !!! गंगा ही भगवंताच्या त्याच्या विग्रहाच्या अंगुष्ठापासून निर्माण झाली आहे. जेव्हा वामनावतारामध्ये बळीकडून तीन पावले भूमी दान म्हणून मोजून घेत असताना महाविष्णूंनी आपले तिसरे पाऊल उचलले आणि त्यातील पाणी सहजरित्याच भगवंताच्या चरणावरून गेले, ते पदतीर्थ श्रीशिवांनी मस्तकी धारण केले. ''**पायवणी माथा वाहिली**'' असं ज्ञानराजांनी या प्रसंगाचे वर्णन केले आहे.

नामधारक अशा संतांनी स्नान केले असता त्यांच्या स्पर्शाने, संगतीने तू पापरहित होशील असा वर-आश्वासन भगीरथाने भागीरथीस दिले आहे. गंगेचं पाप कोणतं ? तर श्रीशिवांनी आपल्याला मस्तकी घेतलं याचा तिला झालेला अभिमान !!! ''**अभिमान शत्रू मोठा**''. ''**अभिमानाचे तोंड काळे। दावी बळें अंधार॥**''

संतमहात्मे-नामधारक संत तीर्थयात्रा करण्याच्या निमित्ताने या गंगेयमुनेसारख्या तीर्थांनाच पवित्र करतात. भागवतकार म्हणतात, ''**प्रायेण तीर्थाभिगमापदेशैः स्वयंहि तीर्थानि पुनन्ति सन्तः॥**'' अशा संतांना नामस्मरणाशिवाय अन्य साधनांची काय गरज ???

तेच संत की, एका भगवत्नामाखेरीज अन्य काही जाणत नाहीत. निळोबाराय म्हणतात, ''**नेणती काही टाणाटोणा। नामस्मरणावाचूनि॥**'' तुकाराम महाराज म्हणतात, ''**हेचि माझे तीर्थ, हेचि माझे व्रत। सत्य हे सुकृत नाम तुझे॥**'' अशी विशेषनामनिष्ठा संतांठायी असते. पण जे सामान्य नामनिष्ठ असतात ते नामाबरोबरच इतरही तीर्थादी साधनांवर विश्वास ठेवतात. त्यांच्याकरिता ती साधने काही अंशी ठीक आहेत ना !

तीर्थयात्रेतून भक्तिभावना दृढ करण्याचे, प्रवाही करण्याचे व स्वभावदोष थोडेसे तरी घालवण्याचे अमोघ साधन आहे. यात्रेमध्ये यात्रिकाने सर्व भार ईश्वरावरच सोपवलेला असतो. भगवंताचे नाम घेत उन-थंडी-वारा-पाऊस सहन करीत आत्मविश्वासाने, श्रद्धेने, मोठ्या मनोधैर्याने तो वाटचाल करीत असतो. तीर्थयात्रेत त्याला कदाचित साधुसंतांच्या भेटीचाही योग येतो, नाही असे नाही. म्हणजे या सगळ्याचा अर्थ काय ? तर पुण्य संपादन करण्याचा तीर्थयात्रा हा एक मार्ग आहे.

पण ज्याची मुळातच देवावर श्रद्धा नाही, थोडा विरंगुळा म्हणून, घरकामातून अगर नोकरी-धंद्यातून काही दिवस सुटका म्हणून सहलीला गेल्याप्रमाणे एल.टी.सी.सारखी सुविधा मिळते म्हणून यात्राकंपनीतून हिंडण्यासाठी जे बाहेर पडतात, त्यांची ती काही यात्रा नव्हे तर भ्रमण असते, भटकणे असते. ज्ञानराज अशांना या अभंगात ''**नाना तीर्थे भ्रमी।**'' असे म्हणतात. का ? कारण ''**चित्त नाही नामी**'' म्हणून ''ते व्यर्थ'' !!! भ्रमणच असल्याने पापक्षालन करण्याची, पुण्य गाठीस जोडण्याची व अखंडपणे हरिस्मरणात राहण्याची अमूल्य संधी त्यांनी अगदी व्यर्थ दवडलेली असते. कुठे, काय नवीन मिळते, पाहायला-खायला, बघायला इकडेच त्यांची दृष्टी. भगवंताचा आठव ज्या तीर्थयात्रेत होत नाही - फारसा होत नाही, नाही-नाही होतच नाही ती यात्रा नव्हे. ते निव्वळ भटकणे, असे भटकणे व्यर्थ.

तीर्थादिकांच्या ठिकाणी मनात श्रद्धा असेल तरच पापक्षालन होते पण मनात श्रद्धा नसताना केलेले हरिस्मरण पापक्षालन करते व नामस्मरणाचा

अभ्यास वाढविल्याने, पापच काय पण पापवासनाच नाहीशा होतात. नामस्मरणासह तीर्थाटन केले तरच ते तीर्थाटन चित्तशोधक होते. सर्व पापांमध्ये भगवन्‌विन्मुखता-स्मरणरहित-नामस्मरणविरहीत जीवन यासारखे दुसरे मोठे पाप नाही. भगवद्‌स्मरणारहित कितीही तीर्थाटने केली तरी चित्तशुद्धी होऊन भगवंताची प्राप्ती होणे अगदी सुतरामही शक्य नाही. तीर्थांचा उपयोग श्रद्धावानालाच तर नामस्मरण अश्रद्ध जीवाचे पण अत्यंतिक कल्याण करते.

ज्ञानराज माऊली या अभंगाच्या पुढल्या चरणात म्हणतात, "**नामासी विन्मुख तो नर पापिया। हरिवीण धावया न पवे कोणी॥**" नामस्मरणाच्या बाबतीत विन्मुख असणारा कोणीही असला तरी तो पापीच होय. ज्ञानराज म्हणतात, "**माते जेणे पाविजे। ते शुद्ध पुण्य॥**" या भगवद्‌वचनानुसार भगवत् प्राप्ती हे साध्यरूप पुण्य व तत्प्राप्तीचे नियतपूर्व साधन "**नामस्मरण**"पूर्वक भक्ती हे साधनरूप पुण्य. याचाच सरळ-सरळ अर्थ असा की नामस्मरण हेच महतपुण्य आणि नामस्मरण विन्मुखता हेच मोठ्यात मोठे पाप. निळोबाराय म्हणतात, "**निळा म्हणे पाप तेचि साचे। नावडे देवाचे नाम मुखी॥**" नामविन्मुखता हे अत्यंत घोर पातक आहे की ज्याला प्रायश्चित्त नाही.

या अशा घोर पापातून मुक्त होण्याचे साधन एकच, पश्चात्तापयुक्त अंत:करणाने, श्रीहरीचा धावा करणे, त्याला शरण जाऊन त्याचेच नाम घेणे. "**हरिवीण धावया न पवे कोणी॥**" कारण "**तुका म्हणे त्यासी नामाचा अभिमान। म्हणोनिया जन तारी बळें॥**" गीतेत भगवान आपलं ब्रीद सांगताहेत, "**न मे भक्त: प्रणश्यति।**" भक्तासाठी भगवंत धावून येतो. "**नामासाठी देव घालीतसे उडी।**" पण त्यासाठी **धावा** कसा करावयाचा हे भक्ताला माहीत पाहिजे.

धावा करणाऱ्याच्या मनात तीव्र पश्चात्ताप, निरभिमानता, आपली जीवनधारा भगवंतापुढे प्रकट करण्याचे मनोधैर्य, "**भगवंतच मला**

**सोडवेल**'' असा विश्वास, शरणागती इत्यादी भावनांची नितांत आवश्यकता हवी. असा अनुताप नसेल तर **खरी** तळमळ राहणार नाही, **खरा धावा** होणार नाही आणि मग भगवंत तरी कसा धावत येईल सांगा बरे !!!

भगवंतानी अर्जुनाला जे आश्वासन दिले, ''**तेषामहं समुद्धर्ता**''. या ब्रीदवाक्याप्रमाणे भगवान धावा करणाऱ्या आपल्या अनन्य भक्तांचे रक्षण करतातच. ज्ञानेश्वर महाराजांनी या भगवद्वचनावर मोठं सुंदर भाष्य केले आहे, ''**म्हणोनि गा पांडवा। मूर्तीचा मेळावा। करूनी त्यांचिया गावा। धावतु आलो॥**'' श्री तुकोबाराय पण म्हणतात, ''**न सहावे दु:ख भक्तांचे या देवा। अवतार घ्यावा लागे रूप॥**'' श्रीकृष्ण भगवान पण अगदी असंच म्हणतात पहा, ''**ते वेळी आपुलियाचेनि कैवारे। मी साकार होऊन अवतरे।**''

सर्व भक्त/संत एका श्रीहरीचाच धावा करतात. श्री तुकाराम महाराज काय सांगतात बघा, ''**माता पिता बंधु बहिणी। कोणी न पवती निर्वाणी॥ तुजवीण कोणा। शरण जाऊ नारायणा॥ ऐसा न देखे मी कोणी। दुजा तिही त्रिभुवनी॥**'' म्हणून काय तर आपले श्रीगुरु ज्ञानराज पण निर्वाळा देऊन सांगतात की, ''**हरिवीण धावया न पवे कोणी।**'' या अभंगातील पुढील चरण आहे, ''**पुराण प्रसिद्ध बोलिले वाल्मीक। नामे तिन्ही लोक उद्धरती॥**''

नामस्मरणाच्या प्रामाण्याबद्दल श्री ज्ञानेश्वर महाराजांनी वाल्मीकी ऋषींचा योग्य समर्पक असा दाखला दिला आहे. नामस्मरणाच्याबाबतीत त्यांचा अधिकार अनन्यसाधारण असा आहे. नामाखेरीज अन्य साधनांचा अधिकार मनुष्यमात्रातील सगळ्यांनाच नाही तर पात्रतेनुसार त्या त्या पात्र असणाऱ्यांनाच आहे. उदा. गायत्री. ''**अधिकार तैसा दावियेला मार्ग॥**'' सगळ्यांना सगळ्या साधनांचा नाही, एकाला सगळ्या साधनांचा नाही, सगळ्यांना एकाच साधनाचा अधिकार आहे असे साधन म्हणजे फक्त ''**नामसाधन**''. ''**सकळासि येथें आहे अधिकार। कलीयुगी उद्धार**

**हरीच्यानामे॥ यारे यारे लहान थोर। याती भलते नारी नर। करावा विचार। न लगे चिंता कोणासि॥''**

वाल्मीकी ऋषींचा दाखला देण्यात फार मोठा, दांडगा नाममहात्म्याचा भाग आहे. एकेकाळचा केवळ पातकांची राशी असणारा वाल्या. नारदांनी नाम दिले खरे पण प्रामाणिकपणे वाल्याने सांगितले, ''मला राम म्हणणं जमणार नाही. **धरा-मारा** हेच माझ्या इंद्रियांना वळण आहे.'' नारदांनी सांगितलं, काही हरकत नाही ''मरा-मरा'' म्हण आणि तोपण असंच म्हणत राहिला. परिणाम काय झाला !!! वाल्याचा वाल्मीकी झाला. ''**केले रामायण रामा आधी।**'' असा अधिकार-योग्यता प्राप्त झाली. त्यांनी रामचरित्र घडण्याच्या आधी रचले आणि त्याला अनुसरून रामरायांना चरित्र करावे लागले. कशामुळे झालं हे तर ''**उफराट्या नामासाठी**''. काय नामस्मरणाचे माहात्म्य ना ???

या अभंगाच्या शेवटच्या चरणात ज्ञानराज म्हणाले, ''**ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचे। परंपरा त्याचे कुळ शुद्ध॥**'' एका नामस्मरण या साधनाने आपण तर शुद्ध होऊच पण आपली उभय कुळेही पवित्र होतील. ''**तरतील कुळे दोन्ही उभयता। गातां आईकता दोन्ही शुद्ध॥**'' आपण केलेल्या नामसाधनाने दोन्ही कुळे उद्धरतील यात काय नवल ??? ज्ञानराज ग्वाही देतात, ''**ऐसे माझेनि नाम घोषें। नाहीशी करीती विश्वाची दुःखे।**'' इतकंच नाही तर ''**अवघे जगचि महासुखे। दुमदुमित भरले॥**''

तुकोबाराय म्हणतात, ''**पवित्र ते कुळ, पावन तो देश। जेथे हरिचे दास जन्म घेती॥**'' की जे नामस्मरणाशिवाय अन्य काही उठाठेव करत नाहीत. नारद भक्तिसूत्रात सांगतात, ''**पावयन्ति कुलानि, पृथ्वींच। मोदन्ते पितरो। नृत्यन्ति देवताः। सनाथाच इयं भूः भवति॥**''

नामधारक भक्त कुळाला किंबहुना सर्व पृथ्वीलाच पावन करतात. त्यांचे पितर आनंदित होतात, देवता नृत्य करतात. नामदेवरायांचं उदाहरण बोलकं

आहे अतिशय !!! ‘‘**नामदेव कीर्तन करी, पुढे उभा नाचे पांडुरंग।**’’ किती नाचावं ना देवाने ?? तर ‘‘**नाचता नाचता देवाचा गळला पितांबर।**’’ या नामधारकांच्यामुळे पृथ्वी सनाथ होते.

पितरांसाठी, शास्त्रांनी श्राद्ध, पक्ष, दान करण्यास सांगितले आहे, त्याने पितरांची साधारण तृप्ती होते, नाही असं नाही पण पूर्णतया नाही. पण जर त्या कुळात एखादा नामधारक निघाला तर सर्वांचाच उद्धार, विश्वाचे कल्याण. एवढे सामर्थ्य नामाशिवाय अन्य कशातच नाही म्हणून माऊलीचा आग्रह आहे की, ‘‘**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।**’’

✻ ✻ ✻ ✻ ✻

# अभंग क्र. ११

**हरि उच्चरणी अनंत पापराशी। जातील लयासी क्षणमात्रे॥१॥**

**तृण अग्निमेळे समरस झाले। तैसे नामे केले जपता हरी॥२॥**

**हरि उच्चारण मंत्र हा अगाध। पळे भूतबाधा भेणे तेथे॥३॥**

**ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ। न करवे अर्थ उपनिषदा॥४॥**

ज्ञानराजांनी या प्रस्तुत अभंगात हरिनामाचे पापनाशकत्व दृष्टांतातून छान स्पष्ट करून सांगितले आहे. तृण म्हणजे गवत व अग्नी यांचा संयोग झाल्यावर गवत जसे जळून भस्मसात होते किंबहुना समरस म्हणजे अग्निरूपच होते त्याचप्रमाणे, तसेच, भगवंताच्या नामस्मरणाने पापी जीवांची अनंत पापे संपूर्णतया नष्ट होतात व ते जीव हरिरूपच होतात. आता पापराशी ''**अनंत**'' म्हटल्या आहेत.

आता प्रथम पाप म्हणजे काय ते पाहावयास हवे. पापाचे मुख्यत: (अध्यात्मदृष्ट्या) तीन प्रकार - १) मुख्य पाप आहे, भगवंताचे विस्मरण. २) देहात्मवादी असणे. ३) वेदांची आज्ञा न मानणे. मनुस्मृतीमध्ये पापाची व्याख्या अशी आहे, ''**निषिद्ध कर्मप्रवृत्ती, विहित कर्म त्याग आणि इंद्रियनिग्रह नसणे म्हणजे पाप.**'' पापाने माणूस पतनास प्राप्त होतो.

आपल्या तुकोबारायांनी पापाची व्याख्या काय केली आहे ? ''**पाप त्याचे नाव, न विचारिता नीत। भलतेचि उन्मत्त करी सदा॥**'' शास्त्राने पाच महापातके सांगितली आहेत - १) असत्य भाषण, २) परद्रव्यापहरण (चोरी), ३) हिंसा, ४) परद्वारागमन, ५) अभक्ष्यभक्षण आणि अपेयपान. पापाचे कायिक, वाचिक व मानसिक असेही प्रकार सांगितले आहेत.

मनुष्यप्राणी हा कर्ममय आहे. म्हणजे कर्म न करता तो राहूच शकत नाही. कर्माचे दोन प्रकार आहेत, न्याय्य व विपरीत. विपरीत कर्म म्हणजेच

पाप. सामान्यत: जीवाची प्रवृत्ती पापकर्माकडे आहे. जसे "**खालारा धावे पाणी**". तुकाराम महाराजांनी पापाची व्याख्या आणखी सोपी करून सांगितली आहे, "**पुण्य ते परोपकार, पाप ते परपीडा।**"

पाप म्हणजे काय, ह्यानंतर त्यांच्या कारणांचा विचार करावयास हवा. जोपर्यंत कारणांचा नाश होत नाही तोपर्यंत पापांची पूर्णतया निवृत्ती कशी होणार ना??? आता कारण काय ? अर्जुनाने भगवंतास प्रश्नच केला आहे, "**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुष:। अनिछन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजित:॥**" भगवंतांनी उत्तर दिले आहे, "**काम एष, क्रोध एष रजोगुण समुद्भव:। महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्॥**" काम, क्रोध इत्यादी विकारच जीवाच्या पापप्रवृत्तीला कारण आहेत. यांच्या आधीन झालेला जीव अविवेकाने करू नये ते करत असतो. श्रीमद्भागवतात उद्धव भगवंताला विचारतोय, "हे श्रीकृष्णा, पाप हे दु:खाला कारण असूनही हे माहित असूनही मनुष्यमात्र श्वान, खर, बोकडाप्रमाणे ते करण्यास कां बरे प्रवृत्त होतो ? भगवंतानी त्याचे सविस्तर उत्तर दिले आहे.

भगवान म्हणाले, "**रजोगुणमिश्रित मन**" हे भोग्य आहे, हे सुखकर आहे असे संकल्प करावयास लागते. अशा संकल्पाचे ध्यान मनाला जडले की, त्या मंदबुद्धी माणसाची इच्छा अनावर होते. मग तो इच्छेच्या आहारी जाऊन दु:ख निर्माण करणारी कर्मे जाणून-बुजून करावयास लागतो. कारण त्याच्यावर रजोगुणाचा पगडा बसलेला असतो. सुख लालसेमुळे (खोट्या), अविवेकी माणसाच्या अंत:करणात, "**मी कर्ता, मी भोक्ता**" अशी "**मी**" संबंधाने अयथार्थ बुद्धी निर्माण झालेली असते व ही बुद्धी मनाला विकृत करते.

तात्पर्य काय, तर अशी अहं बुद्धीच आणि देहतादात्म्य हेच पापाचे मूळ कारण आहे. शास्त्रकाराचे हे म्हणणे आणि माणसांचा अनुभवही असाच आहे. जागृतीत देहबुद्धी-तादात्म्य असते तर सुषुप्तीत ते नसते. म्हणून वेदान्तात "**देहबुद्धी**" हेच मोठे पाप म्हटले आहे. देहबुद्धीला कारण आहे,

आत्मस्वरुपाचे विस्मरण. म्हणजे या सगळ्याचा निष्कर्ष एवढाच की भगवंताचे विस्मरण हेच पाप, मोठे पाप. केव्हा होणार नाही ? तर **भगवंताच्या स्मरणात** आणि त्याचे साधन एक "**हरिनाम**".

शास्त्रामध्ये पापनाशक अशी जी व्रत, तप, दान, यज्ञ इत्यादी साधने सांगितली आहेत, ती कार्यरूप पातकांचा नाश करू शकतात. पण त्या पापामागील कारणरूप पातकांचा नाश, मूलतः नाश करण्याचे सामर्थ्य त्या साधनात नाही. असे सामर्थ्य फक्त एक "**हरि उच्चारणी**"च आहे असे श्री ज्ञानराज, हरिपाठातील या अकराव्या अभंगात सुरवातीलाच अगदी छातीठोकपणे सांगतात. भागवतकार सांगतात, "**संकीर्त्यमानो भगवानन्तः श्रुतानुभावो, व्यसनं हि पुसाम्।**"

"**प्रविश्य चित्तं विधुनोत्यशेषं यथातमोऽकोऽभामिवातिवातः॥**" एका अनंत भगवंताचे नाम-गुण-लीला-चरित्र-स्वरूप संकीर्तन, त्यातल्या त्यात सोपे व सर्वांना अधिकार असलेले असे एक नामसंकीर्तन केले की तो अनंत भगवान जीवांच्या हृदयात प्रवेश करून जीवाची सर्व पापे नष्ट (समूळ नष्ट) करून टाकतो, कशी म्हणाल तर ज्याप्रमाणे सूर्य अंधःकाराचा समूळ नाश करतो.

आता कोणी अशी शंका घेईल की, "पापकर्माचा नाश, त्याचे फळ दुःख भोगून किंवा प्रायश्चित्ताने जर होतो, तर मग नामस्मरण कशाला करायचं ? तर या शंकेचे उत्तर असे आहे की, प्रायश्चित्त घेतले असता, अगर दुःख भोगले तरी जीवाचे मन पुनःपुन्हा पापकर्माकडे धावू शकते, नाही नाही तर ते धावतेच धावते. ते काही खऱ्या अर्थी पापाची समूळ शुद्धी करणारे नाहीच नाही. पापांची समूळ नाश करण्याची इच्छा असणाऱ्याने हरिगुणगान व हरिनामस्मरणच करावे. **नामस्मरण** हेच खरे प्रायश्चित्त. **नाम** चित्ताची शुद्धी करते. यज्ञ, दान, तप यांच्यामुळे पाप नाहीसे होईल. पण अधमाचरणाने मलीन झालेले पातक्याचे चित्त कसे बरे शुद्ध होणार नां ? मात्र एका नामस्मरणाने मात्र नुसते पातकच नाही तर चित्त शुद्धी होते.

नामदेवराय म्हणतात, "असत्त्याच्या मळाने जी वाचा मलीन झाली ती तीर्थेदिकांनी कशी पुनित होणार ? पण हरिनामामृत मात्र वाचेला पवित्र करते, तेथे पाण्याचा काय उपयोग ? गंगासागरादी कोट्यावधी तीर्थांची एका हरिनामाबरोबर कशी बरोबरी होणार ? पण एका हरिनाम गंगेत सुरवात झाली तर श्रीहरी आपल्या अंतरंगात ठाण मांडून बसतो." पातकांचे बीजरूपी सारेच्या सारे संस्कार, वासना यांची निवृत्ती नामस्मरणाने होते. म्हणून **नाम** हेच एक सकळपापनिवृत्तीचे एकमेव श्रेष्ठ असे साधन आहे. ज्ञानराज म्हणाले आहेत, "**कीर्तनाचे नि नटनाचे। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे। जे नामचि नाही पापाचे। ऐसे केले॥**" नामस्मरणाने पापाचे मूळ जी वासना-वासनेचे मूळ भगवंताचे अज्ञान, तेच समूळ नाहीसे होते. त्यामुळे पुन्हा पापोत्पत्ती होण्याचा संभवच नाही ना !!!

म्हणून ज्ञानराज या अभंगाच्या पुढील चरणात म्हणाले, "**तृण अग्निमेळे समरस झाले। तैसे नामे केले जपता हरी॥**" अग्नीचा दृष्टांत नामाचा श्रेष्ठ प्रभाव दाखवणारा आहे. तृणाचा जरी मोठा डोंगर असला (किंवा गंजी असली) तरी अल्पशा अग्नीने म्हणजे एका ठिणगीने जळून भस्मसात होतो. येथे माऊलीनी काष्ठ शब्द न वापरता "तृण" शब्द वापरला आहे का ? तर काष्ठ पेटण्यास व दग्ध होण्यास मोठा अग्नी लागतो व वेळ पण लागतो. पण तृण पेटण्यास व दग्ध होण्यास ठिणगी पुरते व अवकाश पण लागत नाही. काय शब्द योजना आहे बघा !!! नामस्मरणाने पापे नष्ट होण्यास मुळीच जरासुद्धा वेळ लागत नाही. तृणाऐवजी मृत्तिकापण म्हणाले नाहीत का ? तर माती कितीही दीर्घकाळ जाळली तरी जळता जळत नाही.

नामातील सुप्त हरिचैतन्यामुळे सर्वच्या सर्व पापसमूह नष्ट होतात तो जीव हरीरूप होतो. पापकामनाच नष्ट होते-पापाचे मूळच नष्ट होते. खरीखुरी अंतर्यामी हरिभक्ती मुरल्याची खूण नारदांनी भक्तिसूत्रांत सांगितली, "**सा भक्ति न कामयमाना, विरोधस्वरुपात्‌च॥**" तुकोबाराय सांगतात, "**काम नाही, काम नाही। झालो पाही रिकामा॥**" रिकामा म्हणजे रिकामटेकडा

नव्हे तर निष्काम-निश्चल असा अर्थ आहे. नामस्मरणाने जीव, सर्वांगाने, सर्वस्वी ''तृप्त-तृप्त'' होतो.

या अभंगात पुढे म्हणाले. ''**हरि उच्चारण मंत्र हा अगाध।**'' मंत्र म्हणजे ''**मननात् त्रायते इति मंत्रः।**'' ज्याचे मनन सातत्याने केले असता तो जीवाचे सर्वतोपरी रक्षणच करतो म्हणून सर्वकाळ, सर्वठायी नाममंत्राचे स्मरण घडावयास हवे. श्रीगुरुंकडून सानुग्रह मिळालेल्या नाममंत्रात हे तारण्याचे-सांभाळण्याचे सामर्थ्य अगणित पटींनी गुणित झालेले असते. नाममंत्र हा इतर मंत्रांपेक्षा अगाध-अगाध-अगाध आहे. याचे सामर्थ्य अमर्याद आहे. याचे फळ अनंत आहे. याने होणारा लाभ अथांग, कल्पनातीत आहे.

नाममंत्र हा सगळ्या मंत्राचे सारसर्वस्व आहे. तुकोबाराय म्हणाले, ''**सार सार सार। विठोबा नाम तुझे सार। म्हणोनि शूलपाणि जपतसे निरंतर॥**''

''**उघडा मंत्र जाणा, रामकृष्णहरि म्हणा**'', असा तुकोबारायांचा निर्वाळा आहे. यात झाका-पाक काही नाही. मांडण-टाकणे काही नाही, भस्म नाही-दंड नाही, आसन नाही, विधी नाही, तंत्र नाही. सोपा-सोपा-सोपा अगदी सोपा असा हा **नाममंत्र**.

मंत्राचे प्रकार अनेक आहेत - १) सिद्ध मंत्र - कालांतराने फळ देणारा. २) साध्य मंत्र - लवकर थोड्याच श्रमाने फळ देणारा. ३) सुसिद्ध मंत्र - त्वरित फळ देणारा. ४) अरि मंत्र - हा जपणाऱ्याचा सर्वनाश होतो. नामाशिवाय सर्व मंत्रांना ऋ व धन चक्राचे शोधन करावे लागते. मंत्री ऋणी व जापक धनी असावा लागतो. मात्र याच्या उलट असेल तर जन्मभर मंत्रजप करूनही काहीच उपयोग होत नाही. शिवाय मंत्राचे उच्चार स्वच्छ, शुद्ध व व्यवस्थित झाले तरच थोडा फार उपयोग. नाही तर उलटपक्षी विपरीतच परिणाम. तुकोबा म्हणतात, ''**मंत्र चळे थोडा। तरी धडचि होय वेडा॥**'' जरा जरी चूक झाली तरी शहाणा वेडा होतो.

या नामाखेरीज इतर मंत्रांचे काठिण्य व नाममंत्राचे सौलभ्य श्रीगुरु

ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "**अशौचिया जपो नये, आणिकाते ऐको नये। ऐशिया मंत्राते जग बिहे। त्याचे फळणे थोडे, परि क्षोभणे बहू। तैसा मंत्रराज (नाम) नव्हे नव्हे रे। नारायण नाम, नारायण नाम। नारायण नाम म्हण कारे।।**" इतर मंत्रांची संख्या ऐकूनच छाती दडपेल !!! सात कोटी प्रकारचे मंत्र आहेत. पण ते सर्वच्या सर्व चित्तविभ्रमकारक आहेत. भगवद्नाम हाच एक श्रेष्ठतम मंत्र आहे.

याच अभंगात ज्ञानराजांनी नाममंत्राचे आणखी एक सामर्थ्य सांगितले आहे, "**पळे भूतबाधा भेणे तेथे।।**" नामाच्या भयाने भूतबाधा पळते. भूतबाधा म्हणजे तरी काय ? श्रीमद्भगवद्गीतेत भूतयोनीचे अस्तित्त्व मानले आहे. "**भूतानि यान्ति भूतेज्या**"...... पद्मपुराणात नारद म्हणतात, "**न प्रतो, न पिशाच्चो वा। राक्षसो वा असुरोऽपि वा। भक्तियुक्त मनस्कानां। स्पर्शनेऽपि प्रभुर्भवेत।।**" याचा अर्थ काय ?

प्रेत, भूत, पिशाच्च, राक्षसादिक कोणी पण भक्तियुक्त अंत:करण असणाऱ्यांना स्पर्श करण्यास काय जवळ, आसपास फिरकण्यासही असमर्थ असतात. "भूते" याचा एक दुसरा अर्थ असा आहे, चतुर्विध जीवप्राणी व देवता यांची बाधा म्हणजे आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध दु:खाची बाधा.

भूतबाधा याचा आणखी एक असा पण अर्थ आहे, आपले स्थूल शरीर व लिंग शरीर हे भूतकार्यच म्हणजे पंचमहाभूतांचेच कार्य आहे. आपण जी सांसारिक दु:खे भोगतो त्या दु:खानाच (सांसारिक) भूतबाधा म्हणतात. दु:ख हे पापाचे फळ आहे. नाममंत्राच्या स्मरणाने पापच काय तर पापबुद्धी पण नष्ट होते. मोरोपंत म्हणतात, "**भगवन् नामोच्चारे सकलहि पापे सवासने जळती।**"

भूतबाधेचा अधिक सखोल विचार असा - भूत, प्रेत, पिशाच्च यांची बाधा सर्वांनाच असत नाही. पण सर्वजीवमात्रांना पीडा देणारी एक भूतबाधा श्रीज्ञानराज माऊलींनी सांगितली आहे. कोणती ? तर, "**जे बहुता एका**

**अवांतरू। अहंकाराचा भूत संचारु। झाला, म्हणौनि विसरु। आत्मबोधाचा ॥''**

भूतबाधा एका जन्मापुरती व एखाद्यालाच होईल पण वर ज्ञानदेवांनी सांगितलेली भूतबाधा मात्र सर्वांना आणि सर्वकाळी होत असते; ती फार महाभयंकर आहे. सर्व संसार दुःखाला (जन्म-मरणाला) कारण हा अहंकाररूपी भूतसंचारच आहे. भूत जसे नाना प्रकारे नाचवते तसा हा अहंकारही जीवाला नानाप्रकारे नाचवतो. ज्ञानोबाराय म्हणतात, **''नवल अहंकाराची गोठी। विशेषे न लगे अज्ञानापाठी। सज्ञानाचे झोंबे कंठी। नाना संकटी नाचवी ॥''**

अहंकाराचा भूतसंचार झाल्यावर त्या माणसाच्या चेष्टा कशा सैरभैर होतात याचे वर्णन जागोजागी आहे. एवढा अनर्थ भोगावयास लावणारे हे जबर ''अहंकारभूत'' अशा महाभूताची निवृत्ती फक्त एका भगवद्-नामस्मरणानेच मात्र होते.

हरिपाठाच्या अकराव्या अभंगातील शेवटचे चरण आहे, **''ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ। न करवे अर्थ उपनिषदां ॥''** श्री ज्ञानेश्वर महाराज या चरणातून श्रीहरीचे सामर्थ्य व स्वरूप सांगतात. म्हणतात की, माझा श्रीहरि असा अलौकिक सामर्थ्यवान आहे की, त्याचे सामर्थ्य व स्वरूपस्थिती उपनिषदांनाही अतर्क्य आहे.

नामस्मरणाने त्या नामधारकाचे सर्व कर्मच, देहादी सर्व उपाधीसह, श्रीहरीशी एकरूप होऊन जाते. अखंड नामस्मरण करणारा नामधारक सदेह सच्चिदानंदरुप श्रीहरिस्वरूप होऊन जातो. केवळ ज्ञानाने देहादी नामरूपे सोडून सच्चिदानंद जीवात्म्याचे सच्चिदानंदच अशा निर्गुण ब्रह्माशी ऐक्य होते तर भक्तीचे योगाने, **''ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी। भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥''** किंवा **''सदेह सच्चिदानंद कां न होआवे ?''** असं ज्ञानेश्वर महाराज कौतुकाने विचारताहेत. संतांच्या वरील वचना आणि अनुभवानुसार नामधारक हा देहादी नामरूपांसह सच्चिदानंदभगवत्स्वरूप होतो. याचा

अर्थच असा की, "**देहादिकाला वगळून ब्रह्मरूप होणे याला ज्ञान म्हणतात व देहासकट ब्रह्मरूप होणे यालाच म्हणतात भक्ती !!!**" आहे ना सुंदर व्याख्या आणि फरक, ज्ञान आणि भक्तितला ???

असं ज्याच्या **नामाचं** सामर्थ्य मग श्रीहरिचं सामर्थ्य काय ??? तर म्हणतात, **माझा** श्रीहरि असा समर्थ आहे म्हणजे त्याची स्वरूपस्थिती इतकी अतर्क्य आहे की, तिचे उपनिषदांना म्हणजे वेदानाही आकलन झाले नाही. ज्ञानेश्वरमहाराजादी सर्व संतांचे म्हणणे केवळ भावनाप्रधान नसून सिद्धांतभूत आहे.

भगवंताच्या-श्रीहरीच्या सच्चिदानंदस्वरूपाचा अनुभव हा त्यातील त्रिविधपणा मोडून एकरुपता झाल्याशिवाय येत नाही. एकरूपता होण्यासाठी निर्विकल्प अंत:करणाची नितांत गरज आहे. त्यासाठी **अभिमान** नि:शेष सुटला पाहिजे. हा अभिमान **आनंद** किंवा प्रेमस्वरूप **भक्ति** यांवाचून नाहीसा होत नाही.

अहंकाराने आनंद झाकला जातो. अहंकार नाहीसा होऊन व आनंद अनुभवास येण्यासाठी सच्चिदानंदाचा तीनपणा जावा लागतो. हा तीनपणा जाण्यासाठी म्हणजेच वर वर्णन केलेली **निर्विकल्प** स्थिती प्राप्त होण्याकरिता एकच उपाय. सगुण श्रीहरीची प्रेमलक्षणा भक्ती व अशी भक्ती म्हणजेच त्याचे प्रेमपूर्वक स्मरण आणि स्मरणाचे साधन त्याचेच **नाम**.

सोन्यात कांती, कठीणपणा व कनक एकरूप आहेत. अमृतात पातळपणा, गोडी व अमृतता एकरूप आहेत. कापराचे ठिकाणी शुभ्रता, सुगंध व मृदूता एकरूप आहेत. त्याचप्रमाणे भगवंताचे ठिकाणी सत्, चित्त् व आनंद एकरूप आहेत. भक्तिप्रेमाखेरीज हा एकरूपतेचा आनंद अनुभवास येत नाही.

भक्तिशिवाय ज्ञानात अहंकार आहे व अहंकार आहे तो पर्यंत सत्-चित् कळतं पण आनंद अनुभवास येत नाही. पण सगुणाच्या प्रेमाने/आनंदाने अंत:करण निर्विकल्प होते असा सर्व संतांचा अनुभव व भक्तीशास्त्रकारांचा सिद्धांत आहे.

सगुण श्रीहरि परमानंद साकार आहे. "**श्रीकृष्णदेह चैतन्यघन**", असं नाथराय म्हणतात. अशा आनंदघनाचे वर्णन काय व कसे करणार/होणार ? जाणीव आहे तोपर्यंत आर्णन नाही. म्हणजेच वर्णन करता येते. पण जाणीवच मुरते तेव्हा वस्तूचे वर्णन करणे अशक्य होते.

काय गंमत आहे आनंद भगवंताचेच स्वरूप आहे. पण त्याचा अनुभव येत नाही, सत् व चित्‌चा येतो मात्र. म्हणजे "मी" आहे आणि "मी" चेतन आहे हे आपल्याला कळते-पटते पण "मी" आनंद आहे हे उमगत नाही. जसे प्रकाश व उष्णता हे दिव्याचे स्वरूप आहे पण घरातील लोकांना दिव्याचा प्रकाश कळतो उष्णता नाही, तसंच आनंदाचं.

हा **आनंद**, चित्त भक्तिप्रेमाने सगुणाकार झाल्याशिवाय नाही. हा श्रीहरि परमप्रेमरूप आहे. आंब्याच्या गुणधर्माचे वर्णन करता येते पण गोडीचे नाही. तसेच प्रेमस्वरूपाचे नाही का ? म्हणून **वेद** त्रिगुणात्मक स्वरूपाचे वर्णन करतात पण भक्तिप्रेमस्वरूपाचे वर्णन करू शकत नाहीत. इत्यर्थ काय तर भगवंताच्या प्रेमानंदस्वरूपाचा महिमा अगाध आहे, अतर्क्य आहे, इतका अनाकलनीय आहे की वेदांना-उपनिषदांनापण त्याचे वर्णन करता येत नाही, "**अनुभवे चित्ता चित्त जाणे।**" असा प्रेमभाव **नामात** आहे.



# अभंग क्र. १२

**तीर्थ व्रत नेम भावेविण सिद्धि। वायांचि उपाधि करिसी जना।।१।।**

**भावबळे आकळे, एऱ्हवी नाकळे। करतळी आवळे तैसा हरी।।२।।**

**पारियाचा रवा घेता भूमीवरी। यत्न परोपरी साधन तैसे।।३।।**

**ज्ञानदेव म्हणजे निवृत्ति निर्गुण। दिधले संपूर्ण माझ्या हाती।।४।।**

या अभंगात श्रीगुरु ज्ञानराज भावभक्तीचे माहात्म्य पुन्हा एकदा स्पष्टपणे आणि स्वानुभवाने सांगतात. श्रीहरि प्राप्त व्हावा म्हणून लोक दान, तीर्थयात्रा, व्रत-वैकल्ये, उपवास, नेम असं बरचसं काही काही करत असतात. पण या सगळ्या गोष्टी करताना मनाची प्रवृत्ती मात्र बहिर्मुख व भेददर्शी. त्यामुळे या सगळ्या खटाटोपांचा तसा फारसा उपयोग होतच नाही. चित्त अंतर्मुख झाल्यावरच भगवत्प्राप्तीचा अनुभव प्रत्ययास येतो आणि त्यासाठी केवळ उत्कट, निर्व्याज भावभक्तीनेच या सगळ्या गोष्टी संपन्न व्हावयास पाहिजेत. अशी मंगळ, निरपेक्ष, निरामय भक्ती चित्तात स्थिर होण्यासाठी सर्व सुलभ साधन म्हणजे **नाम** हेच एकमेव.

**भावा** वाचून नुसती ही वरील साधने (अभंगाच्या पहिल्या चरणात सांगितलेली) भगवंताची प्राप्ती करून देण्यास सर्वथा असमर्थ. ही सगळी साधने ''मी करतो, केली'' या अभिमानाने मलिन होतात. ज्ञानदेवांनी अशा वृथा अभिमानाला **''वायांचि उपाधि''** म्हटले आहे. सारभाग काय ? जोवर अहंकार आहे तोवर परमात्म प्राप्ती नाही.

एक चित्तात फक्त भगवंताविषयी शुद्ध **भाव** असेल तरच या सर्व साधनांचा उपयोग. नाहीतर ती सर्व वायाच. भगवद्ऐक्यासाठी अभिमानरहित होण्याची नितांत आवश्यकता आहे. भगवान् अर्जुनाला म्हणाले, ''**आम्ही भावाचे पाहुणे। भलते या।।**''

नामभक्ती परिपक्व झाल्याची खूण म्हणजे श्रीहरीचा सगुण-साक्षात्कार होऊन भक्त-भगवंत यांची भावैक्यता व तत्वैक्यता. भक्त हा परमभक्तीभावाने भगवंताशी तत्त्वत: अद्वय होतो. पण याउपरही उपासनेसाठी भगवतसेवेसाठी भक्तीप्रेमसुखासाठी उपासक-उपास्य, सेव्य-सेवक, देव-भक्त असे द्वैत वरकरणी राखतो.

अंत:करणापासून वाटणारे भगवंताचे आत्यंतिक प्रेम, श्रद्धा, भक्ती यामुळेच श्रीहरी आपलासा करता येतो. हे सर्व भाव वृद्धिंगत होण्यास सुलभ उपाय म्हणजे **नामसाधना**. हृदयांत हरिकेंद्रीत उज्ज्वल, दिव्य भक्तिभावधारा जर वाहात नसेल, तर केलेल्या सगळ्या गोष्टी भाजून पेरलेल्या बियाण्यासारख्या व्यर्थ. आपणाला परमात्म्याचा सगुण-साक्षात्कार व्हावा असे प्रत्येक **उपासकाला** वाटतेच ना !!! पण तो कसा साधावा, साध्य होईल हे मात्र कळत नाही. तो कसा लाभेल याची गुरुकिल्लीच श्री ज्ञानेश्वर महाराजांनी या अभंगाच्या पुढील चरणात सांगितली.

गुरुकिल्ली काय तर, ‘‘**भावबळे आकळे, येऱ्हवी नाकळे।**’’ या चरणात **भावाला** बळ असं म्हटले आहे. भावाचे हे बळ म्हणजे सामर्थ्य अगाध आहे. श्रीनाथराय आपल्या स्वात्मसुख या ग्रंथात म्हणतात, ‘‘भावार्थात निजस्वार्थ, भावार्थ असेल तर कृतार्थता, भावार्थ असेल तरच परमार्थ, मग पाषाणातसुद्धा प्रत्यय. **भावाने** भ्रांति फिटते, त्याने विकल्प नाहीसा होतो, भावानेच देव भेटतो, ज्या ठिकाणी भाव धरावा तेथेच. भाव असेल तर तीर्थाची सुफलता, भावाने परतत्त्व कळते, वैकुंठीचा पाहुणा श्रीहरि भाव-बळानेच आपल्या **घरी** मुक्कामास येतो.’’

हे भक्तिभावरुप बळ ज्याच्याजवळ आहे मग त्याच्यापुढे दुसरे कोणाचेच व कोणतेच बळ चालत नाही !!! श्री तुकोबाराय म्हणतात, ‘‘**भावापुढे बळ। नाही कोणाचे सबळ।।**’’ नाथमहाराज पण असंच म्हणतात, ‘‘**भक्तिचिया प्रेमप्रीती। हृदयी कोंडिला श्रीपती। तेथ खुंटल्या सामर्थ्यशक्ती। भावार्थाप्रती बळ न चले।।**’’ आणि हा भाव बळकट होण्याचे साधन ‘‘**हरिनाम**’’

आपले परोपरीचे प्रयत्न, आपली शक्ती याची किंमत ती काय ? एक परमात्मा आहे. तो आपल्याला दिसत नाही पण संतांना दिसतो. तो परमात्मा आपल्यापेक्षा मोठा आहे, तोच सारं करतो, आपला विश्वास नाही. तीर्थ, व्रत, नेम हेही रुपयांतील दहा पैशांएवढेच मोलाचे श्रीहरीला आकळण्याच्याबाबतीत !!! मात्र जो कोणी हरीला भावबळे आकळतो, त्या भाबड्या-भाविकाला तो प्रत्यक्ष होतो, साक्षात् अनुभवाला येतो. श्रीहरीला मोजता येत नाही. त्याची किंमत करता येत नाही, कारण तो अमेय आहे, अमूप-अमाप आहे. तो फक्त भक्तिप्रेमानेच मिळतो. कारण प्रेमात-भक्तीत हिशेब नसतो. हिशेब असतो त्याला व्यवहार म्हणतात. भक्तिप्रेम हे बेहिशोबीच असते.

तुकोबाराय म्हणाले, "**भक्तीचिया मापे मोजितो अनंता। इतराने तत्त्वता न मोजवे॥**" जनाबाईंनी साथ दिली, "**प्रेमे बांधोनिया दोर।**" भगवानच अर्जुनाला म्हणतात, "**भक्त्या तु अनन्यया शक्य। भक्ताहं एकथा ग्राह्या॥**" आणखी एक महत्त्वाची गोष्ट की, आधी आपल्याला कळलं पाहिजे की, भगवंत आपल्यापासून दूर नाही. तो तर आपल्या हृदयी आहे. "**ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**"

मग प्रश्न असा की इतका जवळ असून मग त्याला का जाणता येत नाही ? का कळत नाही ? का आकळत नाही ? नाही कां ? त्याचे कारण गीता सांगते, "**सूक्ष्मत्त्वात् तत् अविज्ञेयं, दूरस्थं च अंतिकेच तत्॥**" मग त्याला पहावे, भेटावे, बोलावे कसे ? तर आपणाला विशेष आवडणाऱ्या विशिष्ट स्वरूपात भगवंताने सगुण-सजीवपणे प्रकट व्हावे अशी इच्छा धरून आर्तभावाने कळवळून त्याला विनवावे, त्यासाठी धरणे धरावे. ही प्रार्थना, विनंती, आळवणी कशी करावी ?

तर "**रूप दावी कारे आता**", "**धावत ये झडकरी आतां**", "**वेळ कां आता लावियेला ?**", "**चुकलिया बाळ, हुरहुर करी**" किंवा "**भेटीलागी जीवा लागलीसे आस। पाहे रात्रंदिवस वाट तुझी।**"

**"तुका म्हणे मज लागलीसे भूक। पाहे रात्रंदिवस वाट तुझी, धावा नि श्रीमुख दावी देवा।"** अशी आर्त आळवणी करावी.

**"देह जावो अथवा राहो। पांडुरंगी दृढ भावो॥"** अशा निश्चयाने अखंड नामस्मरण, संकीर्तन, भजन, ध्यान करावयास हवे, ध्यास लागला पाहिजे. त्याच्या भेटीसाठी जीव व्याकूळ झाला पाहिजे. त्याच्याशिवाय परमव्याकूळता, अकृत्रिम भक्ती हवी. उद्धवाला म्हणाले, **"माझ्या प्राप्तीसाठी भांडवल फक्त एकविध भाव, उद्धवा !"** भक्तीपाशी मी श्रीपती निश्चित असतोच रे !

भावाशिवाय म्हणजेच भक्तिप्रेमाशिवाय बहिरंग साधनांचा, भगवंताचे बाबतीत काहीच उपयोग नाही. मुख्य आणि अत्यंत अंतरंग साधन म्हणजे अखंड आणि मोठ्या प्रेमभावाने त्याचे नामस्मरण हाच होय. श्री तुकाराम महाराज म्हणतात, **"सापडे हा देव, भाविकांचे हाती। शहाणे मरती तरी नाही नाही॥"**

कोणत्याही कर्मकांडाने भगवत्प्राप्ती होणारच नाही. कारण कर्म उत्पन्न होते, नाश पावते. तसेच कर्मफळही अंतवंतच आहे. मात्र परमात्मा अनंत म्हणजे नाशरहित आहे, नित्य आहे. त्यामुळे त्याच्या प्राप्तीचे साधन तेवढेच नित्य हवे नाही का ??? भगवंत नित्य, त्याच्या कितीतरी पटीने त्याचे **नाम नित्य** !!! म्हणून एक प्रेमपूर्वक नामस्मरणानेच फक्त हरिप्राप्ती होऊ शकते.

आपलं मन जेव्हा दृढ श्रद्धेने नि:शंक होतं व प्रेमाने, अखंड नामस्मरणाने जेव्हा चित्तच भगवादाकार-आनंदाकार होतं तेव्हाच भगवंताचे दर्शन-साक्षात्कार होतो. आपल्या तळहातावरील आवळा जसा सर्व बाजूंनी आपल्याला प्रत्यक्ष दिसतो, अगदी नामाने भगवंत तसाच प्रत्यक्ष. भावभक्तीने भगवंत/श्रीगुरु सर्व रूपाने प्रत्यक्ष होतो. एवढेच नाही तर सर्वथा-सर्वतोपरी **तो** भक्ताला वश होऊन राहतो. आपल्या तळहातातील आवळा आपल्याला आपल्या मुठीत घट्ट धरता येतो व तो आपल्या मुठीतच राहतो तसाच अगदी तसाच भगवंत भक्ताच्या सदैव मुठीत राहातो. श्री ज्ञानराज म्हणतात, **"द्वारकेचा राणा पांडवाघरी।"**

आधी आपल्या हे लक्षात पाहिजे की, भगवंत आपल्यापासून फार काही दूर नाही. तो तर आपल्या हृदयातच आहे. त्याला आर्तभावाने कळवळून विनवावे कसे ? तर "**भेटी लागी जीवा लागलीसे आस। पाहे रात्रंदिवस वाट तुझी॥**" किंवा गोपी म्हणत आहे, "**चंदनाची चोळी माझे सर्व अंग जाळी। कान्हो वनमाळी केगी भेटवा का॥**" त्याच्यासाठी आपला जीव असा व्याकूळ होतो का ? नारद भक्तिसूत्रात अवस्था सांगतात, "**तद् विस्मरणे परम व्याकूळता।**" होते का ??? अत्संगतीने हा अकृत्रिमभाव उत्पन्न होतो. शुद्ध भावानेच श्रीहरी आकळतो.

बहिरंग साधनांचा भगवत्प्राप्तीस काहीच उपयोग नाही. मुख्य अंतरंग व अचूक, नेमके साधन म्हणजे अखंड आणि प्रेमाने ह्या आनंदकंदाचे नामस्मरण करणे. कोणत्याही कर्माने भगवत् प्राप्ती होणार नाही. कारण कर्म उत्पन्न होते व नाश पावते. कर्माचे फळही अंतवंतच असते. मात्र परमात्मा हा अनंत म्हणजे नाशरहित आहे, नित्य आहे. म्हणून त्याच्यासाठी करावे लागणारे साधनही वास्तविक नित्यच हवे नाही का ? नामाइतके नित्य अन्य काहीच नाही. म्हणून फक्त नामस्मरणानेच हरिप्राप्ती होऊ शकते.

आपल्या तळहातात आवळा घेतल्यावर मुठीत घट्ट धरता येतो व तो आपल्यापाशी प्रत्यक्ष असतो. सर्व बाजूंनी प्रत्यक्ष असतो. त्याचे सम्यग् दर्शन घडते. आवळ्यासारखा परमात्मा पण **भावभक्तीने** सर्व रूपाने प्रत्यक्ष होतो. भक्ताला पूर्ण वश होऊन राहतो.

गीतेच्या नवव्या अध्यायात भगवान म्हणतात, "**प्रत्यक्षावगमम्**" म्हणजे "**प्रत्यक्ष फावो लागे तैसा। आपैसयाचि॥**" **आनंदघन** भगवंताशिवाय अन्य पदार्थ जाणताना, जाणणारे अंत:करण व जाणला जाणारा पदार्थ हे एकमेकापासून सर्वथैव अलग राहतात. पण हा **आनंदघनकृष्ण** इतका प्रत्यक्ष होतो की, जितके आपण आपल्याला प्रत्यक्ष आहोत, दोन उरतच नाहीत. एकरस-एकरुप-एकाकार होऊन जाते !!! आपले अंत:करणच तद्रूप होते; आपणच आनंद होतो. सगुण साक्षात्कारानंतर भक्त हृदय हेच भगवंताचे/

**आनंदाभिरामाचे** नित्य निवासस्थान होऊन राहते. भागवतकार सांगतात, ‘‘**साधवो हृदयं मह्यं, साधूनां हृदयं तु अहंम्।**’’

या अभंगाच्या तिसऱ्या चरणात ज्ञानराज म्हणतात, ‘‘**पारियाचा रवा घेता भूमिवरी। यत्न परोपरी साधन तैसे॥**’’ भूमीवर सांडलेला पारा-पाऱ्याचे कण चिमटीत उचलावयास लागलो तर ते शक्य होत नाही. त्या एका कणाच्या अनेक लहान-लहान गोळ्या इतस्तत: भूमीवर पसरतात. या पाऱ्याच्या कणासारखाच यज्ञ, व्रत, दान, तप, तीर्थ आणि नेम इ. खटपटी-लटपटींनी श्रीहरीला पकडता येत नाही. पण एका अकृत्रिम प्रेमभक्तीनेच श्रीहरीला अगदी घट्ट मुठीत-आपल्या मुठीत धरून ठेवता येते.

श्रीरामकृष्ण परमहंस एका महाशयांना नेहमी सांगत असत, संसारात असतानाही भगवंताला एका हाताने धरून ठेवा आणि संसारातूनच फुरसत काढून मग दोन्ही हातांनी त्याला घट्ट विळखा घालून आपल्या करपाशात घट्ट धरा. जनाबाई तर काय म्हणतात बघा, ‘‘**पंढरिचा चोर धरला !!!**’’ कशाने तर ‘‘**प्रेमभक्ती दोऱ्यांनी !!! हृदयाचा बंदिखाना केला, आत विठ्ठलाला कोंडून ठेवला.**’’ पुढं म्हणतात, ‘‘**जनी म्हणे बा विठ्ठला। जीवे न सोडी आता तुला॥**’’

हे बळ, सामर्थ्य त्याच्याच नामाने, नामस्मरणाने नामधारकाला प्राप्त होते. भक्तीप्रेमापुढे त्या कर्तुम-अन्यथा कर्तुम, ईश्वराचे पण सामर्थ्य लटके पडते, तो पांगळा घेऊन नामापाशी पडून राहतो.

हरिपाठातील बाराव्या अभंगाच्या शेवटच्या चौथ्या चरणात ज्ञानराज म्हणतात, ‘‘**ज्ञानदेव म्हणे, निवृत्ति निर्गुण। दिधले संपूर्ण माझे हाती॥४॥**’’

निर्गुण म्हणजे गुणातीत आणि सगुण म्हणजे अनंत गुणसंपन्न. जो भगवंत निर्गुण आहे तोच सगुण झाला आहे. सगुण होऊनसुद्धा (भक्तासाठी आणि भक्तिप्रेमसुखासाठी) त्याच्या निर्गुणत्त्वाला काही न्यूनता नाही. अनंत, अखिल गुणनिधान असूनसुद्धा तो त्रिगुणांकडून बांधला जात नाही. गुण शब्दाचा अर्थ

दोरा-दोरी-दोर असा पण आहे. श्रीहरी हा यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य अशा षड्गुणांनी समग्रतः मंडीत असूनही गुणातीत आहे.

"**निर्गुणं, निष्क्रियं,शांतम्**" असे परमात्म स्वरूपाचे वर्णन वेदांतात सांगितले आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**तो गुण नव्हे काही । गुणा तया संबंध नाही।**" अशा निर्गुणपरमात्मस्वरूपाचा ज्यांना बोध झाला (असा बोध होऊनसुद्धा त्यांना सगुणाचे विलक्षण प्रेम आहे) त्यांनाही निर्गुणच असे म्हटले जाते. याच अर्थाने ज्ञानराज आपल्या श्रीसद्गुरु निवृत्तिनाथांना, "**निवृत्ति निर्गुण**" असे म्हणतात. "**आता निर्गुण असे आणिक। ते तो जाणे अचुक। जे ज्ञाने केले टीक। तयाचिवरी।।**" असं वर्णन ज्ञानोबारायांनी ज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायात गुणातीताच्या संदर्भात केले आहे. जसा भगवंत तसाच त्याचा भक्तही.

कोणताही विशिष्ट भाव नसणारा, गुण असून गुणातीत असणारा भगवंत, गुणातीत आणि असा निर्गुण असून समग्र गुणांचा, ऐश्वर्याचा, सामर्थ्याचा धाता आहे. भगवानच गीतेत अर्जुनाला आपलं स्वरूप-वैशिष्ट्य सांगताना म्हणत आहेत, "**असक्तं सर्वभृत् चैव, निर्गुणं गुणभोक्तृच।।**" ज्ञानराज माऊली पण आपल्या सद्गुरु श्री निवृत्तीनाथांविषयी म्हणतात, नुसतं म्हणतात एवढंच नाही तर त्यांची अशी अपार श्रद्धा आहे की, "**आपले श्रीगुरु हे सगुण साकार परब्रह्मच आहेत.**" ते म्हणतात. "**निवृत्ति जया नाव। निवृत्ति जया बरव। निवृत्ति जया राणीव। निवृत्तिचि।।**" निवृत्ति हे ज्यांचे नाव आहे, निवृत्ति हे ज्यांचे ऐश्वर्य आहे, शोभा आहे, निवृत्ति हेच ज्यांचे राज्य आहे असं सगळं-सगळं काही आहे ते निवृत्तिनाथच. आपल्या श्रीसद्गुरुविषयी ज्ञानदेवांची किती श्रेष्ठ भावना आहे बघा ना. जेथे असे निवृत्तिपण असते तेथेच निर्गुणत्त्वही असतेच असते. म्हणून "**श्रीगुरुपद**" त्यांनाच शोभते. होय की नाही ???

असे श्रीगुरु असून मनुष्याकारातच असतात ना ??? पण "**मनुष्यासारिखा आवडे। परि मनुष्यत्त्व तया न जडे।**" असे असतात.

महाराज श्रीगुरुंकडे केवळ मनुष्यबुद्धीने कधीच पाहात नाहीत. भगवंत-परब्रह्मच म्हणून पाहतात. कोणाही सत्‌शिष्याचा आपल्या मनुष्याकृती असणाऱ्या श्रीगुरुंकडे पाहाण्याचा असाच भाव, विश्वास असावा.

अशा श्रीगुरुंनी कैवल्यप्रतिष्ठित श्रीगुरुंनी समग्र ज्ञानाचे, पराभक्तीचे, अध्यात्मविद्येचे व त्याचबरोबर उपासनेच्या रहस्याचे समग्र भांडारच मला दिले आहे असा माऊलीचा अनुभव आहे आणि त्यांच्याच कृपाप्रसादाने, कृपाशिर्वादाने समस्त जनांच्या पारमार्थिक कल्याणासाठी, तेच भांडार मी या हरिपाठाच्या माध्यमातून खुले करीत आहे की ज्याचे सार आहे "**हरि मुखे म्हणा**" की ज्यामुळे सर्वांना हरिप्राप्ती व्हावी.

श्रीहरी सत्-चित्-आनंदस्वरुप. त्याच्या सत् आणि चित् या दोन तत्त्वाची प्रतीती ब्रह्मज्ञानाने होते. पण **आनंद** स्वरुपाची प्रतीती मात्र फक्त आणि फक्त **भक्तीप्रेमानेच** होते आणि हे सगळे तत्त्वत: एकरूप होऊन समग्र सच्चिदानंदाची प्रतीती, अखंड प्रतीती ही प्रज्ञा फक्त श्रीगुरुकृपेनेच येते. ज्ञानोबाराय म्हणतात, "**एवढा मोठा लाभ केवळ श्रीगुरुकृपेनेच झाला.**"

श्री ज्ञानराजांची आदर्श गुरुनिष्ठा, शालीनता, अहंममत्तशून्यता इथे प्रगटली आहे. सर्व कतृत्त्वाचे, दातृत्त्वाचे व जनप्रबोधनाचे सर्व श्रेय त्यांनी आपल्या श्रीगुरु निवृत्तिनाथांना दिले आहे. "**जे ज्ञानासी न चोजवे। ध्यानासी नागवे। ते अगोचर फावे। गोठीमाजी।।**" असं भाग्य केवळ श्रीगुरुकृपेनेच लाभते अशी ग्वाही खुद्द श्रीज्ञानराजांनी दिली आहे. केवढा अपार असा हा **गुरुमहिमा** ???

* * * * *

# अभंग क्र. १३

**समाधि हरीची समसुखेवीण। न साधेल जाण द्वैतबुद्धी॥१॥**
**बुद्धीचे वैभव अन्य नाही दुजे। एका केशवराजे सकळ सिद्धि॥२॥**
**ऋद्धि-सिद्धि निधी अवघीच उपाधि। जव त्या परमानंदी मन नाही॥३॥**
**ज्ञानदेवा रम्य रमले समाधान। हरीचे चिंतन सर्वकाळ॥४॥**

मागील बाराव्या अभंगात श्री ज्ञानदेवांनी श्रीगुरुप्रतीती सांगितली तर या वरील तेराव्या अभंगात गुरुकृपाप्रसादद्वारा प्राप्त झालेली आत्मप्रतीती सांगतात. प्रतीतीचे प्रकार तीन १) शास्त्रप्रतीती, २) श्रीगुरुप्रतीती आणि ३) आत्मप्रतीती. एकापेक्षा एक क्रमश: सरस-श्रेष्ठ. सर्वश्रेष्ठ आत्मप्रतीती !!! पण केव्हा ??? तर ती शास्त्र आणि श्रीगुरुप्रतीतीशी मिळणारी-जुळणारी असेल तरच. आत्मप्रतीती सांगणारा हरिपाठातील हा अभंग महत्त्वाचा आहे. यात ज्ञानराजांनी श्रीहरीच्या समाधीचे वर्णन केले आहे.

समाधी म्हणजे स्वरुपस्थिती-सहजस्थिती !!! वृत्ति निर्विकल्प होणे हीच समाधी. चित्ताचा चैतन्याशी संयोग म्हणजे समाधी. अशा स्वरूपसमाधीमध्येच पर्यवसान होणे हे सर्व साधनांचे फळ आहे. योगसूत्रात समाधीची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. "**तदेवार्थमात्र निर्भासं स्वरुपशून्यमिव समाधि:।**" ध्येय, ध्याता आणि ध्यान ही त्रिपुटी न उरता केवळ स्वरुपाकारता राहून अन्य निराळ्या पदार्थाचे ज्ञान काहीच राहात नाही. या भूमिकेला "**समाधी**" असे म्हणतात. ज्ञानराज माऊलींनी समाधीचे लक्ष ज्ञानेश्वरीत, गीतेच्या सहाव्या अध्यायावर टीका करत असताना सांगितले आहे. "**पुढील पैस पारुखे। मागील स्मरावे ते ठाके। ऐसिये सरसिये भूमिके। समाधि राहे॥**" ज्या ठिकाणी पुढील प्रवृत्ती बंद पडून मागील कशाचेही स्मरण होत नाही अशा चित्त-चैतन्याच्या ऐक्यावर समाधी राहते. जाबाली दर्शन उपनिषदात समाधीचे वर्णन-व्याख्या केली आहे. काय सुंदर स्पष्टीकरण आहे पहा.

जसा जसा आत्मज्ञानाच्या अभ्यासाचा प्रकर्त होतो, तसा तसा अहंकाररहित मनोवृत्तीचा प्रवाह ब्रह्माकार होत जातो. त्याला संप्रज्ञात समाधि म्हणतात. परमानंदाचा अखंड अनुभव करणारे आणि सर्व वृत्ती शांत झाल्या आहेत असे अनंदस्वरुप झालेले चित्त म्हणजे असंप्रज्ञात समाधि. तेजोबिंदू उपनिषदात म्हटले आहे, "वृत्ति निर्विकल्प होणे, ब्रह्माकार होणे व वृत्तीचे पूर्णतय: विस्मरण होणे हीच सम्यक समाधि."

श्री वसिष्ठ मुनींनी योगवसिष्ठ ग्रंथात, श्रीरामरायांना उपदेश करत असताना समाधीची विस्तृत व्याख्या केली आहे. "सर्व प्रकारच्या आशारुपी तृणांना जाळून टाकणारा अग्नीच असा आत्मबोध-तत्त्वबोध म्हणजे समाधि." केवळ शांत स्थिर बसणे (ओंडक्यासारखे, दगडासारखे) म्हणजे समाधि नव्हे. समाधीचा संबंध शरीराशी नसून वृत्तीशी, चित्ताशी आहे. ती शरीराची स्थिती नसून चित्ताची स्थिती आहे. शांत, नित्यतृप्त प्रत्येक वस्तूस यथार्थ स्वरुपाने जाणणारी जी परा उत्कृष्ट प्रज्ञा तिला समाधि म्हणतात.

सविकल्प समाधीचे दोन प्रकार १) दृश्यानुविद्ध, २) शब्दानुविद्ध- दृष्यानुविद्ध समाधि ही दृष्यवस्तूशी संलग्न असते आणि शब्दाशी संलग्न असते, ती शब्दानुविद्ध समाधि म्हणजे तरी काय ? तर दृष्याचा "मी" द्रष्टा अशा रुपाने जे ध्यान केले जाते व त्यात तन्मयता लाभते ते दृष्यानुविद्ध आणि "मी" सच्चिदानंद स्वयंप्रकाश ब्रह्म आहे अशा शब्दाबरोबर जे चिंतन केले जाते व जे तादात्म्य लाभते ती शब्दानुविद्ध.

ज्ञानेश्वर महाराजांनी "**समाधि हरीची समसुखेवीण**" साधणार नाही असं म्हटलं आहे. हरीच्या समाधीमध्ये समसुख आहे. विषमतेत म्हणजे द्वैत-बुद्धीत समसुख नाही. समसुख म्हणजे समदर्शन. सम म्हणजे ब्रह्म. गीता सांगते "**निर्देतिं हि समं ब्रह्म।**" जीव व परमात्मा यांच्या समतेच्या अनुभवाने प्राप्त होणारे ते सुख म्हणजे समसुख.

समसुख म्हणजे सर्वकाळी-सर्वदेशी-सर्वथा असणारी आनंदस्वरुपता. म्हणजेच ब्रह्मानंद. हा आनंद, हे समसुख चिरंतन टिकणारे असते. ते

लौकिकावर अवलंबून नसते. या समाधीत बुद्धी/चित्त निर्मळ, असंग व समदर्शी असते.

हरिपाठाच्या या अभंगात श्रीगुरु ज्ञानोबारायांनी हरिसमाधि फार छान सांगितली आहे. भगवंताच्या स्मरणात-लयीत जो राहू शकतो त्याला योगसमाधिपेक्षा कित्येकपटींनी श्रेष्ठ अशी हरिसमाधि व समसुख प्राप्त होते. अशा समाधित भगवद्भक्ताला परमेश्वराचा सगुण-साक्षात्कार तर होतोच होतो पण त्याचबरोबर परमात्म्याच्या निराकार सत्-चित्-आनंद लक्षण सर्वव्यापी, सर्वसाक्षी सत्तेचा प्रत्यय अणूरेणूत जाणता-पाहता-अनुभवता येतो आणि याचा परिणाम असा भक्त अभेदपणे प्रेम करू लागतो.

योगसमाधि आणि हरिसमाधि यात वेगळेपणा आहे !!! योग समाधित सर्व लौकिक, प्रापंचिक कर्माचा त्याग करून निर्जन जागी जाऊन, इंद्रिये, मन, प्राण यांचा निरोध करून तद्द्वारा वृत्तिशून्यता साधावी लागते पण हरिसमाधिमध्ये अशी शरीर-प्राण-मनाची तटस्थता, निष्क्रियता व देहभान विसरणे नाही. भक्त हा आपल्या शरीर-मन-प्राणांचा उपयोग करून पूजन-भजन-कीर्तन-जप व त्याचबरोबर प्रापंचिक, लौकिक कर्म अनासक्त बुद्धीने छान करू शकतो. भक्ताची सर्व स्तरावरील **सगळी** कर्मेच **पूजास्वरुप** असतात. कर्माबद्दलची-कर्मफळाची आसक्तीच सुटल्यामुळे त्याची सर्व कर्मे ईश्वरार्पणच होत असतात, "**कृष्णार्पणमस्तु**" असे तोंडाने म्हणण्याची दिखाऊ कसरत करण्याची त्याला गरजच नसते. असा तो या सर्वोत्तम हरिसमाधित पाशरहित असतो. असा भक्त भजनात-पूजनात-स्मरणात असो वा व्यावहारिक-प्रापंचिक-लौकिक अवस्थेत असो, त्याच्या आत अखंड श्रीहरीचेच अनुसंधान असते. व्युत्थान न पावणारी अशी ही भक्तियोगातील **हरिसमाधि**. संत चोखोबांना या हरिसमाधिचे फार **सुरेख** वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात, "**बोलता, चालता न मोडे समाधि। मूळ अंतरशुद्धि कारण हे॥ अखंड समाधि होऊनि ठेले मन। गेले देहभान विसरोनि॥**"

आपल्या संत जनाबाईपण म्हणतात, "**दळिता कांडिता। तुज गाईन अनंता।। न विसंबे क्षणभरी। तुझे नाम गा मुरारी।।**"

भक्त हा भगवंताशी अनन्य हवा, नदी समुद्राशी अनन्य पाहिजे. शिष्य श्रीगुरुंशी तसाच अनन्य असला पाहिजे. किरणे सूर्याशी अनन्य हवीत नाही का ??? अशा अनन्यतेतच या अखंड हरिसमाधिचे वर्म दडलेले आहे. नारद आपल्या भक्तिसूत्रात सांगतात, "**तद्प्राप्य, तद् एव अवलोकयति, तत् एव श्रुणोति, तत् एव भाषयति, तत् एव चिन्तयति।।**" असा एकतानतेचा प्रत्यय जागृत कालातही खंड न पडता येणे हीच हरिसमाधी होय. स्वत: भगवान् गीतेत सहाव्या अध्यायात म्हणतात, "**यत्र उपरमते चित्तं, निरुद्धं योगसेवया। यत्र च एव आत्मना आत्मानं पश्यति, आत्मनि तुष्यति।।**" प्रेमलक्षणा भक्तीत स्वत:ला लोटून द्यावं, प्रेमलक्षणा भक्तिसागरात खोलवर बुडी मारावी म्हणजे मग हरिसमाधिच्या अखंड **सुखांत स्वानंदसुखात** सर्वसुखरुप होऊन तरंगता येतं.

समदर्शनात्मक अशा या हरिसमाधिच्या बाबतीत आपल्या ठिकाणी नाना शंका-कुशंका आणि भरपूर प्रश्नचिन्ह. पण अशा शंका, प्रश्नावली असण्याचं काहीच कारण नाही. कां तर आपण बाह्य उपाधितून जगाकडे पाहतो. अशा औपाधिक दृष्टीनं पाहाणं काही खरं नव्हे बघा. कारण नामरुपात्मक उपाधि ही वरचेवर बदलणारी असते, पण या सर्व उपाधिंना व्यापून असणारे चैतन्य- ब्रह्मचैतन्य-भगवंत एकच असतं ना ??? जे चैतन्य सम आहे ते पाहाणे हेच खरे पाहाणे. आम्हाला तर "**आमच्या आणि तुमच्या**" श्रीगुरुत पण भेद दिसतो, ज्ञानोबाराय सांगतात, "**या उपाधिमाजी गुप्त। चैतन्य असे सर्वगत। ते तत्वज्ञ संत। स्वीकारिती।।**"

आत्माराम सर्वत्र सम असल्यानेच सुखहि एकसमानच आहे. उदा. राजा व रंक हा भेद जागृत अवस्थेत आहे आणि तो राहणारच पण सुषुप्ति अवस्थेत गेल्यावर मग सुखशय्येवर पहुडणारा राजा व रकट्यावर झोपलेला रंक या दोघांचा **आनंद** समानच ना ??? सुषुप्तेत जर हा आनंद **समच** तर

तुर्या-उन्मनि या अवस्थेतला आनंद काय पटींनी सम ? मोजताच येणार नाही आणि तुर्येपलीकडील तुर्यातीतता या **हरिसमाधित**. केवढी **आनंदाकारता** ???

सुषुप्तीत मनुष्य प्रकृतीच्या समतेला प्राप्त होतो तर समाधित तो भगवंताच्या समतेला प्राप्त होतो. अशी हरिसमाधि द्वैतबुद्धीत साध्य होत नाही. द्वैतबुद्धी ही भयजनक आहे म्हणून द्वैतबुद्धीला पूर्ण त्यागातच ही **हरिसमाधि** आहे.

श्री चोखोबा म्हणतात, "**विधिनिषेध येणे न मोडे समाधि। तुटली उपाधी लिगाडाची।।**" अशी ही परमसमाधि आहे, "**चोखा म्हणे ऐसा समाधि सोहळा। जाणे तो विरळा लक्षामाजी।।**"

सर्वच ज्ञानसंपन्न महावैष्णवांचे व्यापार-व्यवहार ज्ञानराजांनी वर्णन केलेल्या सहजसमाधिस्थितीतच होत असतात. ही समाधि अवस्था व्यवहाराला मुळीच प्रतिबंधक नाही तर उलट पराभक्तीची ही पराकाष्ठेची सीमाच आहे. द्वैतबुद्धीरहित अशा समदर्शनाची अवस्था अनुभवास येणे हीच हरीची समाधी होय. ही समसुखात्मक समाधी प्राप्त होणे हेच बुद्धीचे खरे-खरे वैभव आहे. हरिपाठाच्या या तेराव्या अभंगात श्री ज्ञानेश्वर महाराज पुढील चरणात म्हणतात, "**बुद्धीचे वैभव अन्य नाही दुजे। एका केशवराजे सकळसिद्धि।।२।।**"

आता या चरणाचा विचार करताना प्रथम बुद्धी म्हणजे काय हे पहाणे अगत्याचे. भगवत् पूज्यपाद श्रीमद् शंकराचार्यांनी बुद्धीची व्याख्या अशी केली आहे, "**निश्चयात्मिका बुद्धिः।**" बुद्धीचे वैभव तीन प्रकारांनी गोचर होते १) सात्त्विक, २) राजस आणि ३) तामस. प्रवृत्ति-निवृत्ति, कार्य-अकार्य, बंध-मोक्ष इत्यादींना जी यथार्थपणे जाणते ती सात्त्विक बुद्धी. धर्म-अधर्म, कार्य-अकार्य, भय-अभय आदींना जी अयथावत् म्हणजे जे जसे नाही तसे म्हणजे विपरीत जाणणारी बुद्धी ती राजस आणि अधर्मालाच धर्म, अकर्तव्यालाच कर्तव्य, अज्ञानालाच ज्ञान असं यच्चयावत् सर्व पदार्थांना उलट जाणणारी बुद्धी ती तामस. जीवाला परमात्मतत्त्वाचे ज्ञान होण्याचे एकमेव साधन म्हणजे बुद्धीच. कठोपनिषद् सांगते, "**एसु सर्वेषु भूतेषु**

**गूढात्मा न प्रकाशते। दृश्यते त्वग्रथा बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मयर्शिभिः॥**'' सर्व भूतांमध्ये गूढ स्वरुपाने असणारा परमात्मा बाह्य अज्ञानबुद्धीला दिसत नाही. सूक्ष्मदर्शी लोक, तीक्ष्ण व सूक्ष्म दृष्टीनेच त्या परमतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतात. समसुख हे अतींद्रिय असले तरी बुद्धिग्राह्य आहे. भगवान् श्रीकृष्ण श्रीमद्‌भगवद्‌गीतेत सहाव्या अध्यायात अर्जुनाला ठासून सांगताहेत पहा, ''**सुखं आत्यंतिकं यत् तद् बुद्धिग्राह्यम् अतीन्द्रियम्॥**''

इतकेच नाही तर आत्मनिश्चयाची शोभा, ज्यात पूर्णत्त्वाने प्रतिबिंबित होते तो आरसा म्हणजे बुद्धीच. ज्ञानोबा माऊली म्हणतात, ''**आत्मनिश्चयाचि बरव। जया आरसा जोडे सावयव।**'' जो पर्यंत बुद्धी बहिर्मुख बनून जडाशी संबंध ठेवते, तो-पर्यंत ती वैभवशाली कशी बनणार ??? तर बनतच नाही. मग ? ती दरिद्रीच राहते. कारण ज्या जड-बाह्य पदार्थांना ती जाणते, ते सर्वच स्वभावत: अनित्य व दु:खरुप असतात ना !!! त्यांना जाणण्याने-अनुभवण्याने ती बुद्धी सुखाच्या-आत्मसुखाच्या नित्य वैभवाला प्राप्त होत नाही. उलट अनेक विकारांच्या तावडीत सापडून त्रिविध तापांचाच अनुभव घेत राहते. बुद्धिरुपी आरशाला जड-दृष्याचा मळ चढल्याने तो आरसाच मलिन होतो. म्हणून अशा मलिन आरशात आनंदस्वरुप भगवंताच्या-आत्मारामाच्या प्रतिबिंबाचा प्रत्यय येत नाही.

जड-दृष्याचे ठिकाणी आसक्त झालेल्या व अर्थवादरुप वाणीच्या योगे विवेकबुद्धी आच्छादित झालेल्या व्यक्तीच्या अंत:करणात आत्मतत्त्वविषयक बुद्धी उद्‌भवतच नाही. जेव्हा नाना प्रकारे संशयग्रस्त झालेली बुद्धी निश्चल होऊन समाधिसुखाच्या ठिकाणी स्थिर होते तेव्हाच संपूर्ण योगस्थिती प्राप्त होते. ज्ञानराजांनी या सहजस्थितीचे फार फार सुंदर वर्णन केले आहे.

ज्ञानराज म्हणतात, ''**परतोनि पाठिमोरी ठाके। आणि आपणयाते आपण देखे। देखतखेवो ओळखे। म्हणे, तत्त्व हे ''मी''॥ तिथे वोळखीचि सरिसे। सुखाच्या साम्राज्यी बैसे। मग आपणापां समरसे। विरोनि जाय॥**'' हेच खरे बुद्धीचे वैभव आहे.

बुद्धीला हे वैभव प्राप्त झाल्यानंतर ती पुन्हा कोणत्याही सांसारिक दुःखाने लिप्त होत नाही. एका केशवराजाशी बुद्धीचा संबंध आला की तिला सर्व सिद्धी प्राप्त होतात. महाभारताच्या शांतिपर्वात "केशव" या भगवंताच्या नामाची व्युत्पत्ती दिली आहे, **"अंशवो या प्रकाशन्ते ममते केश संज्ञितः। सर्वज्ञाः केशवं तस्मान् माम् आहुः द्विजसत्तमाः॥"** प्रकाशक जे चंद्रसूर्यादि ते केश संज्ञित माझेच अंश आहेत म्हणून सर्वज्ञ असे ऋषिमुनी मला केशव असे म्हणतात. हरिवंशात म्हणतात, ब्रह्मा, विष्णु आणि शिव या ज्या शक्ती आहेत त्यांना "केश" अशी संज्ञा आहे. त्या शक्तींना युक्त म्हणून केशव.

अशा या केशवराजाशी अनन्य झालेली बुद्धीच सकळवैभवसंपन्न होते व याच बुद्धीला सर्वश्रेष्ठ अशी आत्मसिद्धीसारखी सिद्धी प्राप्त होते.

गंगोत्रीपासून निघालेली गंगा प्रवाहित होत असताना वाटेत शेकडो सौंदर्यस्थळे आली तरी तेथे न थांबता सागराकडे धावते तशी आपली बुद्धी संसारात इथे-तिथे न थांबता थेट आनंदसागराकडे झेपावली पाहिजे आणि आनंदघनसागराकडे जाण्याचा मार्ग, **"हरिमुखे म्हणा"**.

हरिपाठाच्या तेराव्या अभंगातील तिसऱ्या चरणात ज्ञानोबाराय म्हणतात, **"ऋद्धिसिद्धि निधी अवघीच उपाधी। जंव त्या परमानंदी मन नाही॥३॥"** परमात्मा प्रसन्न झाल्यावर भगवद्भक्ताला सर्व सिद्धी प्राप्त होतात. अगदी खरं पण केव्हा ??? तर **"व्युत्थाने सिद्धयः॥"** श्रीहरीपासून म्हणजेच या अभंगात सांगितलेल्या हरिसमाधीपासून व्युत्थान झाल्यावर आणि या साऱ्या सिद्धींचा वापर करताना-उपयोग करताना त्यावेळीही त्याचे भगवंताशी ऐक्य राहात नाही. देव-भक्तांच्या ऐक्यात अडथळाच येतो. श्रीहरी आणि भक्त यांच्यात अंतर पडते म्हणून या सिद्धींना संतांनी, भक्तांनी, भक्तिशास्त्रकारांनी **"समाधौ उपसर्गाः"** असे म्हटले आहे.

**ऋद्धि** म्हणजे आपल्यापाशी असलेल्या सर्व वस्तू-धनादिंची सातत्याने वाढ होणे. **सिद्धी** म्हणजे अप्राप्य वस्तू धन-द्रव्य-प्राप्त होणे आणि **निधी**

म्हणजे लाभलेला सर्व प्रकारचा अफाट ठेवा-संचय-संग्रह-साठा कधीच कमी न होणे. ऋद्धि या काम्य म्हणजेच सकाम कर्माने प्राप्त होतात, सिद्धी या तपाने प्राप्त होतात आणि यातून निधीत भर पडते पण या भक्तीप्रेमसुखात अंतर पाडतात-व्युत्यय आणतात. म्हणून श्री ज्ञानराजांसारखे महावैष्णव त्यांना उपाधि म्हणतात. या सगळ्यांच्यामुळे अहंकार वाढतो, लालसा वाढते, चित्ताचं समत्व ढळते, समाधान भंग पावते.

प्रेमलक्षणा भक्तीप्रेमामुळं जो हरिरुप झाला आहे किंबहुना "**चराचर आपण झाला**" अशा व्यापक समत्त्वाला जो प्राप्त झाला आहे अशा भगवद्भक्ताच्या ठिकाणी ऋद्धिसिद्धिंचा वास असतोच. श्रीतुकाराम महाराज म्हणतात, "**ऋद्धिसिद्धि द्वारी कर जोडोनि तिष्ठती।।**" भगवंताच्या इच्छेनंच त्या या महान वैष्णवाचं दास्यत्त्व करीत असतात. तो महावैष्णव त्यांना आपल्या भौतिक सुखासाठी कधीच राबवत नसतो. ज्ञानराजांनी रेडा बोलवला पण एकदाच, भिंतपण चालवली, चांगदेवांना उमज पडावा म्हणून आपणा भावंडांच्या प्रवासाचे सुलभ साधन म्हणून नाही.

नाथरायांच्या जीवनातला एक प्रसंग या निमित्ताने सांगतो. एकदा पैठणला नाथांना हरविण्यासाठी एक सिद्ध पुरुष आला. त्यानं सिद्धींचा वापर करून पैठणमध्ये अनेक चमत्कार केले. नाथमहाराज एक दिवस त्यांना भोजनाचं आमंत्रण द्यायला गेले, त्यानं सांगितलं, "मी सूर्योदयाबरोबर जेवत असतो व माझ्या पंक्तीला एक हजार वैदिक ब्राह्मण लागतात." नाथांनी अट कबूल केली, घरी आले. गिरिजाबाईंना सांगितलं. सायंआरतीच्यावेळी नाथांनी भगवंताची आळवणी-प्रार्थना केली. सूर्योदयाला नाथांच्या वाड्यात पाकसिद्धी झाली. एक हजार पानं मांडली गेली, यथासांग-साग्रसंगीत, मोठा थाट. इकडे काय झालं पाहा ना ??? हा सिद्ध पुरुष रोज पहाटे ऋद्धिसिद्धिंची पूजा करत असे. नेहमीप्रमाणे पूजेला बसला पण रोजच्याप्रमाणे पूजेतील उपचार स्वीकारण्यासाठी त्या आल्याच नाहीत. त्या गेल्या होत्या नाथांच्या वाड्यात, भगवंताच्या आज्ञेमुळे. हा गेला सूर्योदयाला नाथांच्या घरी. आश्चर्यानं थक्क झाला. नाथांना विचारलंन !!! आणि म्हणाला, "आज माझी पूजा

स्वीकारण्यासाठी आल्या नाहीत नेहमीप्रमाणं.'' नाथांनी सांगितलं, ''अहो, आज त्या तुमच्याकडं कशा येणार ??? ऋद्धि-सिद्धि ज्या लक्ष्मीच्या सखी आहेत अशा लक्ष्मीचा स्वामी ''**लक्ष्मीनाथ**'' त्याच्या आज्ञेनं त्या आज येथे आल्या हो.'' तो सिद्धपुरुष ??? उमगला. नाथांना अनन्य भावाने शरण गेला.

आलं का लक्षात ??? ज्ञानराज ऋद्धिसिद्धिंना उपाधि का म्हणतात. भागवतात खुद्द भगवान उद्धवाला सांगतात, ''**माझे प्राप्तीसी सर्वथा। सिद्धि सर्वथा बाधक॥ माझे स्वरुप शुद्ध अद्वैत। तेथ सिद्धींचे जे मनोरथ। लोकरंजन समस्त॥ नाही-नाही परमार्थ सिद्धीमाजी॥**'' नाथराय विचारताहेत, ''**ऋद्धिसिद्धि पिसे, कोण तया पुसे ?। नेले राजहंसे काय पाणी ?॥**''

हरिसमाधीत म्हणजेच स्वरुपसमाधीत प्राप्त होणारी आनंदस्वरुपता कुठं ??? आणि ऋद्धिसिद्धिंनी प्राप्त होणारा क्षयातिदोषांनी युक्त असणारा तुच्छ-लौकिक आनंद कुठं ??? कशी बरोबरी होणार ना. तुकाराम महाराज तर म्हणाले, ''**ऋद्धि सिद्धि आम्ही हाणितल्या लाथा।**'' काय मातब्बरी ना भक्तिप्रेमसुखाची ???

भक्तिप्रेमसुखानंद परमश्रेष्ठ. परमानंद म्हणजे ज्याच्यापेक्षा दुसरा कोणताही आनंद श्रेष्ठ नाही तोच परमानंद. भगवंत हाच परमानंदरुप आहे. त्याच्याशी एकरुप झालेले महावैष्णव **आनंदस्वरुपच**. ते अनुभवत असतात परमानंद आणि अशा वैष्णवांशी एकरुप झालेले पण आनंदस्वरुपच. यांच्या एकरसतेत प्राप्त होणाऱ्या आनंदापुढे जगातील कोणताही आनंद ''**आनंद**'' या संज्ञेला पात्र ठरत नाही.

म्हणून भक्तिप्रेमसुखाच्या-आनंदाच्या साम्राज्यात ऋद्धिसिद्धि कस्पटासमान. भगवंताचे नाम **अखंड** वाचेवर राहाणे हीच **महासिद्धि**.

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज हरिपाठाच्या या तेराव्या अभंगातील चौथ्या चरणात म्हणतात, ''**ज्ञानदेवा रम्य रमले समाधान। हरीचे चिंतन**

**सर्वकाळ॥४॥**'' भक्ताचार्य श्री नारद भक्तिसूत्रात सांगतात, ''**यत् प्राप्य न किंचित् वांछति, न शोचति, न द्वेष्टि। यत् लब्ध्वा पुयान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति॥**'' असं सर्व प्रकारे हरिनाम, नामजप, ध्यान, गुणलीला संकीर्तन करणे हे रम्य समाधान प्राप्त करून देणारे आहे.

''**रम्य**'' म्हणजे अत्यंत सुखप्रद. रमणे म्हणजे समाधान अखंडत्त्वाने स्थिर होणे. भगवत्नामस्मरणामुळे अशी समसुखात्मक समाधी प्राप्त होते आणि अशा या हरिसमाधीतसुद्धा श्रीहरीचे चिंतन अखंड चालूच असते. ज्ञानराज आपला अखंड नामस्मरणाचा अनुभव एका सुंदर अभंगात सांगतात, ''**ज्ञानदेवा घेतले दान। बाबा बाळछंदो॥ हृदयी धरोनिया ध्यान। बाब बाळ छंदो॥ समाधि बैसला निर्वाण। बाबा बाळछंदो॥ कथा किर्तन करीतु। बाबा बाळछंदो॥**'' श्री तुकोबाराय म्हणतात, ''**चित्त पावले आनंदा। सुख समाधीचे सदा। म्हणता गोविंदा। वेळोवेळां वाचेसि॥**'' आपले निळोबाराय तर सांगतात, ''**निळा म्हणे स्वरुपसिद्धि। सहज समाधी हरिनामे॥**''

आधी भगवंताचे नामस्मरण करावे, स्मरण नाही झाले तर निदान नाम जपावे व अशा हरिस्मरणाच्या योगाने अखंड समाधान म्हणजेच समाधिसुख किंवा भगवत्सुख/प्रेमसुख अनुभवावे. हे भक्तीप्रेमसुख हीच हरिसमाधि-स्वरुपसमाधि. भगवंत सर्वांतर्यामी आहे, देव सबाह्य कोंदून-कोंदून भरला आहे. क्षर आणि अक्षर या दोहोतही एका श्रीहरी वाचून कोणी नाही. अशी अखंड भावना सातत्याने जागृत असणे हेच नामस्मरण. पण भावनेलाही अधिष्ठान लागते. ते अधिष्ठान सगुण असावे लागते. असे अधिष्ठान म्हणजे भगवंताचे सगुण-साकार रुप-अरुप. अशा परब्रह्माला रुप देऊन, निराकाराला आकार देऊन, वर्णरहिताला सावळा रंग देऊन आणि अनामाला नाम देऊन आणि या नामरुपाचा अखंड एकरस मेळ बाळगून वाणीला नामाचा छंद आणि चित्तात भगवंताचे नामाचे स्मरण हेच नामस्मरणाचे शुद्ध स्वरुप आहे.

अशा नामस्मरणाने नाम गाता गाता व मनाशी गुणगुणत असताना चित्तावरील विकास-विकारांचे संस्कार हळूहळू नाहीसे होतात आणि मग चित्त भगवत्‌स्वरुपाच्या ठिकाणी जडत असते.

सगळे वेद, शास्त्रे, पुराणे, संतमहात्मे हे सांगतात की, ''प्रपंच म्हटल्यावर प्रपंचाची कामे चालतातच आणि ती चालणारच ना !!! कामे टाकायची नाहीत, टाकून चालणार नाही आणि ''टाका'' असं सांगितलेही नाही. पण ती कामे चालली असताना आनंदकंदाला/भगवंताला एवढंही विसरता कामा नये.'' उपासना शब्द आपला तोंडपाठ आहे पण ही उपासना म्हणजे काय ? हेच आपल्या गांवीच नसते. उपासना म्हणजे हरिसान्निध्य. उपास्य देवतेच्या चरणकमली किंवा स्वरुपाच्या ठिकाणी वृत्तीचा लय होऊन ''मी''पणा विसरला म्हणजे मग संसारातील कोणचीही कामे करत असताना ती बाधक होत नाहीत. आपण त्यात अडकत नाही. ''हरिमुखे'' म्हणण्याने ही चित्ताची बैठक साधते.

मात्र सत्‌सहवासाशिवाय नामाची ओळख पटत नाही आणि नामाच्या मधुरतम माधुर्याचा रसही **चाखता** येत नाही, त्यातले **मर्म** कळत नाही. भगवंताला आपलासा करण्याचा, आनंदकंदाला आकळावयाचा मार्ग म्हणजे त्याच्या नामाचे स्मरण. त्या आनंदनिधानावर निरतिशय प्रेम असावे व त्या प्रेमभरात चित्त अहोरात्र मीनासारखे तरळत असावे. त्या **चिदानंदाला** कधीच अंतरु नये. श्री तुकोबारायांनी पापाची व्याख्या काय केली आहे पहा, **''देव अंतरे ते पाप।''** नामाने पापे बारा वाटा पळ काढतात.

नामस्मरणाबद्दल नामधारकाची आस्था जेवढी वृद्धिंगत होईल तेवढं भक्तिप्रेमसुख वाढते वाढते असते. प्रत्येक नामाबरोबर आत्माराम/आनंदराम अंतरंगात अधिकाधिक स्फुरु लागतो. **''नाम मनी आठवावे। अखंड स्मरावे। रुप मनी आठवावे॥''** असं समर्थच सांगतात.

नामधारकांनी **''नामकीर्ति''**स परवलीचा शब्द आपल्या हृत्पटलावर सुवर्णाक्षरांनी कोरुन ठेवावा. नामाच्या स्मरणाने नामी जो भगवंत त्याच्याशी

जीव तद्रूप होतो. राम म्हणता "**रामचि होईजे। पदी बैसोनि पदवी घेईजे।। ऐसे सुख वचनी आहे। विश्वासे अनुभवे पाहे।।**" अशी तुकोबारायांची ग्वाही आहे. सगुण आणि निर्गुण या मधला "**नाम**" हा उत्तम साथी आहे, दुवा आहे. दोन्ही स्वरुपाचे अनुभवजन्य ज्ञान करून देणारा "**नाम**" हा जीव व शिव यामधला दुभाषी आहे. अंतर्बाह्य प्रकाश टाकणारा हा नामदीप वाचारुप उंबऱ्यावर ठेवावा व हरिसमाधीत रम्य समाधान अनुभवतां रमून जावे.



भगवान श्रीकृष्ण भागवतात उद्धवाला सांगताहेत, **"करिता माझी कथा श्रवण। काळासी रिगमू नाही जाण। इतरांचा पाडू कोण ?। कर्मबंधन तेथ कैचे ?॥ जो हरिकथेने गेला क्षण। तो काळासी नव्हे प्राशन। काळ सार्थक त्या नाव जाण। जे श्रद्धा श्रवण हरिकथा॥"**

नाथमहाराज म्हणतात, **"कळिकाळा नाही बळ। नाम जपे तो सबळ। हरिचिया दासा साचे। नाही भय कळिकाळाचे॥"** ज्ञानराज एका अभंगात म्हणताहेत, **"शरीर आटे, संपत्ति आटे। हरिनाम नाटे, ते बरवे॥"** नामस्मरणाच्या जोरावर/बळावर आपण कराल काळास कसे काय जिंकले हे श्री तुकोबाराय एका ठिकाणी सांगताहेत, **"भावशुद्ध नामावळी। हर्षे नाचो पिटो टाळी। घालू पायातळी। कळिकाळ बापुडे।" "तुका म्हणे येणे। कळिकाळ हे ठेंगणे॥" "तुका म्हणजे आम्ही जिंकोनिया काळ। बैसलो निश्चल होऊनिया॥"**

नामनिष्ठ भक्तांकरिता भगवंतच कळिकाळाचा पाडाव/पराभव करून नामधारकाचे काळापासून रक्षण करतो. **"न मे भक्तः प्रणश्यति।"** हे तर भगवंताचेच ब्रीदवाक्य आहे. भगवान परमात्मा नामधारकांना या काळाच्या तडाख्यातून अलगद सोडवितो.

श्रीहरीच्या कृपेने जीव या कळिकाळातून मुक्त होतो ही श्रीहरीची कृपा **नामधारक,** गुरुनिष्ठ भक्तावरच होते. श्री तुकाराम महाराज म्हणतात, **"सदा वाचे नामावळी। महा दोषां होय होळी। कळिकाळ पायातळी। ब्रह्मानंद दे गर्जता॥"**

कळिकाळ हा सर्व युगांत, सर्व दोषास्पद काळात अत्यंत दोषाचा काळ मानला जातो. अशा घोर दोषास्पद काळात-कलियुगांत मनुष्य दोषमुक्त राहू शकत नाही. पण अखंड नामधारक अशा घोर कलियुगांतही पापनिर्मुक्त राहू शकतो. फक्त नामाच्या बळावर.

मग कळिकाळ काय बापडा नामधारकाकडे वाकडा डोळा करून पहाणार

का ??? अहो, भुवईसुद्धा वक्र करण्याची त्या काळाची हिंमत नाही पण आपण नाम मात्र सोडता कामा नये !!!

हरिपाठाच्या चौदाव्या अभंगातील दुसऱ्या चरणी ज्ञानराज म्हणतात, "**रामकृष्ण उच्चार अनंत राशी तप। पापाचे कळप पळती पुढे॥२॥**"

कडव्यातील पहिल्या चरणाचे छान दोन अर्थ होतात. १) पुण्यरुप तपाच्या अनंत राशी आपल्या गाठी असतील तरच वाणीने "रामकृष्ण" नाम उच्चारले जाईल कीं जे नाम वाचेवर येण्यासाठी "**जे जन्मसहस्त्री वोळगिजे। एकवेळ यावया॥**" किंवा "**येन जन्मशतैः पूर्व, वासुदेवः समर्चितः। तन्मुखे हरिनामानि सदा तिष्ठन्ति भारत॥**" नामदेवराय पण असेच सांगतात, "**अनंत पुण्यराशी घडे ज्या प्राण्यासी। तरीच मुखासी नाम येत॥**"

दुसरा अर्थ आहे, हरिनामाच्या अखंड उच्चाराने अनंत राशी तप केल्याचे पुण्य प्राप्त होते. नामजप एकनिष्ठेने, सातत्याने दीर्घकाळ करणे हे फार मोठे तप आहे. क्षणाचाही खंड न पडता नामजप होणे यापेक्षा मोठे अन्य तप कोणते ??? तर कोणतेच नाही. निवृत्तिनाथ म्हणतात, "**निवृत्ति म्हणे हेचि सार तप। जप करा अमूप निरंतर॥**" नाथमहाराजांनी तपाची व्याख्या केली आहे, "**अनिमिष नामस्मरण। ते तप उग्र दारुण। नामापरते निजसाधन। सर्वथा आन असेना॥**" म्हणून "**सकळ तपांचे ते तप। सोपा नाममंत्र जप॥**" ब्रह्मवैवर्त पुराणात ब्रह्मदेव नारदाला म्हणाले, "**अंतर्बाह्यो हरिर्यस्य, तस्य किं तपसासुत। नांतर्बाह्यो हरिर्यस्य तस्य किं तपसा वृथा॥**" ज्याच्या आतबाहेर एक हरीच आहे त्याला वेगळे तप करण्याची आवश्यकता काय ? पण ज्याच्या आतबाहेर हरीच नाही त्याने इतर कितीही तप आचरले तरी ते व्यर्थ नाही काय ???

या नामस्मरणाच्या तपामुळे पापच काय पण पापाचे अधिष्ठानही नष्ट होते. "**पापे पळाली बापुडी। काळ झाला देशोधडी॥**" श्री एकनाथ महाराजांनी निर्वाळा दिला, "**नामाग्नीने न जळे। ऐसे पाप कोणी नाही**

**केले। वाल्मीके बहुत पाप केले। परी नाही उरले नामयोगे॥''** शरीर, वाचिक, मानसिक पापांपैकी एकही पाप असे नाही के जे कलियुगात केवळ नामसंकीर्तनाने नष्ट झाले नाही. हरिपाठाच्या शेवटी आपण श्री तुकोबारायांचा एक अभंग म्हणतो, त्यातील पहिले चरणच बघा, **''नामसंकीर्तन साधन पै सोपे। जळतील पापे जन्मांतरीची॥''** ज्ञानराज नवव्या अध्यायात सांगतात, **''कीर्तनाचेनी नटनाचे। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे। जे नामचि नाही पापाचे। ऐसे केले॥''** भागवतात नाथमहाराज म्हणाले, **''कृष्णकीर्ती कथनाक्षरे। रिगताचि कर्णद्वारे। भीतरील पाप एकसरे। निघे बाहिरे। गजबजोनि॥''** म्हणून नामसाधनेला सर्व संतांनी महत्त्व दिले आहे.

श्री तुकोबारायांचा एक अभंगत सांगतो, **''हेचि माझे तप, हेचि माझे दान। हेचि अनुष्ठान, नाम तुझे॥१॥ हेचि माझे तीर्थ, हेचि माझे व्रत। हेचि सत्य, हे सुकृत नाम तुझे॥२॥ हाचि माझा धर्म, हेचि माझे कर्म। हाचि नित्य नेम, नाम तुझे॥३॥ हाचि माझा आचार, हाचि माझा विचार। हा माझा निर्धार, नाम तुझे॥४॥ तुका म्हणे दुजे, सांगायासी नाही। नामेविण काही धनवित्ता॥५॥''**

अभंगातील पुढील चरणात ज्ञानराज म्हणतात, **''हरि, हरि, हरि मंत्र हा शिवाचा। म्हणती जे वाचा तया मोक्ष॥३॥''** भगवंताचे नाम हाच **महामंत्र** आहे. याला सामान्य समजू नये. भगवान शिवशंकर नाममंत्राचाच जप सतत करतात.

भावार्थ रामायणात शंकरांना नाम किती प्रिय आहे याचे फार सुंदर वर्णन आहे. ''ज्याचे प्राण जाऊ पाहात आहेत अशा जीवांच्या कानामध्ये तारक भगवन्नामाचा उपदेश करत, काशी नगरीत जटाधारी शंकर सारखा हिंडत असतो आणि हिंडताना श्रुतींनी वर्णिलेले नामामृत कंठाने सतत प्राशन करत असतो.''

पद्मपुराणात पार्वतीमातेने शंकरांना विचारले, ''आपण नित्य कोणता जप

करता ?'' शंकर म्हणाले, अगं ''भगवत्‌नामाचा''. ''**आदिनाथा कंठी आगळा हा मंत्र। आवडीचे नाम सदा घोकी॥**'' काय नामाची महत्तम किर्ति ???

''**म्हणति जे वाचा तया मोक्ष।**'' हरिनामाचा अखंड जप करणाऱ्यांना मोक्ष प्राप्त होतो असा श्री ज्ञानराजांचा निर्वाळा आहे. ''मोक्ष'' म्हणजे मुक्तता. जीव हा मूळचा मुक्त असून अनादि, अज्ञास वश होऊन त्यामुळे संकल्प, वासना, संस्कार इत्यादि अनेक पाशांनी बद्ध झालेला आहे. भावार्थ रामायणात श्रीनाथरायांनी सात प्रकारचे पाश सांगितले आहेत.

१) काळपाश - आयुष्यघात, २) कर्मपाश - कर्मबद्धता, ३) धर्मपाश - वर्णाश्रमधर्मानुसार, ४) ब्रह्मपाश - वेदविदितार्थता, ५) मायापाश - मायेचे सत्यत्व, ६) मोहपाश - देहममता आणि ७) जन्मपाश - वासना असं या पाशांचं स्थूल रुपांनी वर्णन केले आहे.

पुढं नाथांनी मारुती रायांचे नमुनेदार उदाहरण सांगितले आहे. हनुमंतराय कशाने मुक्त झाले ? ''**सातपाशांची निवृत्ति। रामनामे करी मारुती। येरांच्या न चलती युक्ती। पडती मागुनी देहपाशी॥**'' तात्पर्य काय तर या सर्व पाशातून एका भगवत्‌नामाने व भगवद्‌कृपेने मुक्तता लाभते. ज्ञानराज माऊलींचे श्रीगुरु निवृत्तिनाथ म्हणतात, ''**निवृत्तीचा तट भजन अविनाश। भजनेचि पाश तुटती रया॥ न लगती सायास, करणे उपवास। नाममंत्रे पाश तुटे जना॥**''

''**हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा**'' याचा आणखी एक अर्थ आता चिंतन करत असताना माऊलीच्या कृपेने स्फुरला !!! ''शिवाचा'' म्हणजे मंगलमय जी वाचा ''**हरि**'' मंत्र ''**मंगलमय**'' जपते ''**तया मोक्ष.**'' तसे बरेचजण ''**हरि**'' नामजप करीत असतात (म्हणजे माळा ओढत असतात) पण सर्वांनाच मोक्षप्राप्ती झालेली दिसून येत नाही. कारण मंगलमयता नाही. अमंगल म्हणजे नामापराध. नामस्मरण करताना नामाचे दहा अपराध होता कामा नयेत. नामऔषधी घ्यावयाची तर पथ्ये सांभाळावयास हवीत.

तुकोबाराय म्हणतात, **"जेणे विठ्ठल मात्रा घ्यावी। तेणे पथ्ये सांभाळावी॥"** पथ्ये सांभाळली नाहीत तर मग औषधाचा काय उपयोग ना ???

असे अपराध घडणं म्हणजेच अमंगलता आणि अपराध न घडणं म्हणजेच मंगलमयता. आताहे अपराध कोणते ??? तर १) साधु-संत निंदा, २) अश्रद्धाला नाम वैभव-महिमा सांगणे, ३) शिव व विष्णु या देवतात भेद पाहणे, ४) वेदवचनावर अविश्वास, ५) शास्त्रवचनावर अविश्वास, ६) गुरुवचनावर अविश्वास, ७) नाममाहात्म्य हा अर्थवाद म्हणजे केवळ पोकळ स्तुतीरुप आहे, खरे नाही असा भ्रम, ८) नामाच्या बळावर दुराचरण, ९) परधर्माचे आचरण आणि १०) शिव-विष्णु यांच्या नामांशी इंद्रादि देवतांच्या ??? नामाचे साम्य पहाणे. **"नामाचे दहा अपराध। ते न करोनि नाम घेता शुद्ध। तरी तत्काळ तरे प्रसिद्ध। येथ संशयो नाही॥"**

या अभंगातील शेवटच्या चरणांत ज्ञानदेव म्हणतात, **"ज्ञानदेवा पाठ नारायण नाम। पाविजे उत्तम निजस्थान॥४॥"** नारायण नामाच्या/ भगवद्नामाच्या पाठाची फलश्रुती काय ? तर उत्तम निजस्थान प्राप्त होणे. निजस्थान म्हणजे भगवंताचे नित्य निवासस्थान म्हणजेच वैकुंठ, म्हणजे आनंदाची परिसीमा, ती उत्तमच म्हणजे परिपूर्ण ज्ञानाचे, तृप्तीचे, सुखाचे, शांतीचे, आनंदाचे माहेरघर. निजस्थान याचा गुह्य अर्थ आहे, निजस्वरुप-आत्मस्वरुप.

उत्तम म्हणजे उत् + तम. तम म्हणजे अंधकार, कसला अंधार ? तर अज्ञानाचा. त्याच्या अतीत म्हणजे स्वयंप्रकाश आनंदात आनंद होऊन राहणे. म्हणजेच दु:खाची अत्यंतिक निवृत्ती आणि परमानंदाची प्राप्ती.

हे स्थान म्हणजे एखादा जागेचा, भूखंडाचा तुकडा नाही तर स्थान म्हणजे स्थिती. "उत्तम" या शब्दाचा आणखी एक अर्थ आहे उत् + तम = त्रिगुण. भगवंत गुणातीत आहे. नामधारक हा पण नामाने त्रिगुणातीत होतो, स्वरुपाकार होतो, आनंदाकार होतो, समरस होतो. स्वर्गादिक स्थाने ही

तमरहित नाहीत म्हणून तर ती शाश्वत नाहीत. पुनरावर्तनशील **(क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति)** म्हणून ती निजस्थानेपण नाहीत.

श्रीमद्‌भागवताच्या तिसऱ्या स्कंधात कपिल महामुनी मातेला उपदेश करत असताना नामधारकांस हे स्थान निजस्थान कसे प्राप्त होते ते सांगतात. त्याचे सार, ''**नारायणी वसले घर। निरंतर आनंदु॥**''

सार काय नामच आनंद, नामच मोक्ष, नामच वैकुंठ !!! नामच निजस्थान.



# अभंग क्र. १५

**एक नाम हरी द्वैत नाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे॥१॥**
**समबुद्धी घेता, समान श्रीहरि। शम दमा वरी हरी झाला॥२॥**
**सर्वा घटी राम, देहादेही एक। सूर्य प्रकाशक सहस्त्र-रश्मी॥३॥**
**ज्ञानदेवा चित्ती हरिपाठ नेमा। मागिलिया जन्मा मुक्त झालो॥४॥**

या अभंगात ज्ञानेश्वर महाराजांनी नाम व नामी यांचा मुलभूत असणारा अभेद सांगितला आहे. या सर्व दृष्य विश्वामध्ये एक फक्त श्रीहरीच व्याप्त असल्यामुळे त्याचेच **नाम** श्रेष्ठ आहे. द्वैतनाम म्हणजे एका हरीव्यतिरिक्त जी जी द्वैतनामे आहेत (की ज्या नामांचा नामीशी भेद आहे-द्वैत आहे) ती सगळी नामे दूर सारा. द्वैत म्हणजे प्रपंच. वेदान्ताने द्वैतालाच प्रपंच म्हटले आहे. परमात्मा व हे जगत एकमेकापासून भिन्न-भिन्न आहेत या कल्पनेतून (भ्रामक कल्पनेतूनच) हा प्रपंच म्हणजे द्वैतभाव व त्यातील सर्व दु:खाचा उगम झालेला आहे. ही सुख-दु:खे देहाला आहेत, आत्मारामाला नाहीत अशी ज्यांची श्रद्धा-भावना आहे त्यांना प्रपंच स्पर्शही करू शकत नाही. पण त्यासाठी सर्व प्रपंचाचा म्हणजे **द्वैताचा** (द्वैतबुद्धीचा) त्याग करून सर्व प्रपंचाकडे पाहणेचे कौशल्य साधावयास हवे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अशी अद्वैताची कुसरी म्हणजेच कौशल्य जाणणारे फार विरळ/थोडे. ही अद्वैतकुसरी साधणं म्हणजे भक्ती व ज्ञान यांची पराकाष्ठा आहे.

गीतेने ही कुशलता सांगितली, "**वासुदेव: सर्वमिति, स महात्मा सुदुर्लभ:।**" ज्ञानोबाराय म्हणतात, "**हे समस्त श्री वासुदेवो**" अशी ज्याची अखंड अनुभूती तोच श्रेष्ठ भक्त-श्रेष्ठ ज्ञानी. द्वैत म्हणजे जीव व जगत् ईश्वरापासून सर्वस्वी भिन्न आहे असेच मानणे. मनुष्याचा सामान्य व्यवहार हा साधारणत: याच भेदभावनेने-द्वैतभावनेने चालतो. या उलट जीव-जगत् व जगदीश यांची अभेदता-अद्वैत, म्हणजे एकच अंतिम सत्ता मानणे,

नाही नाही अनुभवणे हे अद्वैत. एका आनंदापासून हे अनंत विश्व झाले व या कार्यकारणाचा अभेद आहे. एका भगवंतावाचून ह्या अखिल ब्रह्मांडात भिन्न काहीच नाही असा अनुभव हेच अद्वैत. श्री तुकोबाराय म्हणाले, **"ऐसा ज्याचा अनुभव। विश्व देव सत्यत्वे॥"**

ही सर्व ब्रह्मांडरचना (म्हणजेच भगवंताची लीला) म्हणजेच एकमेवाद्वितीय परमात्मसत्तेचा/महासत्तेचा "चिद्विलास" आहे अशी अद्वैतानुभवाची ठाम भूमिका आहे. भगवान् गीतेत म्हणतात, अर्जुना !!! **"मत: परतर: न अन्यत् किंचित अस्ति।"** धनंजया, या ब्रह्मांडात एक माझ्याशिवाय-पलीकडे अन्य किंचितसुद्धा काही नाही. जीवेश्वराचा हा अभेद प्रत्यय (अनुभव) प्रत्येक श्रेष्ठ ज्ञानी आणि भक्त अशा श्रेष्ठ वैष्णवाला मिळत असतो. तुकाराम महाराज आपला प्रत्यय पुढील चरणात सांगतात, **"भेद तुटलिया वरि। आम्ही तुमचेच वो हरि॥"**

हरिपाठाच्या (म्हणजे हरिस्मरणाच्या) चिंतनाने, नामस्मरणाने हा अद्वैताचा अनुभव प्राप्त करून घेता येतो. **नामसाधना** ही जीवनातील सर्व स्तरावर द्वैतभावातून अद्वैतभावाकडे नेणारी आहे. अद्वैताच्या मुक्कामी नेणारा **नामस्मरण** एकमेव राजमार्ग आहे. **"एक नाम हरी"** म्हणजे नाम आणि हरी एकच आहेत. द्वैतात तसं नसतं. नाम आणि नामी म्हणजेच आध्यात्माच्या परिभाषेत वाच्य व वाचक यात द्वैत राहतेच. ते एक नसतात.

सृष्टीतील इतर नावांप्रमाणे हरिनाम द्वैताचा बोध करून देत नाही तर बाध करणारे आहे आणि नुसतं बाध करूनच थांबत नाही तर ते नामस्मरण करणाऱ्या भक्ताला अद्वैतरुप हरीचाच/श्रीगुरुचा अद्वैतस्वरुप बोध करून देते. पण हे अद्वैत वर्म (कुसरी) विरळाच. स्थूलपणाने भक्त हा वेगळा वाटला तरी तो श्रीगुरु-श्रीहरीशी एकतत्त्व-एकरुपच असतो.

लौकिक कलांमध्ये प्राविण्य मिळवण्याससुद्धा अनेक वर्षे (तप म्हणजे १२ वर्षे) तरी निष्ठेने परिश्रम करावे लागतात. सर्वांगाने झोकून द्यावे लागते. मग हरिप्राप्ती ही केवढी श्रेष्ठतम कुसरी (कळा) आहे बघा बरं. ही कळा

अत्यंत श्रेष्ठ तर आहेच पण ती मोठी रमणीय आहे. सर्व शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण यांचे सर्व व्यवहार "**एकरस-समरस-एकरुप**" भावनेने व्हावयास हवेत म्हणजे ही तादात्म्य तेही सर्वांगाने पावण्याची अद्वैत कुसरी लाभते. हे सर्व व्यवहार अत्यंत पवित्रच असतात.

देहाने (स्थूलपणाने) भक्त/शिल्प वेगळे वाटले तरी ते श्रीहरीशी/ श्रीगुरुंशी एकरुप-एकतत्त्व झालेले असतात. असं एकरुप समरस झालं तरच भक्त/शिष्य. भगवान अर्जुनाला सांगताहेत, "**ते देही ना, माझ्या ठायी। आणि मी त्यांच्या(च) हृदयी। समग्र असे॥**" लौकिक कलांमध्ये प्राविण्य मिळविण्याससुद्धा अनेक वर्षे निष्ठेने परिश्रम करावे लागतात. ज्ञानराज म्हणतात, "**हरिप्राप्ती**" ही सुद्धा "कुसरी" (कळा) आहे. ही कळा सर्व कलांमध्ये अत्यंत श्रेष्ठ व रमणीय आहे. मात्र ती अद्वैतकुसरी संपादन करण्यासाठी केवळ शारीरिक श्रम पुरेसे होतात असं नाही तर त्याचबरोबर सर्व इंद्रिये, मन, प्राण, बुद्धी यांचे सर्व व्यवहार हरिभावनेने/ श्रीगुरुसेवा भावनेने प्रेरित होऊन व्हावे लागतात. तरच हरितादात्म्य/ गुरुतादात्म्य पावण्याची अद्वैत कुसरी साधते.

श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**एक नाम हरि, द्वैत नाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे॥**" मुळात द्वैत हे जीवाच्या कल्पनेचाच परिणाम आहे. वेदान्त-शास्त्रात सृष्टीचे जीवसृष्टी व ईशसृष्टी असे दोन प्रकार सांगितले आहेत. उदा. ईशकृत सृष्टी म्हणजे पंचभौतिक सृष्टी आणि जीवकृत सृष्टी म्हणजे त्या ईषकृतावर जीवाने केलेली कल्पना. उदा. देह-पती, पुत्र, बंधू त्या सर्वात अनुस्यूत असलेला देह भेदास पावत नाही. त्या देहास अनेकजण अनेक नामे देतात. पण तरीही त्या देहातील एकत्त्वाला बाधा येत नाही. मांस-अस्थि-रक्तमय देह एकच आहे. पण मनोमय द्वैत जीवकल्पनेमुळे व्यवहार द्वैतात्मक होतो. सर्वच जीव या कल्पनेने बद्ध झाल्यामुळे द्वैताच्या बंधनात पडले आहेत. भेददृष्टी मावळल्याशिवाय अद्वैत भावना उदयाला येत नाही. तुकाराम महाराज म्हणतात, "**कल्पना अविद्या येणे झाला जीव। मायोपाधि शिव बोलिजेती॥**" सद्गुरु कृपा होऊन "महावाक्यबोध"

झाल्याने अथवा भगवत्कृपेने ही भेदबुद्धी नष्ट होते व जीवाला अद्वैत कुसरी प्राप्त होते पण विरळाच. "**चालो जाणे वाट, ऐसा विरळा एखादा।।**"

स्वामी रामतीर्थ अमेरिकेहून परत आल्यावर, उत्तर प्रदेशात टेहरी-गढवालला राहिले होते. तिथे त्यांची पत्नी भेटायला आली. रामतीर्थांनी खिडकीतून पाहिले, खिडकी-दार बंद करून घेतले. त्यांच्या श्रेष्ठ साधक मित्राने त्यांना विचारले, पूर्णसिंह त्याचे नाव. "आजवर कोणी स्त्री भेटायला आली असताना दार बंद करून घेतले नव्हतेस. मग आत्ताच असे का ???" रामतीर्थ म्हणाले, "ती माझी पत्नी होती." त्यावर पूर्णसिंह म्हणाले, तू तिला अजूनही "पत्नी"च समजतोस !!! अजून एक पंचरचित स्त्री समजत नाहीस. अजून कल्पनेच्या खोड्यातच आहेस मग. अद्वयभावावर कधी आरुढ होणार. भेदभाव केव्हा मावळणार. सगळेच देह पंचभूताचे कार्य, ईशसृष्टी, त्यांच्यावर आपण केलेल्या कल्पना, जीवसृष्टी अशी अद्वैतकुसरी विरळा.

पुढील चरणात ज्ञानराज म्हणताहेत, "**समबुद्धी घेता समान श्रीहरी।**" समबुद्धीने घेता म्हणजेच स्वीकार करता श्रीहरी समान आहे. (म्हणजेच काय तर या श्रीहरीच्या समान प्राप्तीकरिता समबुद्धीची अपेक्षा आहे.) समबुद्धी म्हणजे "**रागद्वेषरहित**" ब्रह्मबुद्धी. भगवान् गीतेत सांगताहेत, "**समोऽहं सर्वभूतेषु, न मे द्वेषोस्ति नप्रिय:।।**" ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**तो मी पुससी कैसा। जो सर्वभूती सदा सरिसा। जेथे आपपर ऐसा। भागु नाही।।**"

श्रीहरी जर सम आहे, तरी त्याची प्रतीती का येत नाही ??? त्याचे कारण असे की बुद्धी विषयदोषांनी आवृत्त असल्यामुळे त्याच्या समत्त्वाची प्रतीती येत नाही. जसा प्रकाश एकच पण वेगळ्या वेगळ्या रंगाच्या काचांतून आल्यामुळे वेगवेगळ्या रंगाचा भासतो.

ज्यावेळी बुद्धी ज्ञानयुक्त होईल त्याचवेळी तिला समत्त्व प्राप्त होईल व मगच अशा समत्त्व बुद्धीने श्रीहरीच्या समत्त्वाचा प्रत्यय येईल.

एक गोष्ट सांगतो, एका गावात दोन माणसांत भांडण लागले. ते

सोडवण्यासाठी त्यांनी सूर्याला लवाद नेमला. एकजण सूर्याला म्हणाला, याने माझ्या शेतातील भोपळे महिन्यापूर्वी चोरले. सूर्याने विचारले, ''महिना म्हणजे काय ?'' हा म्हणाला, ''सकाळपासून सायंकाळपर्यंत.'' यावर सूर्याने परत विचारले, ''सकाळ व सायंकाळ म्हणजे काय ?'' यावर हा म्हणाला, आपण उगवता ती सकाळ आणि मावळता ती संध्याकाळ. सूर्य म्हणाला, मी सदैव प्रकाशमानच आहे. उदय आणि अस्त मला नाहीच.

वरच्या गोष्टीप्रमाणे आत्मस्वरुपाच्या लेखी-गावी भेद नाहीच. **स्वरुप** नित्य आहे. त्याच्या ठिकाणी भेदच नाही. जीवाने केलेल्या कल्पनेत भेद आहे. हा कल्पनेचा भेद **''नामाने''** मावळतो.

हरिनामस्मरणाने भेद तो कसा उरतच नाही. माऊली ज्ञानोबाराय म्हणतात, **''एथ भेद तरी कां देखावा ?। जरी अहंभाव उरला होआवा। तो आधीची नाही आघवा। आता विषम काई ?॥ म्हणोनि सर्वत्र सदा सम। ते आपणचि अद्वैत ब्रह्म। हे संपूर्ण जाणे वर्म। समदृष्टीचे॥''** समत्त्व बुद्धी म्हणजे सर्वांच्या ठिकाणी समरुपाने असणाऱ्या एका श्रीहरीला पाहणे. सर्वांना सारखे पाहणे नव्हे. कारण औपाधिकदृष्टीने सर्वसृष्टी विषमच आहे. उपहित म्हणजे त्यातील श्रीहरी एक आहे. उपाधीमुळे ती समत्त्व दृष्टीस योग्य नाही. उपाधीत समता नाही. असूच शकत नाही. पण बुद्धीतील विषमतेमुळे श्रीहरी विषम वाटतो आणि उपाधि सम वाटते !!! हाच मायेचा प्रभाव.

बुद्धीतील हा विषमतेचा दोष निवृत्त होऊन ती समत्त्व दशेस येण्याकरिता शम-दम आदि साधनांची अपेक्षा असते. सर्वेंद्रियांच्या वृत्ति आपल्या हातात घेऊन बुद्धी आत्मारामाला एकांतात मिळणं म्हणजे शम. जशी प्रिया-प्रियकराला एकांतात मिळते. काय श्रीगुरु ज्ञानराजांचा मार्मिक बिनतोड दाखला आहे ना ??? अशा बुद्धीच्या उपरमाला शम असे म्हणतात. शांत वृत्तीचे साधक शमानेच सर्व साधनमार्गांचे आचरण करतात. मुनी शमानेच श्रेष्ठ अशा परमपदाला प्राप्त होतात. शम प्राप्त होणे अशक्य नाही पण कठीण आहे. शम या साधनाकरिता दम या साधनाची अपेक्षा आहे. दम या एका साधनानेच साधक पाप धुवून टाकतात. दम हे श्रेष्ठ साधन आहे.

या अभंगाच्या दुसऱ्या चरणातील उत्तरार्धात सांगत आहेत, **"शम दमावरी हरी झाला।"** नामस्मरण हे एक असे अमोघ साधन आहे की ते "शम-दम" साधतेच. पण त्याबरोबरच श्रीहरीची अद्वैत कुसरी प्राप्त करून देते. ज्ञानराजांनी नामाचे महत्त्व सांगताना नवव्या अध्यायातील **"सततम् कीर्तयन्तो माम्"** या श्लोकावरील व्याख्यानात बहार केली आहे. **"यम-दमा" अवकळा आणिली; यमु म्हणे काय यमावे ? दमु म्हणे कवणाते दमावे ?** वगैरे वगैरे. थोडक्यात काय एका नामस्मरणात सगळ्या साधनांचा अंतर्भाव आहे.

या अभंगाच्या पुढील तिसऱ्या चरणात श्रीहरी सर्वत्र कसा समान आहे हे छान दृष्टांत देऊन सांगतात, **"सर्वांघटी राम, देहादेही एक। सूर्यप्रकाशक सहस्त्ररश्मी।।"** घट म्हणजे देह. हे देह जरी अनेक आहेत तरी त्या सर्वांमधील राम म्हणजे **आत्माराम** एकच-एक आहे. सूर्याची किरणे हजारो-लक्षावधी. ती जरी कोट्यावधी असली तर प्रकाशक सूर्य एकच आहे तसेच हे आहे. परमात्मा सर्व भूतमात्रांत सदा-सर्वकाळ समत्त्वाने ओतप्रोत भरलेला आहे. **"समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वर।"**

घट अनेक, त्याचे आकारमान वेगळे, लहान-मोठे, मातीचे, पत्र्याचे, पितळ्याचे, तांब्याचे, चांदीचे, एखादा सुवर्णाचासुद्धा असू शकतो नां. पण असेनात !!! आणि असणारच नां !!! पण त्यातील जलतत्त्व (पाणी) **एकच**.

आत्मारामाचे सर्वांतर्यामित्व, समत्व, व्यापकत्व, प्रतीतीला येणे हेच जीवाच्या परम कल्याणाचे महत्त्वाचे साधन आहे. सूर्याच्या दृष्टांताने ज्ञानराजांनी आत्म्याचे केवळ व्यापकत्त्वच सुचविलेले नाही तर त्याचे प्रकाशकत्त्वही सूचित केले आहे. आपली ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, मन, बुद्धी आदींना आपण प्रकाशक म्हणतो. कारण त्यांच्याच माध्यमातून आपल्याला ज्ञान हाते. पण गंमत ही आहे की ही सगळी मंडळी परप्रकाशितच आहेत. एका आत्मप्रकाशानेच ही सर्वजण प्रकाशित होतात, झालेली आहेत.

श्रीहरी हा स्वयंप्रकाश-स्वसंवेद्य आहे. आपल्या अखंड चित्प्रकाशाने

अन्य सगळ्या जड वस्तूंचे तो प्रकाशन करतो. त्यांना **तो** प्रकाशित करत असतो. अनंत अशा चिद्वृत्ति याच ईश्वरस्वरुप आत्मसूर्याची किरणे आहेत. किरणे अनेक, पण सूर्य एकच. ज्ञानदेव सांगताहेत, **''सर्व भूतांच्या अंतरी। हृदय महाअंबरी। चिद्वृत्तीच्या सहस्त्रकरी। उदैला असे जो।।''** म्हणून त्या भगवंताचीच एक स्वसंवेद्य, स्वयंप्रकाश अद्वैत सत्ता असल्यामुळे आपले **स्वतंत्र अस्तित्व** न मानता, श्रीहरीशी/श्रीगुरुशी एकरुप होऊन **नामस्मरण** केले पाहिजे.

हरिपाठातील या पंधराव्या अभंगातील शेवटच्या चौथ्या चरणात श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणत आहेत, **''ज्ञानदेवा चित्ती हरिपाठ नेमा। मागिलिया जन्मा मुक्त झालो।।४।।''** श्री ज्ञानराज आपल्या जीवनाचा परिपाठ सांगताहेत, **''हरि-हरि''** असा अखंड हरिनामस्मरण. अशा नामस्मरणात अहोरात्र मग्न असणे हाच जीवनाचा नित्यभाव झाला आहे. त्यामुळे एवढा मोठा लाभ झाला की जीवाच्या मागे लागलेल्या जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मी मुक्त झालो. आणिक एक छान अर्थ होतो. आता जीवाला नामस्मरणामुळे पुन: जन्माला यावयाचे कारणच नाही.

जीवाच्या मागे लागलेल्या जन्म-मरण बंधनातून/चक्रातून मुक्त होणे अशक्य नाही पण फार-फार कठीण मात्र खास आहे. मनुष्यमात्रच काय पण ब्रह्मादिक देवसुद्धा जन्मापासून मुक्त नाहीत. ज्ञानदेव म्हणताहेत, **''एरव्ही ब्रह्मपणाचे भडसे। न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे।''** जोपर्यंत जीवदशा आहे तोपर्यंत जन्म चुकत नाही. जन्म आला की मरण हे ठरलेलेच **''उपजे तें नाशे।''**. या जन्ममरणाच्या दुष्ट चक्रातून मुक्त होणे हाच परमपुरुषार्थ आहे. कारण सर्व सांसारिक अनर्थाला कारण जर काही असेल तर तो जन्मच. तुकोबाराय म्हणतात, **''जन्माचे ते मूळ पाहिले शोधुनि। दु:खासी कारण जन्म घ्यावा।।''**

विवेकी मनुष्य या जन्माबद्दल किती दोषदृष्टीने पाहतो याचे वर्णन माऊलींनी छान केले आहे. **''डोळा हरळ न विरे। घाई कोत न जिरे। तैसे**

**काळीचे न विसरे। जन्मदु:ख।।**'' जन्माला यावं लागणं याचीच मनुष्याला लाज वाटली पाहिजे. गर्भवासाचे दु:ख सोसून, जन्माला येऊन जो देह मिळवायचा त्याचे यथार्थ स्वरुप तरी काय ? कितीसे चांगले आहे ?

या शरीराशी संबंधामुळेच जीवाला जन्मादि सर्व अनर्थ सहन करावे लागतात. पण या सगळ्या अनर्थातून हरि-हरि अशा नामपाठानेच मुक्त होता येते. किंबहुना मी कधी बद्ध झालोच नाही तर मी नित्यमुक्त आहे, मी कधीच जन्मलो नाही, जन्मत नाही आणि जन्मणार पण नाही. कारण मी अजन्मा असा **आत्माराम** आहे. असा अनुभव म्हणजे मुक्तता. वेदान्ताने मुक्ती त्रैकालिक सांगितली आहे. मागील जन्म नाही, वर्तमान जन्म नाही व पुढील जन्मपण नाहीच. मी जन्म-मरण काय ? तर कोणत्याच उपाधीने बद्ध नाही. हाच **आत्मानुभव**, यालाच म्हणतात **आत्मसाक्षात्कार**.

शरीर आलं की कर्म ओघात येतंच. जन्माला वासना, वासनेला कारण कर्म. कर्म केलं की फळ आलंच. शुभ कर्माचं फळ सुख, अशुभ कर्माचं फळ दु:ख. ते भोगण्यासाठी पुन: जन्म. कर्मत्याग संभवतच नाही. कर्मनाश होत नाही म्हणून कर्मनिवृत्ति कर्मत्यागाने होऊन शकत नाही.

मग कर्मनिवृत्ति कशाने होते म्हणाल तर त्या कर्माचे बीज जे ''राग-द्वेष'' त्याच्या त्यागानेच हाते. या रागद्वेषाला कारण आहे देहाभिमान, देहाचा नाश झाला तरी त्याने देहाभिमान नष्ट होत नाही. या देहाभिमानाला कारण आहे आपल्या स्वस्वरुपाचे अज्ञान. तात्पर्य काय तर जन्माचे मूळ शोधता-शोधता आपणाला स्वस्वरुपाच्या अज्ञान या मुळाशी यावे लागते.

स्वस्वरुपाच्या/आत्मारामाच्या/सत्-चित्, आनंद, नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त अशा आनंदाच्या अज्ञानामुळे (आनंदस्वरुपाच्या) देहाभिमान, त्यामुळे राग-द्वेष, रागद्वेषामुळे शुभा-शुभ कर्मे, त्यामुळे सुख-दु:खादि भोग व ते भोगण्यासाठीच जन्म-मरण अशी अनिष्ट परंपरा आहे. (जीवनमुक्त संत महात्मे मात्र आपल्या इच्छेने जगत्कल्याणार्थ, भक्तिप्रेमसुख अनुभवण्यासाठी हवे तेव्हा, हवे तिथे जन्म घेऊ शकतात.)

जन्ममरणाच्या परंपरेतून मुक्त होण्यासाठी प्रथम जर काय करावयाचे असेल तर द्वैत भावनेतून/वेगळेपणा पुसून टाकले पाहिजे. मग सर्वत्र एक श्रीहरीच/श्रीगुरु पहावा. नामाने सतत श्रीहरीचे-भगवंताचे चिंतन स्मरण करावयास हवे. अशा नाम चिंतनाने सर्वाघटी एकच श्रीहरी आहे असा आत्मप्रत्यय येतो. अशा प्रत्ययाने आपल्या हृदयांत आत्मज्ञानाचा प्रकाश पसरतो. आत्मज्ञानाच्या या दिव्य अनुभवरसायनाने मग कुठला जन्म आणि कुठला मृत्यू ??? केवळ जन्ममरणअतीतता-मोक्ष-नित्यानंद. ''**जिरोनि जाईजे पोटी। नित्यानंदाच्या॥**'' अखंड नामस्मरणाने-भगवद्‌भजनाने सर्वकर्मनाश/अज्ञानाला व त्या द्वाराचा जन्मनाश. या अभंगातील जन्म हा शब्द ''**अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते आणि नश्यति**'' या सर्व विकारांचे उपलक्षण म्हणून वापरला आहे. केवळ नामस्मरणाने जीव या सगळ्यातून मुक्त होतो म्हणून ज्ञानराज पुनः पुनः सांगतात, ''**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा**''.

* * * * *

# अभंग क्र. १६

**हरि बुद्धी जपे तो नर दुर्लभ। वाचेसी सुलभ रामकृष्ण॥१॥**
**रामकृष्णनामी उन्मनी साधली। तयासी लाधली सकळ सिद्धी॥२॥**
**सिद्धी बुद्धि धर्म हरिपाठी आले। प्रपंची निवाले साधुसंगे॥३॥**
**ज्ञानदेवी नाम रामकृष्णठसा। येणे दशदिशा आत्माराम॥४॥**

आत्तापर्यंतच्या मागील सगळ्या अभंगातील हरिनामाचे माहात्म्य पाहून "**नामा म्हणे फार सोपे हे साधन। वाचे नाम घेणे इतुकेचि॥**" असेच कोणालाही वाटेल. पण त्याचबरोबर लगेच एक शंकाही येईल की, इतके जर सोपे आहे **नामस्मरण** हे साधन तर मग ते सर्वचजण का करत नाहीत बरं ??? दुसरी शंका - करणारेही ते सातत्याने का करत नाहीत ?? शंका तिसरी - करणाऱ्यात हरिप्राप्ती झालेला एखादा-दुसरा असा विरळाच आढळतो !!! या सगळ्या शंकांची उत्तरे श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराजांनी या अभंगात, अल्पाक्षरात, सूत्रबद्ध, यथार्थ व सप्रचीत दिली आहेत पहा.

नाम घेणे वाणीला सुलभ आहे पण बुद्धीच्या सहाय्याने सतत हरिजप करणारा **नर** मात्र दुर्लभ आहे. म्हणून ज्ञानोबाराय या अभंगाच्या सुरवातीलाच म्हणतात, "**हरि बुद्धी जपे तो नर दुर्लभ।**" पण वाचेसी तर अगदी "**सुलभ**". मग तरीही नामस्मरणाकडे/नामजपाकडे सर्वांची प्रवृत्ती का होत नाही ??? तर देहात्मबुद्धीमुळे आत्मबोधाचा विसर पडतो आणि तो भोगप्रवृत्त होतो. जीवत्त्वदशाच सत्य वाटते. चंद्रोदयाबरोबर ज्या कावळ्यांचे डोळे फुटतात, ते कावळे चंद्राला कसं काय ओळखणार नां ??? तशी विवेक-वैराग्याची शीवच ज्यांना माहित नाही त्यांना भगवंत-भगवत्नाम याची ओळख-जाणीव-प्रवृत्ती कशी काय होणार नां ???

पंचइंद्रियांना हव्या असणाऱ्या विषयांवाचून अन्य त्यांना काही रम्य वाटतच नाही आणि इंद्रिये जे जे म्हणतील तेच करण्यात त्यांना रस असतो

अशांना कितीही, कसंही सांगा त्यांना हित कळतच नाही. इंद्रियांबरोबर मन पण विषयांकडेच धावत असते म्हणून त्यांची भगवत् चिंतनाकडे-नामजपाकडे -नामस्मरणाकडे प्रवृत्ती होत नाही. मनाची चंचलता वाढली की बुद्धीही कलुषित होते, भ्रष्ट होते व तो जीवदशेत गुंतून पडतो. मग तो नामस्मरण कुठले करायला ??? म्हणून वाचेसी जरी सुलभ असले तरी बुद्धीपूर्वक नामस्मरण करणारा दुर्लभच.

या सगळ्या प्रकाराचा परिणाम काय तर नामसाधना संसिद्ध होत नाही. नाम सुटते, मन भरकटते. मोठ्या प्रयासाने चालू ठेवलेच तरीही फक्त ती एक कवायत होते. यांत्रिक क्रिया होते. कबीर म्हणतात, ''**माला तो करमे फिरे !!!**'' म्हणून माऊली आग्रहाने सांगते आहे की, बुद्धीच्या सहाय्याने बुद्धीपूर्वक हरिजप/नामस्मरण व्हावयास पाहिजे. नुसत्या वाणीने नव्हे. एका ओवीत ज्ञानराज म्हणतात, ''**तू मन-बुद्धी साचेसी।**'' साचेसी म्हणजे खऱ्या निष्ठेने आणि सद्गुरुंनी अनुग्रहपूर्वक सांगितलेल्या साच्यातून (म्हणजे त्या पद्धतीने).

जडाच चिंतन न करणारी वृत्ती भगवंताकडे लावावयाची आहे आणि ती निरंतर/सातत्याने लावायची आहे. आपण नामचिंतन करत नाही असे नाही पण त्यात सातत्य आणि अनुसंधान राहात नाही. म्हणून **नाम** सिद्धीला जात नाही. आणखी एक आहे, नामसाधना तेव्हाच सिद्धीला जाईल जेव्हा **भगवत्प्राप्ती** हाच त्या नामसाधनेचा एकमेव हेतू असेल. अन्य कोणत्याही कामनेनं केलेला नामजप ती ती कामनापूर्ती करेल पण मग भगवंताला हा नामधारक कायमचा दुरावेल.

संतश्रेष्ठ म्हणतात, ''**ऐसे जे भजन। ते संसाराचेचि साधन।।**'' सगळे संत मेघवाणीने उपदेश करीत असतात तरी सर्वांची नामस्मरणाकडे प्रवृत्ती होतच नाही. श्री तुकोबाराय समर्थांना भेटले असताना म्हणाले, ''**वाजतसे बोंब कोणी नायकती कानी। हरि हरि न म्हणती तया थोर झाली हानी।।**''

ज्याचे पूर्व सुकृत चांगले आहे, त्यामुळे त्याला संतसमागम घडत आहे, श्रीगुरु भेटला आहे, श्रीगुरुसेवा होत आहे अशालाच नामसाधनाचे प्रेम वाटते. ज्ञानोबारायच म्हणतात नां, "**बहुत सुकृताची जोडी। म्हणूनि विठ्ठल आवडी॥ जन्मजन्मांतरी असेल पुण्यसामग्री। तरीच जिव्हाग्री येईल नाम विठोबाचे॥**" नाम आवडते असा अनुभव असला तर निश्चितच जबरदस्त पुण्य आणि गुरुकृपाच असली पाहिजे यात तीळमात्र शंका नाही.

हरिपाठातील सोळाव्या अभंगाच्या दुसऱ्या चरणात श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**रामकृष्ण नामी उन्मनी साधली। तयासी लाधली सकळ सिद्धी॥**" जर जीवाने बहिर्मुखतेचा त्याग केला आणि अखंड "**रामकृष्णहरि**" नामाचे स्मरण केले तर त्याला "**उन्मनी**" ही श्रेष्ठ अवस्था प्राप्त होईल. इतकेच नव्हे तर नामस्मरणाच्या बळावर त्याला सकळसिद्धी प्राप्त होतील. आता उन्मनी म्हणजे काय ? व ती नामाने कशी प्राप्त होते ? याचा विचार करावयास हवा नाही कां ?

उन्मनी प्राप्त झालेल्या पुरुषाचे वर्णन ज्ञानोबारायांनी एका अभंगात मोठे सुंदर केले आहे. ते म्हणतात, चारी देहाच्या तादात्म्याचे ओझे टाकून तो गोस्वामी उन्मनीशी संयोग पावल्याने शोभतो. "**स:अहं-अहंस:**" या बोधावर आरुढ झाल्याने संसारसत्यत्व तेथे उरतच नाही. चंद्र-सूर्यादिकांपेक्षा तो आत्मतेजाने झळकत असतो. त्याचा अनुभव अव्यक्तालापण व्यापून असतो. शेवटी ज्ञानराज म्हणतात, "ही उन्मनीची खूण गुरुगम्य आहे. एवढं लक्षात घ्यावं ही माझी विनंती आहे." **उन्मनी** ही योगमार्गातील एक श्रेष्ठ अवस्था आहे.

"**ज्ञानदेव दर्शन सतरावीचे घेता। उन्मनी ठसवी निवृत्ति दाता॥**" स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार देहांच्या अनुक्रमे जागृती, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या किंवा उन्मनी या चार अवस्था आहेत. उन्मनी ही अंतिम श्रेष्ठ अवस्था आहे. श्रीगुरु म्हणतात, "**महाकारणी आतुला लक्षाचा पुतळा। उन्मनी हे कळा दैवी वरी॥**" या उन्मनीलाच तुर्या म्हणतात. "**तुर्या ते**

**उन्मनी, क्षर ते अक्षर। निर्गुण साकार ऐसे देखा॥''** तुर्यावस्था ही देहातीत अवस्था आहे. एकमेव परब्रह्मच या अवस्थेचा आश्रय आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणाले आहेत, **''तुर्येचे माजघर परब्रह्म जे॥''**

सर्व प्राणीमात्र सदैव जागृती, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांचाच अनुभव घेत असतात. उन्मनी अवस्था ही जरी नित्यसिद्ध व सहज असली तरी आत्मस्वरुपाचे अज्ञान आहे तोवर तिचा प्रत्यय अज्ञानी जीवास येऊ शकत नाही. त्यासाठी आत्मानात्म विवेकाने तिन्ही देहांचा निरास करून चौथ्या महाकारण देहाचा म्हणजेच एका परब्रह्माचा निश्चय झाला, ब्रह्माकारता प्राप्त झाली की या उन्मनी अवस्थेचा प्रत्यय येतो.

आत्मनात्म विवेकाने तीन देह व त्यातील पंचकोश यांचा निरास होणे म्हणजेच कार्यकारणाचा नाश होय. जागृती व स्वप्न या दोन अवस्था कार्यरुप आहेत व सुषुप्ति ही अवस्था कारणरुप आहे. या सगळ्या अवस्थांचा निरास या तीन देहांच्या अभिमान-नाशाने होतो. जेव्हा नामस्मरण करणारा **भक्त** विवेकाने या तिन्ही अवस्था दृश्य असून **मी आत्मा** त्यांच्यापेक्षा वेगळा द्रष्टा आहे असे अनुभवतो त्याचवेळी तो ज्ञानस्वरुप महाकारणात प्रवेश करतो म्हणजेच ब्रह्मस्वरुप होतो.

अशी अवस्था प्राप्त होणे म्हणजेच सर्व कार्यकारणाचा नाश होणे व यासच **''उन्मनी''** म्हणतात. ज्ञानाच्या ज्या सात अवस्था/भूमिका सांगितल्या आहेत, त्यात तुर्या ही अंतिम भूमिका आहे. या सातव्या भूमिकेवर आरुढ होण्यासाठी देहत्रयाचे तादात्म्य सुटले पाहिजे, हे कठिण आहे, पण अशक्य नाही. अत्यंत कठीण, दुर्लभ अशा या भूमिकेवर **''रामकृष्णहरि''** या नामस्मरणानेच आरुढ होता येते. इतके या नामस्मरणाचे अगाध सामर्थ्य आहे. या उन्मनीतच आत्मतत्त्वाचे, गुरुबोधाचे रहस्य स्पष्टपणे उकलते, कळते, बिंबते आणि सत्संग होऊन मार्गदर्शन लाभते.

ही उन्मनी अवस्था प्राप्त झाल्यावर काय अनुभव येतो ? या अवस्थेचे निशाण फडकू लागले की ध्यानी, मनी, जनी भगवंताशी तन्मयता अनुभवास

येते. **मनच** उरत नाही. सर्व हरीच आहे या डोहांत बुडी घेता येते. मनाची कल्पना, देहाची भावना या सगळ्या हरीमध्ये एकरुप होतात. श्रीहरि-गुरुकृपेने-नामस्मरणाने हे सगळे घडते.

नामस्मरणाने तुर्यावस्था कशी प्राप्त होते याचे वर्णन एकनाथ महाराजांनी भागवतांत सुंदर केले आहे. नामधारकाला उन्मनी अवस्था प्राप्त होते. इतकेच नव्हे तर सर्व प्रकारच्या सिद्धीही प्राप्त होतात पण तो त्यांच्याकडे कानाडोळा करतो, ढुंकूनसुद्धा पहात नाही, त्यांना लाथाडतो कां तर या सगळ्या सिद्धि भगवंतापासून लांब ठेवणाऱ्या आहेत. ज्ञानेश्वर महाराज अठराव्या अध्यायात "**आत्मसिद्धिलाच**" परमसिद्धि म्हणतात. **सकळसिद्धी** म्हणजेच आत्मसिद्धी. ती नामाने लाभते.

हरिपाठाच्या या सोळाव्या अभंगातील तिसऱ्या क्रमांकाच्या चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "**सिद्धि, बुद्धि धर्म हरिपाठी आले। प्रपंची निवाले साधुसंगे॥**" एका हरिपाठात म्हणजे हरिचिंतनात सिद्धि, बुद्धि व धर्म या सर्वांचा अंतर्भाव होतो. मागल्या १३ व्या अभंगात (समाधि हरीची) बुद्धी कशी वैभवयुक्त होते याचा विचार आलेलाच आहे. तसाच सिद्धिचा विचारपण झाला आहेच. आता आपल्याला धर्माचा विचार करावयास हवा नाही का ??? धर्माचा विचार करावयाचे साधन म्हणजे "**वेदग्रंथ**", वेदप्रामाण्य !!! आणि ज्याला वेदप्रामाण्य नाही त्याला सिद्धी, सुख, परागती कुठली ना ???

अभ्युदय आणि निःश्वेयसाची प्राप्ती यांचे साधन "**धर्म**". "**यतोऽभ्युदय निःश्रेयस् सिद्धि सः धर्मः॥**" अशी श्रुती (म्हणजे वेदवचन) आहे. पण धर्माचे तत्त्व-रहस्य अति गुह्य. "**धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्।**" सामान्यांची या धर्माधर्म विचारात किंकर्तव्यमूढ स्थिती होते. हे स्वाभाविक आहे. भले-भले जेथे या धर्माधर्माच्या विचारात गोंधळतात मग सामान्य जनांचा काय पाड लागणार ??? पण ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, चिंता करण्याचे कारणच नाही. एका हरिनामस्मरणात सर्व धर्मांचा अंतर्भाव होतो.

**“सकळ धर्माचे कारण। नामस्मरण हरिकीर्तन। दया, क्षमा, समाधान। संतजन साधिती॥ निजधर्म हा चोखडा। नाम उच्चारु धडधडा॥”** अशी याबाबत ग्वाही आहे सगळ्या संतांची. नामदेवराय म्हणतात, **“अहर्विशी नाम जपा भगवंताचे। जे सकळ धर्माचे मुकुटमणी॥”**

भागवतात भगवान सांगताहेत की, **“एष मे सर्व धर्माणां धर्मो अधिक तमो मत:। यद्‌भक्ता पुंडरीकाक्षं स्तवै: अर्चे: नर: सदा॥”** नामाचे अखंड स्मरण ही प्रेमलक्षणाभक्ती हा जीवमात्राचा परमधर्म आहे. श्री एकनाथ महाराज भागवतावर टीका करताना म्हणताहेत - भगवान उद्धवाला सांगताहेत, **“ऐक उद्धवा निजवर्म। गुह्य सांगेन मी परम। माझी भक्ती जे सप्रेम। नामस्मरण तो उत्तमधर्म जाण॥”** आता एकट्या नामस्मरणात सर्व धर्मांचा अंतर्भाव कसा होतो याची उपपत्ती अशी आहे की, कोणत्याही धर्माचरणाचे अंतिम फल **“हरि-संतोष”** हेच आहे. कोणत्याही धर्माचरणात जी न्यूनता होते, तिची पूर्तता एक भगवत्‌नामच करू शकते.

**“स्मरणादेव तद् विष्णो: संपूर्णस्थादिति श्रुती:॥”** एकनाथ महाराज म्हणतात, **“धर्म, कर्म विगुण होत। तेथ स्मरावा मी अच्युत। नामे न्यून ते संपूर्ण होत। हे सामर्थ्य नामाचे॥”** नामस्मरण करणारा भक्त केव्हाही मार्गभ्रष्ट, कर्मच्युत होण्याची भीतीच नाही. तो धावत असला किंवा डोळे मिटून चालत असला तरी ठेच लागेल किंवा पडेल अशी भीती मुळीच बाळगायला नको अशी नारदांनी ग्वाही दिली आहे.

आता **“प्रपंची निवाले साधुसंगे।”** साधुसंतांच्या संगतीत हरिनामचिंतन-स्मरणद्वारा जीव तापत्रयापासून मुक्त होतो. जीवाच्या प्रयत्नाने त्रिविध ताप (अध्यात्मिक, अधिदैविक व अधिभौतिक) कमी न होता उलट अधिकच वाढतात. तुकाराम महाराज म्हणतात, **“त्रिविध तापांची झाली बोळवण। देखिल्या चरण वैष्णवांचे॥”** स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांच्या अनुक्रमे त्रिविध तापालाच भवरोग म्हणतात. त्यांची निवृत्ती संतसंगतीत होणाऱ्या नामस्मरणाने होते.

**''पाप, ताप, दैन्य जाय उठाउठी। झालिया भेटी हरिदासांची।।''** असं श्री तुकोबाराय सांगतात. ज्ञानराज म्हणतात, **''या संतांसी भेटता। हरे संसाराची व्यथा।।''** माणसाच्या चित्तात नामाने पूर्णपणे परमात्माच बिंबतो व त्यामुळे त्याला सर्वत्र हरिमय होऊन सर्वत्र एक हरिच दिसू लागतो.

या अभंगाच्या चौथ्या चरणात म्हणालेत, **''ज्ञानदेवी नाम रामकृष्ण ठसा। येणे दशदिशा आत्माराम।।''** **''जे जे दृष्टी देखें आपण। थोर अथवा सूक्ष्म लहान। ते ते हरीचे निजदर्शन। सहजे भजन अहैतुक।।''** यालाच **''भागवतोत्तमोत्तम''** म्हणतात. मनावर अनेक गोष्टींचे ठसे उमटतात पण ते पुसलेही जातात. पण भगवत्‌नामाचा ठसा/**''रामकृष्णहरि''** नामाचा ठसा एकदा उमटला की तो काही केल्या पुसला जात नाही.

ही पराभक्तीची परिसीमा आहे. नामधारकाला सर्वत्र दशदिशांना एक आत्मारामच प्रतीतीला येतो. अशा प्रतीतीची खूण काय ? तर **''यः तु आत्मरति एव स्थात्। आत्मतृप्तश्च मानवः। आत्मनि एव संतुष्टः। तस्य कार्यं न विद्यते।।''** एका ईश्वरी सत्तेची प्रत्यक्ष अनुभूती येते. त्यासाठी साधन काय तर एक **हरिमुखे म्हणा हरिमुखे म्हणा** बस् !!!

* * * * *

# अभंग क्र. १७

**हरिपाठ कीर्ति मुखे जरी गाय। पवित्रचि होय देह त्याचा॥१॥**

**तपाचे सामर्थ्ये तपिन्नला अमूप। चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे॥२॥**

**मातृपितृभ्राता सगोत्र अपार। चतुर्भुज नर होऊनि ठेले॥३॥**

**ज्ञानगूढगम्य ज्ञानदेवा लाधले। निवृत्तीने दिधले माझे हाती॥४॥**

ज्याच्यामुळे आपली हितपूर्ती होते त्याची मनुष्य सहजच कीर्ती गात असतो. हरिनामाने तर मनुष्य हरिरुपच होतो. मग अशा हरिनामाची कीर्ती गाणे अगदी स्वाभाविकच आहे. तुकाराम महाराज म्हणतात, "**हाकारोनि सांगे तुका। नाम घेता राहो नका॥**" या अभंगात ज्ञानराज हरिनाम संकीर्तनाचे सांगताहेत, तरी येथे नुसत्या शाब्दिक कीर्तनाबद्दल सांगत नाहीत. हरिकीर्तन हा जीवनाचा एक भाग नसून ज्या हरिभक्ताचे संपूर्ण जीवनच हरिमय झालेले असते त्याच्या कीर्तनाची महती गात आहेत.

संपूर्ण जीवनच जेव्हा हरिसंकीर्तनाने व्यापले जाते, मग तो देह का नाही पवित्र होणार ? आता इथं देह म्हणजे केवळ स्थूल देह नव्हे कारण तो स्वच्छ करावयास पाणी आणि साबण पुरेसे आहेत. पण स्वच्छ करणं आणि शुद्ध करणं यात फार मोठा जमीन-अस्मानाचा फरक आहे आणि त्याहीपेक्षा **पवित्र** करणं हा तर आणखीनच उच्च-उच्च असा स्तर आहे. ज्ञानराजांना अपेक्षित असणारी पवित्रता त्यांनी तेराव्या अध्यायात सांगितली आहे ती अशी, "**या लागी बाह्य भागु। कर्मे धुतला चांगु। ज्ञाने फेडिला वंगु। अंतरीचा॥ तेथ अंतर बाह्य गेले। निर्मलत्व एक झाले। किंबहुना उरले। शुचित्वचि॥**"

"**आंत बाहेरि चोखाळु। कां सूर्य जैसा निर्मळु।**" अशी पवित्रता. तुकोबाराय विचारतात, "**नाही निर्मळ जीवन। काय करील साबण ?॥**" नामसंकीर्तनानं नामधारकाचं अंतरंग आणि बहिरंग असं संपूर्ण व्यापलं पाहिजे.

तर तो पूर्णत: अंतर्बाह्य पवित्र होईल. ज्ञानेश्वर महाराज म्हणत आहेत, हरिनामाचे पठण किंवा कीर्तन जो मुखाने गातो, त्याचा देह पवित्र होतो. पण सर्वच ठिकाणी देहाची अपवित्रताच गाईली आहे. तुकाराम महाराज म्हणतात, **''शरीर दु:खाचे कोठार। शरीर रोगाचे भांडार। शरीर दुर्गंधीची थार। नाही अपवित्र शरीरा ऐसे॥''**

देह तीन आहेत. स्थूल, सूक्ष्म व कारण. स्थूल देहाला मलमूत्रादिकांच्याद्वारे अपवित्रता प्राप्त होते. किंबहुना तो स्वभावत:च अपवित्र असतो. सूक्ष्म देहाला अपवित्रता काम-क्रोधादि विकारांनी प्राप्त होते. कारणदेह हा आत्मारामाच्या अज्ञानामुळे अपवित्र होतो. येथे एक शंका येईल. अपवित्र असणं हा ज्या वस्तूचा सहजस्वभावच आहे ती वस्तू कशी आणि कशाने पवित्र होणार ना ??? त्याचं उत्तर असं आहे, देहाला अपवित्रता ही त्यातील अस्थि, रक्त, रेत, मज्जा, मांसाने आली नसून ती तत्त्वत: देहबुद्धी व तज्जन्य विकारांमुळे आली आहे.

श्री तुकाराम महाराज म्हणतात, **''अहंकारा नासा भेद। जगीं निंद्य ओवळां॥''** शुद्ध जीवाला देहतादात्म्य घडवून आणून त्यास अपवित्र बनवणारा हा देहाहंकार आहे म्हणून अहंकारच (मात्र देहासंबंधीचा हं) अपवित्र आहे. तसेच षड्विकारही अपवित्रच आहेत. गीतेच्या सोळाव्या अध्यायात त्यांना नरकाचे द्वारच म्हटलेले आहे. भगवत्पूज्यपाद शंकराचार्यांनी यम आणि विकार यांच्या तुलनेत यमापेक्षा विकारांचीच बाधकता जास्त सांगितली आहे. या क्रोधादि विकारांमुळेच खरी अपवित्रता येते. एका अखंड हरिगुण-नाम संकीर्तनानेच हे विकार अंत:करणातून नष्ट होतात.

**''एका जनार्दनी गाता हरीचे नाम। निमाली इंद्रिये विषय विसरली काम॥''** असा नाथरायांचा निर्वाळा आहे. **''तुका म्हणे नाम। ज्याचे नाशी क्रोध काम। हारी भवभ्रम। उच्चारिता वाचेंशी॥''** असं तुकोबाराय पण परखडपणे सांगतात. अशा प्रकारे सूक्ष्म शरीराची पवित्रता

भगवन्नामस्मरणानेच होते. कारण देहाची पवित्रता, म्हणजेच ''**अज्ञान निवृत्ति**'' ही भगवन्नामसंकीर्तनाने आणि भगवत्कृपाद्वाराच होते. भगवान् श्रीकृष्ण उद्धवाला सांगताहेत, जसे अग्निने सोने, गाळून पाणी, ध्यानाने स्वरुप, जीव बाह्यत: कर्माचरणाने आणि अंतर्बाह्य पावित्र्य माझ्या सप्रेम प्रेमलक्षणापूर्वक नामस्मरणाने प्राप्त होते.

नामाखेरीज इतर साधनांनी प्राप्त होणारी पवित्रता पुन्हा मलिन होते, पण नामसंकीर्तनाने प्राप्त होणारी पवित्रता कधीच पुन: मलिन होत नाही. ''**पवित्र तो देह वाणी पुण्यवंत। जो वदे अच्युत सर्वकाळ॥ तयाच्या चिंतने तरतील दोषी। जळतील राशी पातकांच्या॥**''

नामाचे आणि नामस्मरणाने प्राप्त होणारे पावित्र्य तीर्थादिकांपेक्षाही खूपच श्रेष्ठ आहे. ''**तीर्थांचे पैं तीर्थ, नाम हे समर्थ। होऊनि कृतार्थ हरिनामे॥**'' नाम हे स्वत: पूर्ण पवित्र आहे म्हणूनच ते नामधारकाला अंतर्बाह्य पवित्र करू शकते. श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज त्यांच्या एका अभंगात म्हणताहेत, ''**नाम पवित्र आणि परिकरु। कल्पतरूहूनि उदारु। ते का रे सधरु। तेणे तरसी भवसागरु॥**'' पद्मपुराणात एक कथा आहे. एक राजा मोठा नामधारक होता. नामस्मरणाने तो इतका पवित्र झाला होता की, जेव्हा त्याला विष्णूदूत वैकुंठास नेऊ लागले ती वाट यमलोकांवरून जात होती. या राजाच्या शरीरावरून येणाऱ्या वायूने नरकातील अनेक पापी जीवांचा उद्धार झाला. एवढी भक्तांच्या स्थूल देहाची पवित्रता आहे.

तुकाराम महाराजांच्या जीवनातील एक प्रसंग आहे. एकदा ते बहिर्दिशेला गेले होते. मुखाने नामघोष चालूच होता. तिकडून एक वैदिक ब्राह्मण निघाले होते. त्यांनी पाहिले आणि तुकोबारायांच्यावर यथेच्छ तोंडसुख घेतले म्हणाले, ''काय हा अनाचार ??? शौचाला बसले असताना भगवंताचं नाम घेणं योग्य नाही. आधी बंद करा !!!'' तुकोबांनी नम्रपणे सांगितलं, ''आता हे माझ्या हातात राहिलेलं नाही.'' ''**माझी मज झाली अनावर वाचा.**''

ते वैदिक म्हणाले, ''असं काय ? बघतो आता तुझी वाचा कशी बोलते

ते !!!'' असं म्हणून त्या ब्राह्मणाने तिथलेच काटे (बाभळीचे) तुकोबांच्या दोन्ही ओठांतून खुपसून ठेवले आणि अशाप्रकारे त्यांचे तोंड बंद केले. नंतर ते पुढे गेल्यावर त्यांना पुन्हा ''विठ्ठल विठ्ठल'' ऐकू येऊ लागले. परत माघारी आले आणि काय आश्चर्य !!! तुकोबांच्या सर्वांगातून **''नामोच्चार''** त्यांना ऐकू येऊ लागला. त्यांना आता का होईना ? पण महाराजांची योग्यता कळली. त्यांनी तुकोबारायांची क्षमा मागितली, त्यांना शरण गेले. नामानं देह कसापवित्र होतो याचं याहून अधिक चांगलं उदाहरण कोणतं असू शकतं ???

या सतराव्या अभंगाचे दुसऱ्या चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **''तपाचें सामर्थ्ये तपिन्नला अमूप। चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे॥''** नामचिंतनाच्या तपाचे सामर्थ्य असे आहे की, हे ज्याने केले त्याने अमित तप केले. तपाच्या अनंत राशीच्या राशी नामस्वरुप तपाने उभ्या राहतात. या तपोराशींचे फळ काय ? तर ज्ञानोबाराय सांगताहेत, **''चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे॥''** या तपाच्या योगाने भक्त चिरंजीव म्हणजे चिरकाळ, अनेक कल्पान्तापर्यंत वैकुंठात नांदतो. चार-चार युगाच्या अशा हजार चौकड्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस असा एक दिवस झाल्यावर जी एक रात्र येते त्या रात्रीला ''कल्प'' असे म्हणतात. इथे कल्प हा शब्द दीर्घ-प्रदीर्घकालवाचक या अर्थाने आला आहे.

उत्पत्ती, नाश हे ब्रह्मलोकापर्यंतच आहेत. पद्मपुराणात महादेव पार्वतीस म्हणताहेत, ''जे भक्त अहर्निश नाममात्रोपजीवी असतात. ते अखंड वैकुंठात वास करतात.'' याबाबत वेदग्रंथ साक्षी आहेत. त्यांना पुनरागमन नाही. ज्ञानेश्वर महाराज एका अभंगात म्हणतात, **''रामकृष्णहरि स्मरण जप। तेचि ह्याचे अमूप तप। तो वास करील कोटीकल्प। वैकुंठपीठ नगरीशी॥''**

या अभंगाचे तिसऱ्या चरणात ज्ञानोबाराय म्हणाले आहेत, **''मातृपितृभ्राता सगोत्र अपार। चतुर्भुज नर होऊन ठेले॥''** मुखाने हरिनाम आणि हरिनामाची कीर्ती गाणारा हा केवळ एकटा स्वतःच फक्त

वैकुंठास जातो असे नाही तर त्याच्या प्रभावाने त्याच्या कुळातील सर्व पूर्वज, माता-पिता, बंधू-भगिनी, सगोत्र व त्यांच्याशी संबंधीत असणारे देखील चतुर्भुज रुप धारण करून म्हणजे विष्णूस्वरुप होऊन स्वरुपता मुक्ती मिळवतात.

फरक मात्र एवढाच उरतो की नामधारकाला स्वत:ला सायुज्यमुक्ती मिळून त्याचा जीवपणाच नाहीसा होऊन तो शिवरुपाने उरतो आणि या नातलगांना सगळ्यांना सरुपता मुक्ती मिळते की ज्यात जीवपणाचा नाश होत नाही. नामधारकाच्या पुण्यानेच त्यांना ही सरुपता मुक्ती मिळालेली असते.

सर्वसामान्याला नामचिंतनात एवढे सामर्थ्य आहे याचे ज्ञान नसते. त्याकरिता "**गुरुकृपा**" पाहिजे. अभंगातील शेवटच्या चरणात महाराज म्हणतात, "**ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधले। निवृत्तीने दिधले माझ्या हाती॥**" हे नामचिंतनाचे ज्ञान गूढ आहे, गम्य आहे, गंतव्य आहे. आपल्या चिरंतन स्वरुपाचे हे ठिकाण आहे. नाम, प्रेम, भक्ती ही गूढ रहस्ये आहेत. गुरुकृपेवाचून ते कळत नाही. सद्गुरु निवृत्तीनाथांनी कृपा केल्याने ते माझ्या हाती आले. सद्गुरुकृपा होण्यासाठी त्यांच्या वचनावर प्राणापलीकडे निष्ठा हवी. मग त्यांच्याच कृपेने गूढगम्य असणारे **भक्तीप्रेमसुख** हाती येते.

* * * * *

# अभंग क्र. १८

**हरिवंशपुराण, हरिनाम संकीर्तन। हरिवीण सौजन्य नेणे काही॥१॥**

**तया नरा लाभले वैकुंठ जोडले। सकळही घडले तीर्थाटन॥२॥**

**मनोमार्गे गेला, तो येथे मुकला। हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य॥३॥**

**ज्ञानदेवा गोडी, हरिनामाची जोडी। रामकृष्ण आवडी सर्वकाळ॥४॥**

या वरील अभंगात श्री ज्ञानेश्वर महाराज नवविधा भक्तीतील श्रवणं, कीर्तनं, विष्णुस्मरणं, सख्यं अशा विविध प्रकारांनी एका श्रीहरीशी सायुज्य जोडायला सांगत आहेत. श्रवण करायचे असेल तर हरिवंश म्हणजे श्रीहरीच्या अवतार-लीला-चरित्र सांगणारी पुराणे श्रवण करा. केवळ १८ पुराणातील हरिवंश नावाचे पुराणच नाही. भगवंताच्या अवतार-जन्म-लीला-गुण-चरित्र सांगणारे असे पुराण म्हणजेच ''श्रीमद्‌भागवत पुराण''

एक श्लोक आहे, **''तिरोधाय प्रविष्टोऽयं श्रीमत् भागवतार्णवम्। तेनेयं वाङ्मयी मूर्तिः प्रत्यक्षा वर्तते हरेः॥''** वंश याचा येथे अर्थ आहे वास केलेला. भगवंताने/श्रीहरीने ज्यात प्रत्यक्ष, पूर्णत्त्वाने, स्वतः, स्वरुपतः वास केला आहे ते पुराण म्हणजे फक्त आणि फक्त एकमेव श्रीमद्‌भागवत पुराण. जे भक्त-वैष्णव आहेत, ज्यांना संस्कृत भाषेचे ज्ञान नाही, अशा भाळ्या-भोळ्या भाविकभक्तांना कथा माध्यमातूनच भक्तिशास्त्राची ओळख होत असते.

आता **''हरिवंश''** या शब्दाचा शब्दशः अर्थ पण सुंदर आहे. या पुराण ग्रंथाच्या श्रवणाचे माहात्म्य असे सांगितले आहे, **''हरिवंश पुराणे तु, श्रुतेच भरतोत्तम। कथिकं वाचिकं चैव मनसा समुपार्जितं। तत्सर्वं नाशमाथाति, हिमं सूर्योदये यथा॥''** सूर्योदय होताच जसा धुक्याचा नाश होतो तशीच आपली कायिक, वाचिक, मानसिक पापे ''हरिवंश''

श्रवणमात्रेकरून नाहीशी होतात. अठरा पुराणे श्रवण केल्याचे फळ एक हरिवंश स्मरणाने मिळते. १०० वाजपेय यज्ञ व १००० अश्वमेध यज्ञ केल्याचे फळ मिळते तेच एका हरिवंश स्मरणाने मिळते.

श्री एकनाथ महाराज म्हणतात, "**तरावया भाळे भोळे जन। मुख्य चित्तशुद्धीच कारण। जन्म कर्म हरिचे गुण। करावे श्रवण अत्यादरे।। चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता। जेणे सादरे ऐके माता। तेणे सादरे हरिकथा। सार्थकता परिसावी।।**" श्रवणाने काय होते ? "**श्रवणे परीसीती तरला। श्रवणे क्रौंच उद्धरला। मकरोदरी श्रवण पावला। सिद्ध जाहला मत्स्येंद्र।। तुझे श्रवण दोपरी। एक ते चित्त शुद्ध करी। दुसरे जीवब्रह्मैक्य करी। दोहीपरी उद्धारू।।**" श्रवणाने भगवंताचे गुण-स्वरुप हृदयात ठसतात आणि मग तेच मुखावाटे सहज बाहेर पडतात.

श्रवणाहून कीर्तनाचे महात्म्य जास्त आहे व आनंद पण विशेष सरस आहे. कीर्तनाने भक्ताची कायाशुद्धी व वासनानिवृत्ति लवकरात लवकर होते. सत्त्वगुण वर्धित होतो. जरी अगदी निजून भक्ताने हरिकीर्तन केले तरी देव त्याच्यापुढे उभा ठाकतो. भक्त उभा राहून हरिकीर्तन करू लागला तर देव नाचू-डोलू लागतो. भक्त नामसंकीर्तन करीत चालू लागला तर देव त्याच्या मागेपुढे राहातो.

अशा हरीकीर्तनाचे प्रकार तीन आहेत. १) गुणकीर्तन, २) लीलाकीर्तन आणि ३) नामकीर्तन. भगवंताचे यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य हे साही गुणवर्य कीर्तनात वर्णन करणे म्हणजे गुणकीर्तन होय. हे गुण एकापेक्षा एक वरचढ आहेत. कीती गाईले तरी धणी पूर्ण होतच नाही आणि गुण गाण्याचा प्रभाव, "देशकाळाते विसरले। जीवो मरो विसरले। बोधाचिया भूली।।" लीला-कीर्तन हा दुसरा प्रकार. भगवंताच्या अवतारातील जी अलौकिकता, अगम्य, अगाध, अफाट, अचाट अशी दिव्य चरित्रे आहेत त्यांना लीला असे म्हणतात. ही चरित्रे-लीला भक्ताचे अंत:करण आकर्षून घेतात. भगवान श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात, माझ्या लीलांचे गुणगान जगाला

पवित्र करते, महादोषांना हरतात, जडजीवांचा उद्धार होतो, माझी स्वरुपता प्राप्त होते, इहपरलोकी कीर्ति होते.

कीर्तनाचा "लीला कीर्तन" हा दुसरा प्रकार. पैठणला एक थोर हरिभक्त. कृष्णदयार्णव नाव त्यांच, राहात होते. त्यांना कुष्ठरोग झाला होता. त्यांनी श्री एकनाथ महाराजांना या असाध्य रोगातून मुक्त होण्याचा उपाय विचारला. नाथराय म्हणाले, "श्रीमद्‌भागवताच्या दशमस्कंधावर मराठीत ओवीबद्ध टीका लिहा." कृष्णदयार्णवांनी श्रीकृष्णचरित्र लिहिण्यास आरंभ केला. रोगाशी शांतपणे झुंजत त्यांनी भगवान श्रीकृष्णाचे रसाळ, अगम्य चरित्र चाळीस हजार ओव्यांमध्ये "हरिवरदा" या ग्रंथरुपाने लिहिले. ग्रंथ सिद्ध झाला आणि ते गोदावरीत अवभृथस्नान करून आले. पाहतात तो काय ??? त्यांचे सर्वांग रोगमुक्त झालेले !!! लीलाकीर्तनाचा-हरिलीलांचा महिमा काय वर्णावा ना ???

कीर्तनाचा तिसरा प्रकार नामसंकीर्तन. नाथ महाराज म्हणतात, "**ज्यासी न करवे कथा श्रवण। अथवा न टके हरिकीर्तन। तिही करावे नामस्मरण। रामकृष्ण गोविंद॥**" अण्णा म्हणतात, "**गीती गाता नाम। जळून जाती सारी पापं। मनी उपजे भक्तिभाव। अण्णा म्हणे-आनंद म्हणे भेटे देव॥**" नामसंकीर्तनाने भगवंताविषयी सौजन्य उत्पन्न होते. सौजन्य म्हणजेच **सख्य,** प्रेम, सद्‌भाव. नामसंकीर्तनात अनुरक्त झाला. मग भक्तीप्रेमाची परमोच्च अवस्था, **सख्य**. सख्य हेच हरिसौजन्य आहे.

सर्व भक्तांची हीच भूमिका आहे. हरिभक्ताला सख्यभक्तीवीण जीवन ही शिक्षाच वाटते. ही भक्तीची भूमिका फार नितांत सुंदर आहे. जो अखंड हरिकीर्तन श्रवण करतो, नामसंकीर्तन करतो त्याला हे सौजन्य-सख्य-प्रेम प्राप्त होते. आपले तुकाराम महाराज म्हणतात, "**तुका म्हणे नाम। मागे मागे धावे प्रेम॥**" असे सख्य ज्याला कळलं त्याला कशाचा लाभ होतो ? ज्ञानोबाराय या अठराव्या अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगताहेत, "**तया नरा लाधले वैकुंठ जोडले। सकळही घडले तीर्थाटन॥**" ज्याला **सख्य**

मिळाले त्याला याचि देहीं वैकुंठ प्राप्त होते. वैकुंठ म्हणजे परमानंदाची अखंड प्राप्ती. या कीर्तनसेवेचा देवालासुद्धा एवढा लोभ-प्रेमा आहे की वैकुंठास जाण्यास विसरतो. वैकुंठ सोडून वैष्णवाघरी धावतो. श्री तुकोबाराय म्हणतात, **''तुका म्हणे कथा, देवाचे हे ध्यान। समाधी लागोन उभा तेथे।।''** ज्ञानेश्वर महाराज म्हणतात अशा नामसंकीर्तन करणाऱ्याला सगळी तीर्थाटने घडतात, त्याचं कारण असं की सर्व तीर्थे भगवत्स्वरुपापासून उत्पन्न होतात. जे नामसंकीर्तन करतात त्यांनी सर्व तीर्थात स्नान केले, सर्व यज्ञ केले, सर्वप्रकारच्या दानाची फळे मिळतात. तुकाराम महाराज विचारतात, **''काय नोहे केले ???। एका चिंतीता विठ्ठले।।''** पण आपला नामावर कुठं एवढा विश्वास आहे ? गहू घाल, उद्या हरभरे, परवा तांदूळ नुसती फुकटची व्यर्थ धावाधावी. अरे !!! कशाला उचापती ? एक नाम घ्या नां. पण काय करावे ??? विश्वास हवा नां ???

या अभंगातील तिसऱ्या चरणात श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज म्हणताहेत, **''मनोमार्गे गेला, तो येथे मुकला। हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य।।''** मनोमार्गे म्हणजे आपल्या मनानुसार-मनाप्रमाणे आणि शास्त्र-संत-श्रीगुरु यांच्या वचनावर विश्वास न ठेवता आज एक-उद्या एक, एक ना धड भाराभर नुसत्या चिंध्याच. पण असं एक नाम सोडून अन्य मार्गाने जाण्यात काही लाभ-नाही-नाही; परमार्थाची हानीच. ज्ञानराज माऊली कळवळून सांगते आहे **''तो येथे मुकला''** पण लक्षात कोण घेतो ? संतांपेक्षा, श्रीगुरुंपेक्षा आप्तस्वकीयांचे फुकटचे निरर्थक बोल जास्त खरे वाटतात नां ! मग काय करणार श्रीगुरु तरी ???

मग काय करावे तर या आपल्या मनाला एका नामाशिवाय बाकी सगळ्या आडमार्गापासून आवरावे व नीट-सरळ-निश्चित अशा **नाम-मार्गावर**, निश्चयाने लावावे. त्यासाठी श्रीगुरुंनी दिलेल्या **दिव्य** नामावर अविचल अशी अढळ, प्रखर निष्ठा हवी.

मनाला हरिनामाची गोडी लावावी. अशी गोडी लागल्यावर मग ते

भगवत्‌नाम सोडून अन्य खटाटोप कधी करणारच नाही. मन भगवंताच्या पायी स्थिरावेल. कोण-कोण ? काय-काय ? सांगतं त्याच्या मागे पळणार नाही.

नामाचा समास नाही वाचला तरी चालेल पण नामाविषयी विलक्षण प्रेमा असावा. नाम म्हणजे प्रत्यक्ष भगवंतच. नामाचं प्रेम म्हणजेच भगवंताचे प्रेम. एक नाम घ्यावे, नाम हेच व्रत. नाम हीच पूजा, नाम हेच तीर्थ, नामच ध्यान, नामच योग, नामच यज्ञ, नामच कर्म, नामच शरणागती, नामच संध्या, नामच उपासना, नामच धारणा, नामच समाधि, सगळं सगळं काही एक फक्त नाम आणि नाम. नामाशिवाय बाकी सारा फुकटचा फापटपसारा. लक्षात घ्या **नामावर** लक्ष ठेवा.

मनाला भगवत्‌नामाची गोडी लावली की ते भगवंताच्या ठायीच स्थिर होते आणि असे जे कोणी भगवंताच्या पायी स्थिरावले आहेत तेच धन्य नाही का ? ''**आनंद म्हणे मना आत्मसुखाची गोडी। लाविता, आवडी स्थिरावेल॥**'' ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''**कां जे यया मनाचे एक निके। जे देखिलिया गोडीचिये ठायी सोके। म्हणोनि अनुभवसुखचि कवतिके। दावित जाईजे॥**'' श्री नाथराय म्हणतात, ''**जेवी हिरेनी हिरा चिरिजे। तेवी मनेचि मन धरिजे। हेही तैंचि गा लाहिजे। जैं गुरुकृपा लाहिजे संपूर्ण स्वये॥ यया मनाची एक उत्तम गती। जरी स्वये लागले परमार्थी। तरी दासी करी चारी मुक्ती। दे बांधोनि हाती परब्रह्म॥**''

कल्पना ना-ना कल्पना केल्याशिवाय मन राहातच नाही पहा. खरं नां ??? समर्थ म्हणतात, आता जर कल्पना केल्याशिवाय राहातच नाही तर मग निर्विकल्पाचीच/भगवंताचीच कल्पना करावी. म्हणजे, ''**निर्विकल्पासी कल्पिता। कल्पनेची नुरे वार्ता।**'' नामाने निर्विकल्पाची कल्पना करता येते. ज्यांच्या जिव्हेवर नाम निरंतर नाचते, ते संसारी धन्य. ते स्वानंदाने हरीनामाची गर्जना करतात. नाथमहाराज म्हणतात, ''**धन्य जगी तोचि एक हरिरंगी नाचे। रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे॥**'' नामदेवराय पण काय सांगतात पहा, ''**नामा म्हणे जया नामी अनुसंधान। तोचि परमधन्य**

**त्रिभुवनी॥''** धन्य म्हणजे जसा प्रशंसनीय तसाच धन्य याचा आणिक एक अर्थ आहे **''श्रीमंत''**. ज्याला आत्मधन-भगवत्‌धन प्राप्त झाले तोच धन्य. म्हणून ज्ञानेश्वर महाराज या हरिपाठातील १८ व्या अभंगाच्या तिसऱ्या चरणात म्हणतात, **''हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य॥''**

या अभंगातील शेवटच्या चौथ्या चरणात ज्ञानेश्वर महाराज आपली हरिनामाविषयी व हरिस्वरुपाविषयी आवड सांगतात, **''ज्ञानदेव गोडी हरिनामाची जोडी। रामकृष्णी आवडी सर्वकाळ॥४॥''** महाराजांची ही आवड हे खऱ्या भगवद्‌भक्ताचे पूर्णत्त्वाचे लक्षण आहे. या भक्ताला हरिनामाची गोडी लागलेली असते व सदा सर्वकाळ त्याला रामकृष्ण स्वरुपाचीच आवड असते. भगवंताच्या नामरुपाशिवाय त्याला दुसरे काहीही आवडत नाही. **''गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व जोडी॥''**

आवडीने, भावाने हरिनाम घेतले ना, मग त्या नामधारकाची सर्व चिंता भगवंताला असते. आपण फक्त नाम कसं अखंड चालेल याची काळजी घ्यावयाची !!! करायची नाही. खेद करू नये, खंत करू नये, व्यर्थ चिंता कशाला हवी ??? लक्ष्मीनाथ जाणता आहे, त्याला सगळं न सांगता कळतं बरं का !!! **''जाणे जीवीचे सकळ नारायण। न सांगता तुम्हा कळो येते अंतर। विश्वी विश्वंभर परिहारचि न लगे॥''** असं तुकोबारायांचं प्रमाण आहे. स्तनपान-अमृतपान करणाऱ्याला का सांगावं लागतं ? की मला भूक लागली म्हणून !!!

ही हरिस्वरुपाची, हरिनामाची आवड न विटणारी आहे. भक्तिप्रेमसुखरस कधीच विटत नाही व या दिव्य प्रेमरसाचा पण कधी विट येत नाही. उलट सेवन करावा तेवढा तो पुनः पुनः सेवन करावा अशीच आस वाढते. कारण **''चित्त चाकाटले आनंदामाझारी। ते न निघे बाहेरी। ऐसे झाले॥''** ही आवड किती आहे, हा आनंद काय आहे, कसा आहे ??? श्रीगुरु ज्ञानेश्वर महाराज सांगताहेत, **''तृप्ति भुकेली काय करू माये। जीवनी जीवन कैसे तान्हेजळे आहे। मन धाले परि न धाये। पुढती पुढती राजा विठ्ठल पाहे॥''**

अशी आवड हरिस्वरुपाची-नामाची आवड लागल्यावर मग नामधारकाला मोक्षसुखसुद्धा तुच्छ वाटते इतके नामावर, रुपावर प्रेम जडते. भगवान तर ग्वाही देतात, म्हणतात, ''**नामी रुपी जडले चित्त। त्याचा दास मी अंकित।।**'' आता याहून आणिक काय पाहिजे ??? ज्ञानोबाराय सांगतात, किती प्रेम ? किती भाव ? किती ओढ ? तर ''**जयाचिये आवडी। केली मजसी कुळवाडी। भोग मोक्ष बापुडी। त्यजीली कुळे।।**''

हा भक्तिप्रेमरस अविट आहे. इथे तृप्तिलाच भूक लागते. कितीही पाहिले तरी आणखी-आणखी पहावेसेच वाटते, कितीही ऐकले ? तरी ऐकावेसेच आणखी ऐकावेसेच वाटते, किती भेटले तरी सातत्याने खंड न पडता भेटावेसेच वाटते, किती बोललं तरी आणखी बोलावं असंच वाटतं ना ??? खऱ्या खऱ्या भक्तिप्रेमाचंच हे लक्षण आहे, नाही का ???

भक्तिप्रेमरस सर्वकाळ असणे म्हणजे स्वाभाविकता. भक्तिप्रेम हा ''**स्वभाव**'' आहे. आपल्याला स्वचा कधीच वीट येत नाही. तसेच हरिप्रेम/श्रीहरिगुरुप्रेमही सर्वकाळ व अवीट पाहिजे आणि अशी भक्तीप्रेमभावाची/रसाची/**अमृताची** गोडी एका हरिनामानेच जोडली जाते. म्हणून ज्ञानराज पुन: पुन: आवर्जून सांगताहेत, ''**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।**''

* * * * *

# अभंग क्र. १९

**वेदशास्त्र प्रमाण, श्रुतीचे वचन। एक नारायण सार जप॥१॥**

**जप तप कर्म, हरिवीण धर्म। वाऊगाचि श्रम व्यर्थ जाय॥२॥**

**हरिपाठी गेले, ते निवांतचि ठेले। भ्रमर गुंतले सुमनकळिके॥३॥**

**ज्ञानदेवा मंत्र, हरिनामाचे शस्त्र। यमे कुळगोत्र वार्जियेले॥४॥**

वेदप्रामाण्याशिवाय कोणत्याही मताला मान्यता, प्रतिष्ठा नाही. ज्ञानेश्वरमहाराजांनी या अभंगात हरिनामजपाला वेदशास्त्रांचं प्रामाण्य (प्रामाण्यच काय पण सारसर्वस्वच) सांगितले आहे. जीवनाचे सार "**नारायण**", म्हणजे भगवंताचे नाम आहे. त्या नामाचे स्मरण करावे. "**एक**" नाम असे म्हणून महाराजांनी अन्य साधनांची व्यावृत्ति केली आहे. भगवत्नाम हे सगळ्या सगळ्या साधनांचे सार आहे. श्रीतुकाराममहाराज म्हणतात, "**सकळ साधनांचे सार। भवसिंधु उतरी पार॥**" "**सार, सार, सार। विठोबा तुझे नाम सार। म्हणोनि शूळपाणी जपताहे निरंतर॥**"

सार म्हणजे सर्व साधनांचा साकल्याने, मूलगामी, वस्तुनिष्ठ पद्धतीने विचार करून, त्यातून काढलेला निष्कर्ष. तोही काही सामान्य बुद्धीच्या माणसाने काढलेला नसून सर्वज्ञ अशा वेद-शास्त्रांनी काढलेला आहे. भागवतातही म्हटले आहे, "**वासुदेवपरा वेदः वासुदेवपरा मखः। वासुदेवपरा योगः वासुदेवपरा क्रियाः॥**"

प्रस्तुत अभंगात श्रीगुरूज्ञानेश्वरमाऊलींनी "**नारायण**" नामाची योजना केली आहे. त्याचे व्युत्पत्तिद्वारा अनेक अर्थ आहेत. विष्णुसहस्त्रनामावरील आपल्या भाष्यात श्रीमद् आद्यशंकराचार्यांनी म्हटले आहे, "**वर आत्मा ततो जतानि आकाशादिनिनाराणि कार्याणि तानि अयं कारणात्मना व्याप्नोति अतश्च तान्ययनमस्येति नारायणः।**" नर म्हणजे आत्मा;

त्यापासून झालेली आकाशादि पंचमहाभूते; त्यांना "**नार**" असे म्हणतात; त्या कार्यरूप नारांना तो कारणरूपाने व्याज करतो, म्हणून तो त्यांचे (नारांचे) अयन म्हणजे घर आहे. म्हणून भगवंताला "**नारायण**" असे म्हणतात.

महाभारतात श्रीव्यासमहर्षि म्हणतात, "**नराज्जातानि तत्वानि, नाराणीति ततो विदु:। तान्येवे च अयनं तस्य, तेन नारायण स्मृत:॥**" तत्वे ही नारायणापासून निर्माण होतात. म्हणून त्यांना "**नार**" म्हणतात, ती पूर्वी भगवत्स्वरूपाची आयने म्हणजे स्थाने होती म्हणून त्याला नारायण म्हणतात.

नारायण शब्दाचा आणि एक अर्थ पहा - "**नराणां जीवानां आयनत्वात् प्रलय इति वा नारायण:।**" प्रलयकाळी नर म्हणजे जीवसमूह, त्यांचे अयन म्हणजे स्थान आहे, म्हणून भगवंताला नारायण म्हणतात. ब्रह्मवैवर्तपुराणात म्हणतात, "**नराणां अयनं चस्मात् तस्मात् नारायण: स्मृत:॥**" मनुस्मृति सांगते, "**आपो नरा इति प्रोवता, आपो वै नरयूनव:। तावद् अस्य आनं पूर्व तेन नारायण: स्मृत:।**"

आप म्हणजे पाणी, त्याला पण नार असेच म्हणतात, कारण ते नर म्हणजे परमात्म्यापासून उत्पन्न झाले आहे. प्रथम ते नार म्हणजे जल हेच परमात्म्याचे अयन म्हणजे स्थान होते. म्हणून भगवंताला नारायण असे म्हणतात. भगवंत-नारायण हाच सार म्हणजे ग्राह्य आहे. त्याचेच स्मरण करा, असे वेदशास्त्रांनी एकमुखाने सांगितले आहे. सर्व संतही हेच सांगतात, पुराणे हेच सांगतात आणि आत्मसाक्षात्कारी सगळ्या साधूसंतांचा हाच अनुभव आहे. "**नाममंत्र सार। आणिक काही न लगे फार॥**"

ज्ञानराज म्हणतात, "**भुक्ति आणि मुक्ति नामापाशी प्रत्यक्ष। चारी वेद साही शास्त्रे वदताती साक्ष।**" निवृत्तीनाथ म्हणतात, "**निवृत्ति म्हणे हरिनाम पाठ जपा। जन्मांतर खेपा अंतरती॥**" नामदेवराय म्हणतात, "**नामावाचुनि मंत्र नाही त्रिभुवनी। ऐसी बोले वाणी वेदशास्त्री॥**" समर्थ रामदासस्वामी म्हणतात, "**नाम सारांचेही सार। नाम सकळासी आधार। दास म्हणे सांगो किती। नामाविण नाही गती॥**" भगवंताचे

नामस्मरण सोडून तप, कर्म, धर्म कितीही आचरले, तरी तो केवळ श्रमच-श्रम. ते श्रम निष्फळ होतील. व्यर्थ होतील.

हरिपाठाच्या १९व्या अभंगात भगवत्नामाचे माहात्म्य वेदशास्त्रप्रामाण्य महाराज अनेक अंगाने सांगतात. नाथराय पण सांगतात, "**करिता साधनांच्या कोटी। नामाहुन त्या हिंपुटी॥ नाम वाचे आठविता। साधने सर्व येती हाता॥ एक नाम सत्य सार। वाऊगा पसारा शीण तो॥**" प्रत्यक्ष ब्रह्मदेव, भगवान श्रीकृष्णाची स्तुती करतांना श्रीमद्‌भागवतात म्हणतात, "**श्रेयस्तुती भक्तिमुदस्य ते प्रभो। कि शान्ति ये केवळ बोध लब्धये॥**" म्हणजे हे परमात्मन् सर्वतोपरि सर्व कल्याणकारक अशी तुझी भक्ती सोडून जे केवळ ज्ञानप्राप्तीसाठी यातायात करतात, त्यांच्या पदरात केवळ श्रमच पडतात.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेतही भगवान् अर्जुनाला सांगतात, "**क्लेशोऽधिकतरस्तेषांम् अव्यक्तासक्तचेतसाम्॥**" भक्तिमार्गाचा (आणि त्या भक्तितील सुलभ, पण श्रेष्ठ अशा नामस्मरणाचा) त्याग करून योगादिक साधनांचा अवलंब करणाऱ्यांना अधिकतर क्लेशच होतात. ज्यात हरिस्मरण नाही, ते सर्व व्यर्थ, तप व्यर्थ, धर्म व्यर्थ आणि परिणामी दु:खद. श्रीतुकारामबोवा पण सांगतात, नामाशिवाय ज्ञान, ध्यान लटके. वेदपारायण सुद्धा नामाशिवाय लटके. सत्य व दयेने युक्त असा धर्म आणि तपाने युक्त अशी विद्या ही सुद्धा **नामस्मरणाशिवाय**, भक्तीविरहीत अशा जीवाला पावन करू शकत नाही.

अखंड नामस्मरण करणाऱ्याकडून कदाचित वर्णाश्रमधर्मांचे पालन-आचरण झाले नाही, तरी त्याला दोष लागत नाही. एकनाथमहाराजांचा या बाबतीतील निर्वाळा मोठा लक्षात घेण्यासारखा आहे. नाथराय म्हणतात, "**माझी करीता सप्रेम भक्ति। भक्तांची नित्य कर्मे राहती। तेहतीस कोटी ऋषि महंती। संपूर्ण करिती कर्मे त्यांची॥**" एवढच काय, म्हणून नामस्मरण सोडून कर्मकांड विषयक आग्रह धरू नये.

भगवत्नामस्मरणावाचून इतर कर्मे चित्तशुद्धीही करत नाहीत. म्हणून

ज्ञानराजांनी अशी कर्मे करणे म्हणजे व्यर्थ श्रम म्हटले आहे. तसेच त्यांनी जप, तप, कर्म, क्रिया, नेम व धर्म याही बाबतीत म्हटले आहे. भगवत्नामावाचून इतर **देवतांच्या** मंत्रांचा व **काम्यमंत्रांच्या** जपाचा ज्ञानराजमाऊलींनी निषेध केला आहे. कारण असा मंत्रजप संसारबंधन वाढवणाराच ठरतो. राजसदेवतांच्या मंत्राने रजोगुण वाढतो. तामस देवतांच्या स्मरणाने तमोगुण शीगेस पोचतो. मात्र भगवंताच्या नामस्मरणाने, सर्वतोपरि सिद्धि होते. म्हणून ज्ञानराज सांगतात, "**समस्ताही यज्ञांच्यापैकी। जपयज्ञ तो मी ये लोकी। जो कर्मत्यागे प्रणवादिकी। निफजविजे॥ नामजपयज्ञु तो परम। बाधू न शके स्नानादि कर्म। नामे पावन धर्माधर्म। नाम परब्रह्म वेदार्थे॥**"

जपाप्रमाणेच तपाच्याही बाबतीत, भगवत्प्राप्तीचा उद्देश ज्यात नाही, ते तप व्यर्थच आहे असेच म्हणतात. एकनाथमहाराज म्हणतात, "**माझे भक्तिवीण तप। शरीरशोषणादि अमूप। ते पूर्वादृष्टे भोगी पाप। व्यर्थ खटपट उगाचि॥**" कर्म आणि क्रिया यात थोडासा सूक्ष्म फरक आहे. शास्त्रीय ती कर्मे आणि लौकिक त्या साऱ्या क्रिया. भगवत्प्राप्ती ह्या उद्देशाविना अशी व्रते कर्म, क्रिया व्यर्थ.

धर्मानुष्ठानाच्या बाबतीत पण असेच आहे. "**मजविण पाविजे स्वर्ग। तो अज्ञानाचा पुण्य मार्ग॥**" एकंदर विचार करता सर्व धर्मात श्रेष्ठ धर्म म्हणजे भगवत्नामस्मरण व स्तवन. यालाच मान्यता मिळाली आहे. "**एष मे सर्व धर्माणां धर्मो अधिकतमो मत:॥**"

अशा प्रकारे, जीवनातील कोणत्याही गोष्टींचा उद्देश भगवंताशिवाय अन्यच असेल तर अवघे जीवनच व्यर्थ. एक फक्त **भगवंत**/श्रीगुरू हाच जीवनाचा उद्देश, अशा जीवनाला या अभंगात "**हरिपाठी गेले**" असं म्हटलं आहे. खऱ्या भक्ताची भावना **एका नामस्मरणात सर्व साधनांचा अंतर्भाव आहे अशीच असते. याच भावनेने तो अखंड एक नामस्मरणच करत असतो.** या ठिकाणी ज्ञानेश्वमहाराजांनी एक सुंदरसा दृष्टान्त दिला आहे.

महाराज म्हणतात, "**भ्रमर गुंतले सुमनकळिके॥**" भ्रमर हा एखाद्या

कमळावर मकरंदसेवन करत बसला असता, तो इतका तल्लीन होतो की त्याला वेळेचे पण भान राहात नाही. सायंकाळ झाल्यावर कमळ मिटते. तो त्या कमळात गुंतून पडतो. अशा वेळी शुष्क काष्ठानाही पोखरण्याची आपली ताकद, स्वभाव तो विसरून जातो. इतका तो त्या कमळातील रसात लुब्ध झालेला असतो. सिद्धांती हरिनामस्मरणात रंगलेल्या भक्ताची पण अशीच अवस्था होते. या नामस्मरण भक्तीने प्राप्त होणाऱ्या भावोर्मीने भक्त भगवंताशी तन्मय होतो. बाह्य उपाधीचे त्याला विस्मरण होते.

नामस्मरणाने प्राप्त होणाऱ्या भावबळाने भक्त भगवंताशी तन्मय होतो. शिष्य श्रीसद्‌गुरूस्वरूपाशी, गंगा सागराशी; त्याला भगवंताशिवाय बाकी सगळ्या बाह्य उपाधीचा विसर पडतो आणि त्याला भावसमाधी लाभते. ह्या भावसमाधीचे वर्णन करण्यासाठी श्रीज्ञानराजांनी "**निवांत**" ह्या शब्दाची योजना केली आहे. "**हरिपाठी गेले ते निवांतची ठेले।**" **भ्रमर गुंतले सुमनकळिके।** आत्मतृप्त, परमशांत, निश्चिंत असतो. सुखरूपता, ज्ञानस्वरूपता अशी **निवांतता**. अशा निवांतपणी चित्ताच्या व्याकूळतेचा परम अभाव असतो. कोणत्याही विकाराचा चित्तावर परिणामच न होणं हे निवांतपण. अशी परमोच्च अवस्था फक्त आणि फक्त नामानेच लाभते.

हरिपाठी जाणे (माऊलींचा शब्द "**गेले**") म्हणजे सर्व इंद्रियांच्या व त्याचबरोबर अंत:करणाच्या सर्व वृत्ती भगवंताच्या नामस्मरणात लीन होणे. "**डोळा जे देखावे। का कानी हन ऐकावे। मनी जे भावावे। बोलावे वाचे।। ते आंतुबाहेरी आघवे। मीचि करूनि घालावे। मग सर्वी काळी स्वभावे। मीचि आहे।।**" असं ज्ञानेश्वरमहाराजांनी वृत्ती हरिरूप होण्याचं वर्णन केलं आहे. हाच निवांतपणा सर्व नामस्मरण करणाऱ्या संतांना अनुभवास येतो. अशा निवांतपणाचा अनुभव घेताना श्रीतुकोबारायांच्या हृदयातून सहज उद्‌गार येतात, "**अचल न चले, ऐसे झाले मन। धरूनि निजखुण राहिलोसे।। मन स्थिर झाले, झालेसे निश्चल। वारिले सकळ आशापाश।। तुका म्हणे माझी मावळली खंती। समाधान चित्ती सर्वकाळ।।**"

"**हरिपाठी गेले**" याचा असाच दुसरा एक छान अर्थ आहे, "**हरिस/**

**श्रीगुरूस अनुसरणे.**'' भगवंताला अनन्य भावाने शरण गेलं म्हणजे मग हा निवांतपणा प्राप्त होतो. श्रीमद्‌भगवद्‌गीतेत भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला १८व्या अध्यायात सांगतात, ''**तमेव शरणं गच्छ, सर्वभावेन भारत। तत् प्रसादात् परां शांति, स्थानं प्राप्यसि शाश्वतम्॥**'' असा निवांतपणा, शाश्वत निवांतपणा जीवाला अन्य कधीच, कोठेही आणि कशानेच लाभत नाही.

श्रीतुकाराममहाराज एका अभंगात म्हणतात, ''**आम्हा भव चिंता नाही धाक। जन्ममरण काही एक। झाला इतहलोकी परलोक। आले सकळिक वैकुंठ॥**'' तर दुसऱ्या एका ठिकाणी म्हणतात, ''**न कळे दिवस की राती। अखंड लागलीसे ज्योती (रूप)। आनंद लहरीची गती। किती वर्णू तया सुखा॥**'' इंद्रिय आणि त्यांचे विकार अशा षट्पदांनी युक्त असा जीवरूप भ्रमर जर हरिचरणकमल परागाचे सेवन करील तरच त्यास हा निवांतपणा प्राप्त होईल. श्रीगुरूज्ञानेश्वर महाराज जीवाला भ्रमराच्या रूपकातून उपदेश करतात-''**चरण कमळदळु रे भ्रमरा। भोगी तू निश्चळु रे भ्रमरा॥**''

तुकाराममहाराज याबाबतीत सांगतात, ''**होऊनि भ्रमर, पाऊलाचे सुख। घेती भक्त मुख लावूनिया.**'' तर श्रीएकनाथमहाराज म्हणतात, ''**गुंतला भ्रमर कमळिणी कोशी। आदरे आमोदासी सेवीतसे॥ तैसे कृष्णनामी लागता ध्यान। मन उन्मन होय जाण भगवत्‌नामी॥**''

भक्ताचे चित्त अखंड भगवदाकारच असते. भागवतात गोपींचे वर्णन करताना श्रीकृष्णप्रभू, उद्धवाला सांगताहेत, ''**तान् मन्‌मनस्क: मत्‌प्राण; मर्दोत्यक्तदेहिक:॥**'' श्रीमद्‌भगवद्‌गीतेत १०व्या अध्यायात भगवान् अर्जुनाला सांगताहेत ''**मन्‌चित्त: मद्‌गतप्राण:**'' श्रीज्ञानोबारायांचे त्याच्यावरील अलंकरण तर फारच छान!!! ''**चित्ते मीचि जहाले। मियाची प्राणे धाले। जीवो मरो विसरले। बोधाचिया भूली॥**''

भगवंताच्या ठिकाणी नामस्मरण करणाऱ्या भक्तांची, अखंड, गाढ, प्रेमसमाधी राहते आणि मोठ्या आश्चर्याची, तेवढीच आनंदाची आणि भाग्याची गोष्ट म्हणजे भगवंत स्वत: आपल्या कृपाशीर्वादबळाने ती कधीच

भंगू देत नाही. केवढाही मोठा योगी जरी असला तरी, योगसमाधीचे कधी ना कधी व्युत्थान होतेच होते. पण भक्ताची समाधी "**संजीवन समाधी**" असते.

समाधी दोन कारणांनी भंगू शकते. भगवंताशी झालेल्या ऐक्याची अहंता आली तर (रासक्रीडा प्रसंगी गोपींना "**ग**" ची बाधा झाली; अन् काय? भगवंत दिसेनासा झाला. घडल्या अपराधाचा उच्चार झाला. भगवान पुन: प्रकट झाले) त्यांचा अहंकार गिळून टाकला किंवा प्रारब्धभोगाकरिता वृत्ती देहावर आली तर!!! पण भगवान स्वत: भक्तहृदयात कायमस्वरूपी राहात असल्याने, भगवंतच सर्व व्यवहार करत असतो भक्तासाठी, "**भक्त समागमे सर्व भावे हरि। न सांगता करी सर्व काम॥ जयाचे चोखटे मानसी। मीचि होऊनि असे क्षेंम्रन्यासी।**" आणि या सर्वांचा परिणाम तुकोबाराय फार छान सांगतात, "**तुका म्हणे मग नये वृत्तीवरी। सुखाचे शेजारी पहुडलो॥**" अखंड नामस्मरणाने प्राप्त होणारा निवांतपणाच ज्ञानोबाराय या हरिपाठातील एकोणीसाव्या अभंगाच्या तिसऱ्या चरणात सांगताहेत, "**हरिपाठी गेले ते निवांतची ठेले। भ्रमर गुंतले सुमनकळिके॥**"

नामस्मरणाने भक्ताच्या ठायी अहं उठत नाही आणि उरतही नाही. श्री तुकाराम महाराज म्हणतात, "**अहंकार गेला। तुका म्हणे देव झाला**" भगवंत अशा नामधारक भक्ताचं सारं-सारं काही सांभाळतो, निवारण करतो. योगक्षेमाचा तर प्रश्नच येत नाही आणि हे सर्व भक्तांनी न सांगता सवरता.

एक सत्यकथा आहे. पंढरपुराजवळ एक ब्राह्मण भगवद्भक्त अयाचित वृत्तीने राहत होता. "भगवद्गीता" त्याला जीव की प्राण!! आपण रोज पाठ करावयाचा; आपल्या मुलांना पण शिकवायचा. गावांतील मुलांनाही शिकवायचा. विद्यार्थी आपणहून जे देत असत, तेवढेच स्वीकारावयाचा. एक दिवस घरी आला तर पत्नीने खूप तोंडसुख घेतले. घरात काही नाही. काहीतरी आणायच बघा म्हणाली. खूप संतापली.

यानं सारं शांतपणे ऐकली तीच वाङ्गंगा. गीता उघडली. श्लोक आला, "**योगक्षेमं वहाम्याहम्।**" यानं त्या पदावर फुली मारली. बाहेर पडला. दुकानापुढं उभा राहावयाचा. पण उधार मागावयास जीभ धजेना. हात पसरणं तर माहीतच

नाही. रिक्त हातांनी घरी परतला. पत्नीनं पुन: धारेवर धरलं!! पण वेगळाच आरोप करू लागली. म्हणाली - मुलाला किती मारायचं? त्याच्या अंगावर फुल्या मारल्यासारखे सगळे वळ; पण तरीही बिचारा सगळा शिधा-सामान घेऊन आला. उचलत नव्हतं; तरी वाहून घेऊन आला होता. मला दया आली त्याची. पाणी सुद्धा घेतलं नाही. निघून गेला. एवढ्याश्या मुलाबरोबर एवढं ओझ पाठवतात का?

ह्या भक्तराजानी ऐकलं मात्र, तडक गीता उघडली. फुली खोडून टाकली. भगवंताची क्षमा मागितली; ढसाढसा रडू लागला. ‘‘देवा तुझ्या असीम कृपेवर, तुझ्या प्रतिज्ञापूर्वक आश्वासनावर मी शंका घेतली, तुझ्या कृपावचनाला काळं की रे फासलं. मला क्षमा कर. तूच एक भक्तकरूणापारावार दयाघन आहेच. तूच सांभाळतोयस. आला कां लक्षात सत्यकथेचा अर्थ??? ज्ञानोबाराय म्हणतात, **‘‘ऐसे अनन्य योगे। विकले जीवे, मने, अंगे। तयांचे कायी एक सांगे?। जे सर्व मी करी।।’’** या अभंगाच्या (हरिपाठातील १९व्या) शेवटच्या चरणात महाराज सांगतात, **‘‘ज्ञानदेवी मंत्र, हरिनामाचे शस्त्र। यमे कुळ गोत्र वर्जियेले।।’’** हरिनाममंत्र एक श्रेष्ठ असे अमोघ, धारदार शस्त्र आहे.

या शस्त्रापुढे इतरांचे काय? पण प्रत्यक्ष यमाचेही काही चालत नाही. तो याच्याकडे तर सोडाच, पण यांच्या कुळगोत्राकडेही वाकड्या नजरेने पाहू शकत नाही. नामाशिवाय इतर सगळी शस्त्रे-अस्त्रे जीवंत असलेल्याला मृत्यूच्या मुखात पोचविण्याचेच काम करतात; पण ‘‘**हरिनाम**’’ हे शस्त्र असे आहे - अद्वितीय आहे की, ते ज्याच्याजवळ आहे, त्याच्या हरिपुरी सुद्धा यमराज फिरकू शकत नाही. यमाला भीती निर्माण करणारे हे शस्त्र आहे. यमाची सत्ता कुणावर नाही? पण नामधारकावर यमाची सत्ता चालत नाही. कारण नामधारकाच्या सर्व पापांची होळी ‘‘**नामाने**’’ झालेली असते. **‘‘ऐकोनि नामाचा गजर। ठेला यमलोकीचा व्यवहार। बिचारे रिकामे यमकिंकर। यमे पाशभार लपविले।।’’** असं अण्णा म्हणतात.

श्रीमद्भागवतात भगवान श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात, ‘‘**माझे नाम**

**ब्रह्मास्त्र जगी। महापापे ती बापुडी मुंगी। नामापुढे उरावयालागी। बळ त्यांच्या अंगी असेना॥''** विष्णुपुराणात यम आपल्या दूतांना सांगतो, त्यांच्या कानात सांगितलन् की - भगवत्कथेत, भगवद्नामस्मरणात, भगवद्गुणगानात, जे निमग्न असतील त्यांच्याजवळ चुकून सुद्धा जाऊ नका. मी अन्य सर्व जीवमात्रांना, त्यांच्या त्यांच्या पापकर्मानुसार दंड देण्यास समर्थ आहे. पण नामस्मरण करणाऱ्यांना दंड करण्यास समर्थ नाही. एक तर ते दंडास पात्रच नाहीत. श्रीहरीने आपल्या गदेने, चोहोबाजूंनी रक्षण केलेल्या संतांच्या समीपही तुम्ही कधी जाऊ नका. त्यांना दंड करण्यास प्रत्यक्ष काळाचेही सामर्थ्य नाही. **''यमधर्म सांगे दूता। जाऊ नका त्यांच्या प्रांता। जेथे भगवद्नाम वार्ता। तया देशा न जावे॥''**

नामदेवराय म्हणतात, **''यम सांगू दूता कानी। तुम्ही जाता मेदिनी। विष्णुभक्त चुकवुनि। येर बांधोनि आणा॥''** काय नामाचा प्रचंड प्रताप आहे पहा - **''दड दड, दुड दुड, पळ सुटलां, कळिकाळा बापुडियारे। शिवनाम शितल सुखी सेवी का कापडियारे॥''**

तुकाराममहाराज म्हणतात, **''यमधर्म सांगे दूता। तुम्हा नाही तेथे सत्ता। जेथे होय हरिकथा। सदा घोष नामाचा॥ नका जाऊ तया गावा। नामधारकाच्या शिवा। सुदर्शन यावा (गदा)। घरटी फिरे भोवती॥''**

नामधारकाच्या घराभोवती श्रीहरीचे सुदर्शन चक्र सतत फिरत असते. **''चक्र गदा घेऊनि हरि। उभा असे त्याचे द्वारी। लक्ष्मी कामारी। ऋद्धि सिद्धि सहित॥ तुका म्हणे निर्वाणीचे। शस्त्र साचे एक हे॥''** यमाचा पाश? चुकवण्याकरिता भगवदनाम-हरिनाम-गुरूनाम (सगळे एकच) हा निर्वाणीचा अचूक रामबाण आहे. **''तुका म्हणे वाण। हाती हरिनाम तीक्ष्ण॥ आनंद म्हणे नामापरते। शस्त्र नाही कलीयुगी॥''** नाम हे अंत:शत्रूंचा म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, अभिमान यांचा नाश करते. इतर शस्त्रे हाती धरणे महत्प्रयासाचे. नामशस्त्राचे तसं नाही. **''नाम सुलभ, सोपारे॥''**



# अभंग क्र. २०

**नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी। पापे अनंत कोडी गेली त्यांची॥१॥**

**अनंत जन्मांचे तप एक नाम। सर्व मार्ग सुगम हरिपाठ॥२॥**

**योग याग क्रिया धर्माधर्म माया। गेले ते विलया हरिपाठी॥३॥**

**ज्ञानदेवी यज्ञ याग क्रिया धर्म। हरिविण नेम नाही दुजा॥४॥**

हरिपाठातील या विसाव्या अभंगात ज्ञानेश्वर महाराजांनी प्रथम वैष्णवांचा गौरव करून, नंतर नामस्मरणाचेच महत्व सांगितले आहे; आणि शेवटी तर त्यांनी आपल्या स्वानुभव सांगितलाय, की मी एका हरिनामाविना दुसरा कोणचाच नेम केलेला नाही. याची सुरवात अशी आहे - "**नाम संकीर्तन वैष्णवांची जोडी॥**" एक नामसंकीर्तन हीच वैष्णवांची जोडी म्हणजे ठेवा आहे. हरिनाम व संकीर्तन ही वैष्णवांची जोडी आहे. नामाशिवाय त्यांना दुसरा विषयच नसतो.

प्रथमत: वैष्णव कोण? हे विचारात घेतले पाहिजे. भागवत धर्माचे निष्काम आचरण करून भगवंताची अगदी नि:सीम उपासना करणाऱ्यांना आणि भक्तीप्रेम करणाऱ्याला वैष्णव असे म्हणतात. या वैष्णवांचे जोड कर्तव्य आहे. नामस्मरण व संकीर्तन. "**वैष्णव बोलिले नामस्मरणी। राम कृष्ण उच्चारू॥**" श्रीतुकोबाराय म्हणतात, "**वैष्णव तो जया। अवघी देवावरी माया॥**" तर श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराजांनी वैष्णवांची अंतर ठळक लक्षणे सांगताना म्हटले आहे, "**सतत कृष्णमूर्ती सावळी। खेळे ज्याचे हृदय कमळी। शांति क्षमा तया जवळी। जीवे भावे अनुसरल्या॥ सहस्त्रनामाचे हतियार। शंख चक्रांचे श्रृंगार। अखिल वैराग्याचे थोर। केला मार षड्वर्गा॥**" एकनाथमहाराज म्हणतात, "**निमिषार्ध त्रुटी लवक्षण। जे न सोडिती नामस्मरण। वैष्णवामाजी अग्रगण्य। जाणाते उत्तम भक्त॥**"

नामदेवराय म्हणतात, "**नामा म्हणे नाम केशवाचे घेसी। तरीच वैष्णव होसी रे॥**" जे वैष्णव आहेत, त्यांच्या आवडीचा एकमेव विषय भगवन्नामसंकीर्तन हाच आहे. अशा अखंड नामसंकीर्तनाने त्यांची कोट्यावधी पापे नष्ट होतात.

"**पापे अनंत कोडी गेली त्यांची॥**" श्रीमद्‌भगवतात म्हटले आहे, "**या एतद् देवदेवस्य विष्णोः कर्माणि जन्मच। कीर्तनेद् श्रद्धया मर्त्यः सर्व पापैः प्रमुच्यते॥**" गीतेत भगवान श्रीकृष्ण म्हणतात, "**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥**" नाथराय म्हणतात, "**अल्प ही माझी भक्ती। श्रद्धायुक्त प्रवेशल्या चित्ती। संचित क्रियमाण पाप पंक्ती। होय जाळिती निःशेष॥**" पाप निशेःष जळून जातं म्हणजे पातकाचे बीजच नामाने नष्ट होते. पातकांचे बीज आहे विकार सर्व विकारांचा नाश एका भगवन्नामस्मरणाने होतो.

तुकोबा म्हणतात, "**षड्र्मी शत्रू जिंकिले अनंता। नामाचिया सत्ताबळे तुझ्या। नाम घेता क्रोधाचे दहन। होय अभिमान देशोधडी॥**"

पुढील दुसऱ्या चरणात ज्ञानराज सांगताहेत, "**अनंत जन्मांचे तप एक नाम।**" भगवन्नाम हे सामान्य नाही. अनंत जन्मात केलेल्या तपाचे हे फळ आहे. वाणीद्वारा एकवेळ नाम येणे, किंवा एका **नामावर विश्वास** राहणे हे अनंत जन्मांच्या तपाचे फळ आहे. भगवान अर्जुनाला सांगताहेत, "**जयाचिये वाचे पुढा भोजे। अखंड नाम नाचत असे माझे। जे जन्मसहस्त्री वोळगिजे। एक वेळ यावया॥ तप केले असेल कोटी। तरीच नाम येईल॥**" नामदेवराय म्हणतात, "**अनंत पुण्यराशी घडेल ज्यापाशी। तरीच मुखासी नाम येत॥**" नाथराय म्हणतात, "**अनेक जन्मांचे सुकृत पदरी। त्याचे मुखी हरी पैठा होय॥**"

सहस्त्रावधी जन्मात तप करून, ज्ञान, योग करून ज्यांची पापे क्षीण झाली आहेत अशा अंतःकरणातच श्रीकृष्ण भक्ती उत्पन्न होते; नामाविषयी

विश्वास दृढ असतो. अनंत जन्मांचे **तप** आणि एक **नाम** सारखे आहे. म्हणजे अनंत जन्मांच्या तपाचे फळ व एका नामाचे फळ समान आहे. किंबहुना अनंत जन्मांच्या तपाने जे साध्य होत नाही ते फक्त एक वेळ **पूर्ण प्रेमाने** नाम घेतल्याने प्राप्त होते. ''**नारायण नाम घालिता तुकासी। न येती या राशी जप तीर्थे॥**'' नामदेवराय म्हणतात, ''**सर्व काळ हरिनाम। हेचि तपामाजी तप॥**''

अनंत जन्मांचे तप आणि एक नाम समान आहे. एवढंच नाही तर किंबहुना अनंत जन्मांच्या तपाने जे साध्य होत नाही, ते एकवेळ पूर्णप्रेमभावाने नाम घेतल्याने अगदी सहजी प्राप्त होते. नामस्मरणात एवढी सिद्धी असल्याचे कारण असे की, आपल्या नावावर भगवंताचे विलक्षण प्रेम आहे. ''**आवडे तयाचे नाम घेता तयासी॥**'' भगवंताच्या नामावर प्रेम, श्रद्धा, विश्वास न ठेवता, अन्य साधनांची उठाठेव करणारा, भगवंताच्या प्रेमाला पात्र होत नाही. भगवंताचे त्याच्यावर प्रेम नसते.

नाथराय याबाबत काय म्हणतात पहा, ''**नाम स्मरतया भक्ता। अतिशय आवडी अच्युता। दासांची अणुमात्र अवस्था। निजांगे सर्वथा निवारी स्वये॥ या लागी हरिकीर्तनी गोडी। जयासी लागली धडफुडी। त्यासी नाना साधनांच्या कोडी। सोसावया साकडी कारण नाही॥**'' भगवान नामस्मरण करणाऱ्या भक्ताला हमी देतात की, ''**तिहीं जेवेळी मी स्मरावा। ते वेळी स्मरला की पावावा?॥**''

तपादिकांनी प्राप्त होणाऱ्या सकळ सिद्धी एका नामस्मरणाने/नामसंकीर्तनाने मिळतात. कर्माने चित्तशुद्धी, उपासनेने एकाग्रता व आत्मज्ञानाने जीवब्रह्मैक्य ज्ञान, अशा प्रकारे तीन साधनांनी तीन लाभ होतात. हे तिन्ही लाभ केवळ एका नामस्मरणाने होतात. बरं इतके श्रेष्ठ फळ देणारे साधन असूनही, अन्य सर्व साधनापेक्षा हे अतिसुलभ आहे. काय मौज आहे नां? ज्ञानराज म्हणतात, ''**सर्व मार्ग सुगम हरिपाठ॥**'' कर्माची सूक्ष्मता, तपाची कठोरता, व्रतवैकल्याची कर्कशता आणि वैराग्याची तीव्र धग यात नाही.

श्रीतुकोबाराय सांगतात, ‘‘**सोपे हे साधन लाभ येती घरा। वाचेसी उच्चारा रामहरी। न लगती कष्ट, न लगती सायास। करावा अभ्यास एक नामी॥ तुका म्हणे काही न वेचिता धन। जोडे नारायण नामासाठी॥**’’ नामस्मरणाच्या सोपेपणाची मीमांसा-कारणमीमांसा हीच आहे की, भगवंताला प्रिय असे हे भगवत्प्रिय साधन आहे. यामुळे नामधारकाला कोणतेच कष्ट पडत नाहीत; आणि विशेष म्हणजे या मार्गात भगवान स्वत: साहाय्यक असतात. भगवंत सर्व प्रकारे त्याचे रक्षण करत असतात. ‘‘**योग याग क्रिया धर्माधर्म माया। गेले ते विलया हरिपाठी॥**’’ योग यागादि सर्व साधने श्रीहरीप्राप्तीस प्रत्यक्ष साधनभूत होत नसतात. भगवंताच्या प्राप्तीचे प्रत्यक्ष कार्य शुद्ध भक्तीप्रेमाने नाम घेतल्यानेच होते.

आत्मज्ञानाने देहात्मबुद्धीरूप पाप जरी नाहीसे होत असले तरी प्रारब्ध कर्म राहतेच. जोपर्यंत पापबुद्धी आहे तोपर्यंत ज्ञान उत्पन्न होत नाही; आणि जोवर ज्ञान उत्पन्न होत नाही तोवर पापबुद्धी संपत नाही. हा तिढा सुटण्याचा नामस्मरण हाच एक मार्ग आहे. नामस्मरणाने संचिताचा पूर्ण नाश होतो; क्रियमाणपण बाधत नाही; व आत्मज्ञान होऊन पुढे-पुढे प्रारब्धही भक्तीने क्षीण होते. या खेरीज नामस्मरणाने चित्त शुद्ध झाले असताना ज्ञान दृढ होते. नामा इतकी चित्तशुद्धी अन्य कोणत्याही साधनाने होत नाही.

नामस्मरण हा एक महान यज्ञ आहे आणि अत्यंत श्रेष्ठ असा महायोगही आहे. भगवान श्रीकृष्णांनी गीतेत विभूती योगात ‘‘**यज्ञांना जप यज्ञोऽस्मि**’’ म्हणजे सर्व यज्ञात ‘‘**जपयज्ञ**’’ हीच आपली विभूती आहे असे सांगितले आहे. श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ‘‘**नामजपयज्ञ तो परम। बाधू न शके स्नानादि कर्म। नामे पावन धर्माधर्म। नाम परब्रह्म वेदार्थे॥**’’ तसेच नामस्मरण हा मोठा योग आहे. या योगात इतर सर्व योगांचा अंतर्भाव होतो. गीतेत भगवान सर्व योग्यात श्रेष्ठ योगी कोण? हे सांगतात. ‘‘**योगिनामपि सर्वेषां मद्‌गतेनान्तरात्मना। श्रद्धावान् भजते यो मां समे युक्ततमो मत:॥**’’ नामस्मरण हा महायोग आहे.

एकनाथमहाराज म्हणतात, "**हरिभक्ति दिव्यांजन। ते लेवूनि भक्तजन। साधिती भगवत्‌निधान। निजभजन महायोगे॥**" नामस्मरणाने-भजनाने वृत्तींचा निरोध होऊन चित्तास एकाग्रता प्राप्त होते. शब्द हा आकाशाचा गुण असून कानाचा विषय आहे. सर्व विषयाचे ज्ञान शब्दरूपाने कानास होते. मन हे शब्दामध्ये-नादामध्ये तल्लीन होते, तितके इतर विषयात होत नाही.

मन हे संकल्प विकल्पात्मक आहे. संकल्प-विकल्प बहुदा दोन प्रकारचे असतात. भूतस्मरण व भविष्यचिंतन या दोन गोष्टी मनात सातत्याने संकल्प-विकल्पाच्या विचाराने स्फुरत असतात. नामस्मरणाच्या **सातत्याने** भूतस्मरण व भविष्यचिंतन या दोन्ही वृत्ती बंद होऊन सहजच चित्तवृत्ती निरोध होतो. नामस्मरणाने चित्ताचा लय होतो.

भगवत्‌नाम हापण शब्दच आहे. शब्दशास्त्राप्रमाणे होय नां? मग हरिनाम आणि इतर शब्द यात काही फरक आहे की नाही? तर फार मोठा फरक आहे. शब्दाचा अर्थ त्याला **वाच्य** म्हणतात. हा अर्थ म्हणजे वाच्याला प्रकट करणारा शब्द त्याला **वाचक** असे म्हणतात. यालाच वाच्य-वाचक संबंध म्हणतात. पण भगवंताचे नाम आणि नामी यांचा असा वाच्य-वाचक संबंध नाही. तर "**नाम परब्रह्म वेदार्थे॥**" असा श्रीज्ञानराज निर्वाळा देतात.

भगवन्नामावाचून इतर शब्दांमध्ये जडता (म्हणजे इतर शब्द जडाचे प्रकाशन करत असल्याने) मन जरी त्यात एकाग्र झाले तरी त्या मनाची या इतर शब्दांनी शुद्धी होत नाही. उलट ते अधिक मलीन होण्याचाच संभव जास्त. परंतु भगवन्नामाचा त्याच्या गुणस्मरणासहित उच्चार करणे व त्याचे अखंड स्मरण करणे हे अति पवित्र आहे. अशा नामस्मरणाने मन एकाग्र तर होतेच, पण त्याबरोबर त्याची शुद्धता पण होते. म्हणून तर **नामस्मरण** हा उत्कृष्ट उपाय आहे. प्राणायामादि साधनाद्वारे जे क्लेश होतात ते न होता पण योगशास्त्रात पतंजलींनी सांगितलेले "**चित्तवृत्ती निरोध**"रूपी फळ अनायसे प्राप्त होते.

श्रीतुकोबाराय म्हणतात, “**हेचि एक सर्व साधनाचे मूळ। आतुडे गोपाळ येणे पंथे॥**” एका नामस्मरणात सकळ धर्माचा/परमधर्माचा अंतर्भाव होतो. “**सकळ धर्माचे कारण। नामस्मरण हरिकीर्तन। दया क्षमा समाधान। संतजन साधिती॥**” नामस्मरणाने सकळ अधर्माचीही निवृत्ती होते. इतकेच नाही तर नामसंकीर्तनाने अधर्मप्रवृत्तीच नष्ट होते. इतकेच काय? पण धर्माधर्माचे मूळ जी माया तीही एका नामाने विलयास जाते.

भगवान तर गीतेत सांगतात, “**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**” श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, “**हे आदिपुरूषाची माया। ब्रह्मेयाहि नयेचि आया।**” असा हा या मायेचा प्रभाव आहे. पण अशा कठीण मायेची निवृत्ती केवळ हरि-हरि अशा हरिपाठानेच कशी होते, हे पाहणे आवश्यक आहे. पण तत्पूर्वी माया म्हणजे तरी काय? तिचे स्वरूप काय? कार्य काय? याचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. वेदान्तशास्त्रात, माया, अविद्या, प्रकृती, कल्पना, अज्ञान ही एका मायेचीच नावे आहेत.

चतु:श्लोकी भागवतात मायेची व्याख्या अशी केली आहे, “**परमात्मा हे अधिष्ठान ने जाणता त्याखेरीज अन्य द्वैत भान ही माया.**” स्वये आनंदघन असणाऱ्या आत्मस्वरूपाचे नित्य निर्मम स्फुरण. अशा स्वरूपाच्या ठिकाणी जे “**मी**” पण स्फुरते ते माया कार्य. जीव स्वसामर्थ्याने या मायेतून तरत नाही. सर्व भावाने भगवंताला, श्रीगुरूला शरण जाऊन अखंड भजन/ नामस्मरण हेच मायानिवृत्ताचे एकमेव साधन आहे. तुकोबाराय म्हणतात, “**हरि हरि तुम्ही म्हणारे सकळ। तेणे मायाजाळ तुटतील॥**” सारांश काय तर भगवन्नामानेच भगवत्कृपाद्वारा मायेचा विलय होतो.

मायेच्या तीन शक्ती आहेत. मळ, आवरण आणि विक्षेप. नामाने मल म्हणजे पापदोष नाहीसा होतो. विक्षेप म्हणजे चंचलता नाहीशी होणे; व विषयाकाररहित मन होणे म्हणजेच आवरण भंग. नामस्मरणाने मन विषयरहित होऊन भगवद्रूप होते. अशा प्रकारे माया पूर्णत: संपते.

या अभंगाच्या शेवटच्या चरणात ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, “**ज्ञानदेवी**

**यज्ञ, याग क्रिया धर्म। हरिवीण नेम नाही दुजा।।**'' या चरणातून महाराजांनी आपली नामनिष्ठा प्रकट केली आहे पहा. ते म्हणतात - मला यज्ञ, याग, योग, क्रिया, धर्म हे सर्व एका हरिनामातच आहे. त्यावाचून मी दुसरा कोणताही **नेम** केला नाही. ज्ञानराजांचे नामाविषयी असणारा प्रेम, अनुभव, निष्ठा आपण लक्षात घेऊन नाम घ्यावयास हवे नाही का? नामाची खरी शक्ती ज्याला समजली, किंवा नामावर ज्याची पूर्ण निष्ठा आहे तो इतर साधनांची उठाठेव कधीच करणार नाही खरं ना? श्रीहरि हा स्वतःच यज्ञस्वरूप आहे. गीतेत भगवान म्हणताहेत, ''**अहं क्रतुः, अहं यज्ञः।।**'' सर्व धर्मस्वरूप एक भगवंतच आहे. ''**धर्माची तू मूर्ती। पाप पुण्य तुझे हाती।।**'' असं श्रीतुकाराममहाराज म्हणतात. ज्ञानोबारायांना या हरिस्वरूपाची पूर्ण जाणीव हरिनामातच इतर सर्व नेम-व्रत-वैकल्य यांचा अंतर्भाव होतो असा विश्वास. भावार्थ रामायणात श्रीरामचंद्र सांगतात, ''**नित्य स्मरे तो हे नाम। तो जाणावा मजचि सम। पुरूषामाजी पुरूषोत्तम। सकळ नेम तेणे केला।।**'' ''**हाचि माझा नेम, हाचि माझा धर्म। नित्यवाचे नाम विठोबाचे।। हेच माझे कर्म हाचि माझा धर्म। नित्य वाचे नाम विठोबाचे।।**'' म्हणून ज्ञानराज सांगतात, ''**हरिमुखे म्हणा, हरिमुखे म्हणा।**''



# अभंग क्र. २१

**काळ वेळ नाम उच्चारिता नाही। दोन्ही पक्ष पाही उद्धरती॥१॥**

**रामकृष्णनाम सर्व दोषां हरण। जडजीवा तारण हरि एक॥२॥**

**नाम हरि सार जीव्हा या नामाची। उपमा त्या दैवाची कोण वानी॥३॥**

**ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ। पूर्वजा वैकुंठ-मार्ग सोपा॥४॥**

भगवत्प्राप्तीची किंवा चित्तशुद्धीची जी अनेकानेक साधने शास्त्रकारांनी सांगितली आहेत. त्यांच्या आचरणाकरिता योग्य काल, देश, अवस्था, परिस्थिती यांची आवश्यकता असते. जीवनाच्या प्रत्येक गोष्टीमध्ये काळाचे बंधन आहे. उदाहरणार्थ नित्य कर्म करण्यास उपनयनोत्तर कालाची, यज्ञादिक कर्माला गृहस्थाश्रम प्रवेशोत्तर कालाची गरज आहे. एवढंच नाही तर काही यज्ञांना विशिष्ट काल, ऋतू, महिना, तिथीची अपेक्षा असते. संध्यावंदनासारख्या नित्य कर्माला पण नियत कालाची बांधिलकी आहे. त्या त्या काळीच ते ते कर्म करावे लागते. तो काळ टळला तर प्रायश्चित कर्म करावे लागते.

काही मंत्रांच्या सिद्धीकरता चंद्र-सूर्याच्या ग्रहण काळाची गरज आहे. नैमित्तिक कर्मे त्या त्या निमित्तभूत काळातच करावयास हवीत. तरच ती फलप्रद होतात. श्राद्ध-पक्ष करावयाचं तर ते ठराविक त्या त्या तिथीलाच करावं लागतं नां !!! काम्य कर्मालाही विशिष्ट तिथी, नक्षत्र, करण, योग जुळून यावे लागतात. तसेच चांद्रयणादि प्रायश्चित कर्मांचे; ती कालाधीनच आहेत. व्रत, तीर्थ, दान, तप, योग या सगळ्याच कर्मांना एका एका विशिष्ट कालाची, देशाची गरज आहे. त्या त्या काळातच ती करावी लागतात. तरच फल मिळण्याचा संभव; एरव्ही नाही.

सारांश काय तर सर्व साधनांना योग्य देश, काळ, वर्तमानाची गरज

आहे. ज्याला हा देश, काल, वर्तमान साधेल तोच मनुष्य यांचे आचरण करू शकेल व ज्यांना हे सर्व साधणार नाही ते त्या साधनांचे आचरण करू शकणार नाहीत. वरील सर्व साधने आचरताना देश, काल इत्यादींची पराधीनता आहे. पण **नाम** हेच एकमेव असे साधन आहे की ज्याला देश, काल, अवस्था यांचे कशाचेच पारतंत्र्य नाही. कोणतीच बाह्य गोष्ट नामसाधनेला प्रतिबंध करू शकत नाही. नाम पवित्र आहे, नाम निर्लेप आहे.

नामच अशी एकमेव साधना आहे, की जी सर्वतंत्र स्वतंत्र आहे. देश, काल, अवस्था अंत:करणाची शुद्धी इत्यादी कोणत्याही गोष्टींची अपेक्षा नसताना अगदी स्वतंत्ररित्या करता येणारी साधना आहे. नाम हे वस्तुतंत्र आहे. जसा श्वासोच्छ्वासास मुहूर्त पाहावा लागत नाही. देश काळाचे पारतंत्र्य नाही. तो सदा सर्वदा होतच असतो. इतकेच नाही तर तो जीवनाचा आधार आहे. तसंच हरिनाम हे जीवनाधार आहे. म्हणून कवी म्हणतात, ‘‘**अहो येता जाता, उठता बसता, कार्य करता। जनी देता घेता, वदनी वदता, ग्रास गिळीता। घरी दारी, शय्येवरी-रतिसुखाचे अवसरी। समस्तांची लज्जा त्यजुनी भगवत् चिंतन करी॥**’’

पद्मपुराणात भगवत्‌वाक्याचा अर्थ असा आहे - भगवंताच्या मंगल नामस्मरणाने, सर्व पापांचे निरसन होते; पापमुक्त होता येते. नामस्मरण दिवस, रात्र, दुपार, सायंकाळ सर्व काली करता येते. अशुचि अथवा शुचि या सर्व काळी नाम घेता येते. अहर्निश नाम घेता येते. नामस्मरण करण्यासाठी कोणत्याही कालाचा, देशाचा निर्बंध नाही. नामाला विधी-विधान नाही. कर्मबंधन नाही. मांडामांड नाही. काही-काही लागत नाही.

याचे रहस्य असे आहे की, ह्या साधनात स्वत:ची पूर्ण शक्ती आहे. नामाला स्वयंभू सत्ता आहे. त्याला अन्य कशाची गरज नाही. एखादा शिकारी जेंव्हा शिकार करण्यास जातो, त्याला आपल्या बरोबर शस्त्रास्त्रे घ्यावी लागतात; पण वनराज सिंह जेंव्हा शिकारीला निघतो तेंव्हा त्याला अन्य

कोणत्याही साधनांची गरज नसते; किंवा सूर्य अंध:काराचा नाश करण्याकरिता अन्य कोणाचीही, कशाचीही मदत घेत नाही.

श्रीगुरूज्ञानेश्वरमाऊली म्हणतात, **''तरी भानु हा तेजे। नापेक्षा जेवी विराजे। का सिंह न पाहिजे। जावळिया।।''** सिंह आणि सूर्याप्रमाणेच नामाचे सामर्थ्य स्वतंत्र आहे त्याला कोणत्याही बाह्य साधनांची गरज नाही.

हरिपाठातील २१व्या अभंगात, भगवत्‌नामाची अप्रतिहत अशी शक्ती सांगून, ज्ञानेश्वरमहाराज पुढे त्याचे उत्तम, श्रेष्ठ असे फळ सांगतात.

**''दोन्ही पक्ष पाही उद्धरती।।''** दोन्ही पक्ष म्हणजे एक मातृपक्ष व दुसरा पितृपक्ष. या उभय कुळांचा उद्धार होतो. नामाखेरीज इतर साधने, जो त्याचे आचरण करतो, फक्त त्याचाच उद्धार करतात. त्यातही त्याचे प्रतिबंधन राहतेच. आचरण झाले पाहिजे. तरच त्याचा उद्धार करतात. पण नामसंकीर्तनाची अगाध शक्ती आहे; की त्याच्या द्वारे उभय कुलांचा उद्धार होतो.

**''दोन्ही पक्ष''** याचा दुसरा अर्थ असा आहे की, **''दोन्ही पक्ष''** म्हणजे हरिनामसंकीर्तन करणारा व ते ऐकणारा श्रोता व वक्ता दोघेही उद्धरतात. **''वासुदेव कथा प्रश्न पुरूषात् स्त्रीन् पुनातिहि। वक्तारं, पृच्छकं, श्रोतृम् तत्पाद सलिलं यथा।।''** श्रीविष्णूंच्या चरणापासून उगम पावणारी गंगा जसे सर्वांचे समस्त पाप नष्ट करते, तसेच हरिकीर्तन करणारा व ऐकणारा, सर्वच पावन होतात.

आणिक एक तिसरा अर्थ आहे, **''दोन्ही पक्ष''** याचा. **''दोन्ही पक्ष''** म्हणजे, ऐहिक व पारलौकिक उत्कर्ष, धर्म हा द्विविध-दोन प्रकारचा १) श्रेय व २) प्रेय. अभ्युद्य व नि:श्रेयस अशा दोन्ही अंगांनी नामधारकाचा उद्धार होत असतो. अशी नामाची असणारी शक्ती अन्य कोणत्याही साधनात नाही. आणखी एक अर्थ आहे - **''दोन्ही पक्ष''** याचा. दोन्ही पक्ष म्हणजे जड आणि जीव किंवा चेतन. शुकाला हरिनाम शिकविता शिकविता गणिका व शुक दोघेही उद्धरले. संत बहिणाबाईंच्या संगतीत असलेले पशुजातीचे गायीचे वासरू पण नामसंकीर्तनाने तरून गेले. वृंदावनातील वृक्ष-पाषाण हे पण गोपींच्या

नामसंकीर्तनाने कृतार्थ झाले. इतके कृतार्थ झाले की, उद्धवाने वृंदावनातील वृक्ष पाषाण योनीत आपला पुनर्जन्म व्हावा अशी इच्छा व्यक्त केली आहे.

या अभंगाच्या दुसऱ्या चरणात ज्ञानेश्वरमाऊली म्हणतात, **"रामकृष्णनाम सर्व दोषां हरण। जड जीवा तारण हरि एक॥"** हरिनाम हे अमंगलाला मंगल करणारे आहे. अन्य साधने दोषनाशक आहेत; पण ती एकाच काळी सर्व दोषांचे हरण करू शकत नाहीत. ज्या एका दोषाचा निवृत्तीचा संकल्प करून जे साधन केले गेले असेल, त्याच दोषाची निवृत्ती ते साधन करेल. खरी गोष्ट; पण **नाम** हे एकमेव असे साधन आहे की, एका काली सर्व दोषांची पूर्णत्वाने निवृत्ती करण्यास समर्थ आहे.

आता दोषाचे शास्त्रानी प्रकार केले तीन - १) मल; २) विक्षेप; ३) आवरण. मल म्हणजे पाप, विक्षेप म्हणजे चंचलता, संशय आणि आवरण म्हणजे अज्ञान (परमात्मस्वरूपाचे अज्ञान). जीवाच्या ठिकाणी हे त्रिदोष असतात; पण एक **नाम** हरिनाम. अखंड, दीर्घकाल, सातत्याने, एकनिष्ठेने व प्रेमभावाने घेतल्यावर हे त्रिदोष पूर्णपणे निवृत्त होतात; व नामधारक निर्दोष होतो म्हणजेच ब्रह्म होतो. कारण **"निर्दोषं ही समं ब्रह्म"** अत्यंत विशुद्ध काय आहे? तर एक श्रीहरि. हरिपाठाने तो पाठ करणारा हरिच होतो.

तुकोबारायांची ग्वाही आहे, **"राम म्हणता रामचि होईजे।"** नाथमहाराज म्हणतात, **"रामनामाचे परिपाठी। दोष जळती आकल्पकोटी। भुक्ति मुक्ति लागे पाठी। पावन सृष्टि हरिनाम॥"** पूजाविधानात मंत्र आहे, **"अपवित्र: पवित्रो वा सर्वावस्थांग तोऽपि वा। य: स्मरेत पुण्डरीकाक्ष, सबाह्य अभ्यंतर शुचि:॥"** नाम गर्जनेपुढे दोषांची कशी अवस्था होते याचे वर्णन श्रीतुकोबाराय करतात, **"दोषा झाली घे घे मारी। पळती दाही दिशाचारी। न येती माघारी। नाही उरी परतावया॥ अनेक दोषांचे घाट। जे जे गादले निघोट। होती हरिनामे चोखट। क्षण एक न लगता॥"** निळोबाराय पण म्हणतात, **"विठ्ठल नामाचिया गजरे। दोष गेले दिगंतरे। निळा म्हणे ऐसे झाले। हरिच्या नामे हरीच झाले॥"**

**कोणी। जो या काढी भयातुनी। करा म्हणउनी। हा विचार ठायीचा॥''** जीव जरी कितीही जड असला तरी हरिकृपेने तो तऱ्याशिवाय राहात नाही. हरीकृपेने मानवच काय? पण पशुही तरले आहेत. उदाहरण आहे गजेंद्राचे. पशुच काय रामावतारात पाषाण तरले; कृष्णअवतारी सरडा (नृग राजा) तरला. गोकुळ वृंदावनात तृणचरे, दगड, गोटे, मृत्तिकाकण तरले नां!!!

मानवाला इतर जीवांपेक्षा विशेष अशी जिव्हा मिळाली आहे की वाणीचा-शब्दांचा उच्चार करता येतो. पण त्या जिव्हेचा आपण काय उपयोग करतो? **''हे जिव्हे, सरसारज्ञे, सर्वदा मधुरप्रिये। नारायणाक्षय पीयूषं पिब जिव्हे निरंतरम्॥''** एक हरीनाम सार आहे; हे या रससारज्ञ जिव्हेला कळले पाहिजे; आणि तिने या रससारभूत अशा नामामृताचे निरंतर सेवन करावयास हवे. त्यासाठी जिव्हेला वळवले पाहिजे; समजावले, चुचकारले पाहिजे. नाही कां? **''घेई घेई माझे वाचे। गोड नाम विठोबाचे॥''** जिव्हेला गोडी लावली पाहिजे. नामाशिवाय बाकीच्या जिव्हा, **''जिव्हा ह्यसति दार्दुरिकेव''** म्हणजे बें-बें करणाऱ्या मेंढकथा समजाव्यात. म्हणून पुढील चरणात ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, **''हरि नाम सार जिव्हा या नामाची।''**

एक **हरिनाम** हेच जीवनातील सार आहे. सार म्हणजे कल्याणच. **''असारे खलु संसारे, सारभूतं विनिश्चितम्। सर्वेभ्य एक धर्मेभ्यो, नाम श्रीजगदीशिवु:॥''** **''सार सार सार। विठोबा नाम तुझे सार। म्हणूनि शूळपाणि जपतसे निरंतर॥''** निळोबाराय एका अभंगात म्हणतात, **''संत एकांती बैसले। सर्वही सिद्धांत शोधिले। ज्ञानदृष्टी अवलोकिले। सारांश काढिले निवडुनी॥ ते एक हरीचे नाम। सकळ पातकां करी भस्म। अधिकारी उत्तम आणि अधम। चारी वर्ण नर नारी॥''** नामदेवराय म्हणतात, **''साराचेही सार भक्तीचे भांडार। नाम निरंतर गाता वाचे॥''**

तात्पर्य काय? तर हरिनाम हेच साराचे सार आहे आणि आपली **जिव्हा** या **नामाची** व्हावयास पाहिजे. अन्याची होता कामा नये. तर नामाची, तशीच श्रीगुरूंची झाली पाहिजे. नामावाचून, श्रीगुरूवाचून, भगवंतावाचून

काहीच बोलता कामा नये. जिव्हेला नामस्मरणाचा, एकच अखंड ध्यास, छंद लागला ना मग? **''नेघे नेघे नेघे माझी वाचा विसावा।।''**

ज्याच्या जिव्हेला नामस्मरणाचा अभ्यास अखंड जडला आहे, त्याच्या भाग्याला दुसरी कशाची उपमा नाही. त्याचे भाग्य निरूपम आहे. या तिसऱ्या चरणात, पुढे ज्ञानेश्वरमहाराज म्हणताहेत, **''उपमा त्या दैवाची कोण वानी।''** नामधारकाचे भाग्य इतर कोणालाच प्राप्त होत नाही.

व्यावहारिक जे भाग्य, पैसा-अडका, मान-मरातब, सत्ता-सामर्थ्य, लौकिक कीर्ति यांना उपमा देता येते कशाची ना कशाची!!! ''तुज कशाची उपमा? असा प्रश्न सर्व संतांना नामी व नाम यांच्याबाबत पडला. कारण नाम-नामी सारखा कोणीच नाही. व्यावहारिक दैव अनेक लोक जगतच असतात. तुम्ही त्यांना श्रीमंत म्हणता!!! पण ते दैव मर्यादित असते. कायमस्वरूपी टिकणारे नाही. त्याला क्षय-वृद्धी असते.

पण नामस्मरणाचा प्रेमा, हे दैव कसे आहे? **''दैव जैसे कवतिके। काहीच दैन्य न देखे।।''** त्याला कोणतेच दैन्य कधीच नाही, माहीतच नाही. या कसोटीवर व्यावहारिक दैव टिकू शकतच नाही. अखंड हरिनामात रंगून गेलेल्या नामधारकाच्या दैवाशी, म्हणजेच देवाच्या कृपेशी अन्य कशा-कशाची तुलनाच करता येत नाही.

नामस्मरण अखंड करणाऱ्याचे भाग्य नित्य व अमर्याद आहे. निळोबाराय म्हणतात, **''नित्य वदनी हरीचे नाम। अंतरी प्रेम विसावले। त्याच्या भाग्या नाही सीमा। पुरूषोत्तमा प्रिय झाले।।''** श्रीनिवृत्तीनाथही असेच म्हणतात, **''अखंड जपता नाम वाचे। त्याहूनि दैवाचे कोण भूमी?। नाममंत्र राशी, अनंत पुण्य त्यासी। नाही पै भाग्यासी पार त्याच्या।।''** श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज आणखी एका अभंगात सांगतात, **''एवढा महिमा नामाचा। काय मंत्र जपशील वाचा। जो विठ्ठल म्हणे, तो दैवाचा। ऐसे ब्रह्मा बोले पूर्वी।।''**

सारांश काय तर नाम जिव्हेवर येणे हे **दैव** म्हणजे देवाच्या कृपेनेच,

श्रीहरिगुरूकृपेनेच जसे होणार आहे, तसेच ज्याने जिव्हेत अखंड हरिनामच घेतले आहे, त्याच्यावरच हरिगुरूकृपा होणार आहे. आता त्या दोन्ही गोष्टी बरोबरीने होणाऱ्या आहेत. गुरूकृपा झाल्यावर मग नाम घेऊ ही शुद्ध पळवाट आहे. आपण नाम घेतच राहावे, श्रीगुरूहरिकृपा होतच राहाते. नाम बीज आहे. गुरूहरिकृपा वृक्ष आहे आणि पुन: **नाम** फळ आहे. ‘‘**बीज आणि फळ हरीचे नाम। सकळ धर्म सकळ पुण्य। सकळ कळांचे हे वर्म। निवारी श्रम सकळही॥**’’ नामसाधनेच्या वृक्षाला नामप्रेमाचेच अमृत मधुर फळ येते आणि अशा नामस्मरण करणाऱ्या नामधारकाचे भाग्य कोण आणि कसे वर्णन करणार?

नामाने काय होत नाही? काय असाध्य आहे नामधारकाला ? ९-१० वर्षांचा होतो. बाल बुद्धी. खूप म्हणजे खूपच काजू खाल्ले. रक्त काय लाल असेल अशी लघुशंका होऊ लागली. घरातली माणसं घाबरली. वैद्यकीय उपचार संपले. वैद्यांनी हात टेकले. भगवंताची प्रार्थना केली; एक ने तरी, नाहीतर बरं तरी कर!!! तुझे नाम हेच औषध. अंथरूणातच होतो; नाम सोडले नाही. विसंबलो नाही. भगवंताची कृपा, बरा झालो. डॉक्टर मंडळींना आश्चर्य वाटले. नाम शरीराचे रोग बरे करेल यात काय नवल? नामाने भवरोग बरा होतो. चोखोबांची, जनाबाईंची कथा तुम्हाला ठाऊकच आहे. अस्थिंमधून नाम, शेणीतून नाम मग हृदयातून का बरे येणार नाही? अनुभवाची गोष्ट आहे नां?

या अभंगाच्या शेवटच्या चरणात श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ‘‘**ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ। पूर्वजा वैकुंठ मार्ग सोपा॥**’’ याचा अर्थ असा आहे, जर हरि-हरि हा पाठ सफळ संपूर्ण झाला, (साठां उत्तराची कहाणी पाचा उत्तरी नव्हे तर साठा उत्तरी) तर मग पूर्वजानांही वैकुंठमार्ग सोपा झालेला असतो. आता हरिपाठ म्हणजे नामस्मरण सांग केंव्हा होतो व सांग होणे म्हणजे तरी काय ह्याचा विचार करावयास हवा. नाही कां?

कोणतेही साधन अंतरायरहित आचरले गेले, म्हणजे ते सांग झाले - यथासांग झाले असे म्हणतात. नामस्मरणाविषयी अंत:करणात पूर्णत्वाने

प्रेमभाव निर्माण होणे, अन्य कोणत्याही बाकी साधनांपेक्षा नामाची श्रेष्ठता पटणे (नुसती पटणे नाही, ती अनुभवास येणे), नामाविषयी यत्किंचित कोणताही संशय नसणे, अखंड नामस्मरण, गुरू-सखा-प्राण-विसावा अशी गुरूरूपावर पूर्ण दृढ विश्वास आणि अखेर वृत्ती **नाममय + गुरूमय** होणे यालाच नाम-हरिपाठ सांग होणे म्हणतात.

वैकुंठमार्ग नामधारकाच्या पूर्वजांना सोपा होतो. वास्तविक तो मार्ग फार-फार कठीण आहे. ‘‘**वैकुंठा जावया तपाचे सायास।**’’ वैकुंठ हा सप्त आवरणाबाहेर असलेला लोक आहे. तेथे सलोकतादी मोक्षाचे अधिकारीच जाऊ शकातात; पण नामस्मरणाचे स्वतंत्र सामर्थ्य आहे. पहा, नामधारकच काय पण त्याच्या पूर्वजानांही वैकुंठ कठीण नाही. जो कोणी नाम घेतो, ज्याचे नाम **सांग** होते, त्याच्या उभयकुळातील पितर जरी ते नरकात खिचपत पडले असले तरी तत्काळ वैकुंठास जातात.

श्रीमद्‌भागवतात भगवान नृसिंह प्रल्हादाला उपदेश करत असताना सांगताहेत, ‘‘**त्रि सत्पभि: पितापूत: पितृभि: सह ते अनघ। यत् साधोऽस्य गृहे जातो, भवान् वै कुलपावन:॥**’’ हे निष्पाप प्रल्हादा, तुझा पिता आपल्या मागील एकवीस पूर्वजांसह पवित्र झाला आहे; कारण त्याच्या घरी, कूळ पवित्र करणारा तू निर्माण झालास.

एकनाथमहाराज भावार्थ रामायणात म्हणतात, ‘‘**नाम घेता घेता। कृतार्थ होती माता-पिता। त्याचेनि पूर्वजा होय सुखरूपता। उद्धरती समस्ता, समागमे॥**’’ ज्ञानेश्वरमहाराज आणखी एका अभंगात सांगतात, ‘‘**जो नामस्मरण करी। तोचि तरे भवसागरी। पितरासहित निर्धारी। वैकुंठपुरी पावले॥**’’ नाथराय म्हणतात, ‘‘**एका जनार्दनी जपता मंत्र ओठी। पूर्वजा वैकुंठी पायवाट॥**’’ म्हणून ज्ञानोबाराय म्हणतात, ‘‘**हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा।**’’



# अभंग क्र. २२

**नित्य नेम नामी ते प्राणी दुर्लभ। लक्ष्मीवल्लभ तयाजवळी॥१॥**

**नारायण हरि, नारायण हरि। भुक्ति, मुक्ति चारी घरी त्यांच्या॥२॥**

**हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा। यमाचा पाहुणा प्राणी होय॥३॥**

**ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड। गगनाहूनि वाड नाम आहे॥४॥**

ज्ञानेश्वरमहाराज मोठ्या कळवळ्याने सांगतात की, बाबांनो, नित्य नेमाने नाम घ्या; पण असे नित्य नेमाने नाम घेणारे फार थोडे लोक आहेत. नाम घेणारे जगात अनेकानेक आहेत; पण नाम **नित्यनेमाने** (आणि प्रेमाने) घेणारे फार दुर्लभ. सवडीनुसार, फावल्या वेळात, संसारातून मोकळीक झाली की, नाम (थोडे फार) घेणारे लोक असतात. त्यांना नामाविषयी पूर्णपणे आवड नसते. नामाशिवाय अन्य साधनांची उठाठेव ते करीतच असतात. म्हणजेच ते नाम एकनिष्ठतेने घेत नाही. आता कित्येकजण नाम घेतात, पण मनात काही सकाम हेतू ठेवून. मग तो हेतू सफल झाला नाम सोडतातही. लगेच नामाचे उद्यापनही करून टाकतात. ही काही खरी नामनिष्ठा नव्हे. खरं तर नाम अत्यंत निष्कामपणे घ्यावयास हवे. नाही कां?

बहुतेकजण नाम कां घेतात? तर ज्ञानराजच एका ठिकाणी म्हणतात, "**येर बहुत जोडती किरिटी। जयांची भजने भोगासाठी। जे अशा तिमिरे दृष्टी। विषयांध जाहले॥**" नाम अखंड घेतले पाहिजे व ते अत्यंत निष्काम बुद्धिने, सप्रेमाने घेतले पाहिजे. पण सर्वांकडून असं नामस्मरण घडत नाही. आवडीने नाम घेणारे फारच थोडे. कारण भगवंतावर प्रेमच असत नाही नां!!! नामीवर (भगवंतावर) जर प्रेम असेल तरच नामावरही तेवढेच प्रेम राहाते. पण असे प्रेमळजन दुर्लभच. गर्गसंहितेत म्हटलेच आहे, "**कुर्वन्ति सततं राजन् भक्ति ये प्रेमलक्षणाम्। ते भक्ता दुर्लभा भूमौ भगवद्भाव भावना:॥**" असे

भक्त बाह्य मनानं प्रपंच करतात, तर अंतर मनानं फक्त व फक्त परमार्थच करतात; आणि ते नित्यनेमाने नाम घेतात. जर प्रपंच-परमार्थात संघर्ष आला तर **परमार्थच** करतात. त्यांना कोणता लाभ घडतो म्हणाल तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **''लक्ष्मीवल्लभ तयाजवळी।''**

**''लक्ष्मीवल्लभ''** असे भगवंताचे हे विशेषण सहेतूक आहे. सर्व जण लक्ष्मीच्या मागे लागलेले आहेत. पण ती सर्वांशाने कोणालाच प्राप्त होत नाही; आणि जरी झाली तरी फार काळ टिकत नाही आणि जिथे अंशत: प्राप्त होते तेथेपण ती अनेक अनर्थ निर्माण करते; त्याला सुख-शांतीपासून पराङ्मुख करते.

याचे कारण काय? तर लक्ष्मीवल्लभ तयाजवळ नसतो. लक्ष्मी कोठे राहते? तर नारायणाजवळ. ती एका नारायणापाशीच स्थिरावते. **''लक्ष्मी स्थिरावली। मुकुंदी जैसी॥''** ती महाविष्णूखेरीज अन्यत्र कोठेच रमत नाही. या लक्ष्मीचा अधिकार सामान्य नाही; पण अशी सामर्थ्यसंपन्न असूनही तिने **''शांताकारं भुजगशयनं''** अशा महाविष्णूना वरले.

समुद्रमंथन झाल्यावर ती प्रकट झाली व आली ती थेट श्रीविष्णूंच्या पायापाशी. **''ते पाय धुवावयाचि दैवा। पात्र जाहली॥''**

श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ''नित्य नेम नामी असणाऱ्या भक्तांचा अधिकार किंवा त्यांचे भाग्य फार-फार मोठे आहे. कारण, लक्ष्मीवल्लभ त्यांच्याजवळ असतो.

इतकंच काय तर आपल्या नामधारक आवडत्या भक्तांसाठी तो प्रसंगी लक्ष्मी व वैकुंठ यांनाही सोडून येतो नां?

**''मद्भक्ता यत्र गायन्ति, तत्र तिष्ठामि नारद॥''** अशी भगवंतानी नारदांसारख्याला ग्वाही दिली आहे.

भगवान म्हणतात, ''मी वैकुंठात राहात नाही, भानुबिंबातपण असेनच असं नाही, योगीजनांच्या हृदयातून निघून जाईन, पण अर्जुना, जेथे माझा

उत्तम, सप्रेम नामघोष, भक्तजन करत असतील तेथे मी बाकीच्यांना पारखा झालेला, निश्चित सापडेन.'' भावार्थ रामायणात एकनाथमहाराजांच्या सांगण्याचे सार हेच आहे. ''संकीर्तन सुखाच्या उल्हासाने मला वैकुंठात काळ कंठवत नाही, जेथे नामसंकीर्तन आहे, त्या ठिकाणी मला जो आनंद होतो तो इतरत्र कोठेच नाही. योगियांच्या हृदयांतून मी कीर्तनाचे जागी पळून जातो; तेथेच अहर्निश तिष्ठत उभा असतो; तेथे स्वानंदात डोलूं लागतो. भक्तांच्या आवडीमुळे, हरिकीर्तनी उडी घालतो, कीर्तनसुखाची मला फार-फार गोडी, तेथे मी नानाप्रकारे नाचू लागतो.''

श्रीतुकोबाराय म्हणतात, ''**करिता आठव। धावोनिया घाली कव।। नाम उच्चारिता कंठी। पुढे उभा जगजेठी।।**'' भगवंत नामधारकाला सांभाळतो. याचा अर्थ तो भक्ताच्या ठिकाणी तिळमात्रही अहंकार उठू देत नाही; व त्याचबरोबर भक्ताचा प्रेमभावही तिळमात्र कमी होऊ देत नाही. तुकाराममहाराज म्हणतात, ''**वसे तेथे देव सदा सर्वकाळ। करिती निर्मळ नामघोष।। कीर्तनाच्या सुखे सुखी होय देव। पंढरीचा राव संगी असे।।**'' **भक्त जाय सदा हरिकीर्तनी गात। त्यासवे अनंत हिंडतसे।। तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची। नाही आणिकांची प्रीती ऐसी।।**''

निवृत्तीनाथ म्हणतात, ''**निवृत्ति नामामृत उच्चारी हरिनाम। नित्य परब्रह्म त्याचे घरी।।**'' पांडूरंग नामदेवाशी गूजगोष्टी करतांना म्हणतात, ''शंख, चक्र, गदा व पद्म यांसहित मी निरंतर तुमच्या संगतीत असतो. तुमच्याविण मला अन्य अशी विश्रांतीच नाही. मला जे आवडते ते नामसंकीर्तन तुमच्या घरी सदैव चालते; म्हणून तुमच्या दारी तिष्ठत उभा असतो.'' विठोबा म्हणताहेत, ''**नाम्या न विसंबे मज।**'' मला अजिबात क्षणभरसुद्धा सोडून जाऊ नकोस हेच वर्म तुला सांगत आहे.

याच आशयाने श्रीज्ञानेश्वरमहाराज पण म्हणताहेत, ''**लक्ष्मी नायक तया जवळी।।**'' जवळ याचा अर्थ सन्निध असा होतो. हे सान्निध्य दोन प्रकारचे असते. एक अंतर व दुसरे बाह्य. श्रीहरी नामधारकाच्या आत व बाहेर प्रगट

होत असतो. तुकाराममहाराज म्हणतात, "**सांठविला राहे हृदयसंपुष्टी। बाहेर धाकुटी मूर्ती उभा॥**"

आता अंतरात भगवंताचे सान्निध्य लाभल्यावर कोणता लाभ होतो? भगवान श्रीकृष्ण म्हणतात, "मी हृदयी प्रगटल्यावर भक्ताला अलभ्य लाभ घडतात, संसाराचे साकडेच फिटते. भवकाम उठाउठी पळतात. लिंगदेहाचा नाश होतो. आनंदी आनंद नाही तर आनंदस्वरूपता लाभते"

भगवंताचे बाह्य सान्निध्य लाभले तर काय लाभ होतात? तुकारामहाराज सांगतात, १) "**मागे पुढे उभा राहे सांभाळीत। आलिया आघात निवाराया॥ योगक्षेम त्यांचा जाणे जडभारी। वाट दावी करी धरूनिया॥**" २) "**निर्वाणी गोविंद असे मागे पुढे। काहीच साकडे पडो नेदी॥**" ३) **भक्त समागमे सर्वभावे हरि। न सांगता करी सर्व काम॥**"

आणखी काय लाभ? ज्ञानराज म्हणतात भगवंत सांगताहेत, "**माझिया भक्ता। नाही एकही चिंता। तयाते समुद्धर्ता। आथी मी सदा॥**" नरसी मेहत्याच्या घरी मुलींच्या लग्नाची बैठक. मेहताजी भजनात रंगलेले. वरपक्ष मागत होता - नरसी मान डोलवत होते. लग्न जवळ आले. नरसी हरिभजनात तल्लीन असताना एकजण जवळ येऊन म्हणाला, आमच्या मालकांचा हुकूम आहे, आपल्याकडील कार्याची तयारी करण्याचा. नरसींनी मान डोलवली. भजनात दंग. लोक-वरपक्ष-सगळे थक्क झाले. मेहताजी मात्र भजनात दंग असलेले लोकांनी पाहिले.

अशा कित्येक घटना. श्रीहरी भक्तांचे सर्व प्रकारे रक्षण करत असतो. सेवा करत असतो. आपल्याकडील माऊलींच्या पादुकांची कहाणी तुम्हाला विदितच आहे. ज्यांना असे अंतर्बाह्य सान्निध्य लाभले त्या थोर नामधारक भक्तांना या जगात अप्राप्त असे काय आहे?

ज्यांना अंतर्बाह्य अखंड भगवत्सान्निध्य असते, तेच खरे भगवद्भक्त; भागवतोत्तम. भगवत्‌नामाच्या बळावर त्यांना नित्य भगवंताचे सान्निध्य तर

लाभतेच लाभते. पण एवढ्यानेच झाले नाही तर त्यांना आणखी उभयविध असे सान्निध्य लाभते. त्यांना जगात अप्राप्त असे काय आहे? म्हणून ज्ञानेश्वरमहाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणात म्हणतात, "**नारायण हरि, नारायण हरि। भुक्ति मुक्ति चारी घरी त्यांच्या॥**" सर्व प्रकारच्या ऐहिक भोगास "**भुक्ति**" असे म्हणतात. सर्व भोगाचे आश्रयस्थान लक्ष्मी आहे. तिच्या बळावर सर्व भोग मिळवता येतात. मग जिथे लक्ष्मीपतीचे अखंड सान्निध्य आहे, तिथे कोणता भोग अप्राप्त आहे? श्रीतुकोबाराय म्हणतात, "**घरोघरी झाला लक्ष्मीचा वास। दैन्य दारिद्र्यास त्रास झाला॥**" आदि पुराणात व्यासराय म्हणतात, "**आयुष्मिका ऐहिकाश्च भोगा: सर्वे प्रयत्नत:। प्राप्यन्तो जपता नित्यं कृष्ण कृष्णेति सत्तमा:॥**" नित्य कृष्णनामाचा जप करणाऱ्याला, ऐहिक व पारत्रिक सर्व भोग प्रयत्नावाचून प्राप्त होतात.

गरूडपुराण पण असेच सांगते, "**रूपमारोग्यमर्थाश्च भोगान् श्चैवानुषंगिकान्। ददति ध्यायतो नित्यं अपवर्गप्रदो हरि:॥**" जो कोण अखंड श्रीहरींचे ध्यान/नामस्मरण करतो, त्याला अपवर्ग म्हणजेच मोक्ष देणारा श्रीहरी, रूप, आरोग्य, भोग, अर्थही देतो. एकनाथ महाराज म्हणतात, "**बाळके धाया घेऊनि काही। मिठी घातली मातेच्या पायी। धन वेचूनि अर्पि तेही। परी जीवे काही मारीना। तेवी माझी करिता अनन्य भक्ती। जो जो काम भक्त वांछी चित्ती। तो तो पुरवूनी दे मुक्ती। परी अधोगती पडो नेदी॥**"

भगवदूकृपेने ऐश्वर्याची प्राप्ती कशी काय होते, हे सुदामदेवाच्या, बाळ ध्रुवाच्या चरित्रावरून स्पष्ट होते. श्रीतुकोबाराय म्हणतात, "**हरि म्हणता भुक्ति, हरि म्हणता मुक्ति। चुके यातायाती हरी म्हणता॥**" जरी भक्त भोगनिरपेक्ष असतात, तरी त्यांच्या ठिकाणी भगवदूइच्छेनुसार अनायासे सर्व भोगांची सिद्धता असते. याचे उत्युत्कृष्ट उदाहरण म्हणजे समर्थपंचायतनातील "**रंगनाथ स्वामी निगडीकर.**"

केवळ भुक्तीच नव्हे तर चारी मुक्ती **'नित्यनेमनामी'** भक्ताच्या घरी राबतात. सलोकतादी मुक्तीकरितां या देहाचा येथेच त्याग करून मगच वैकुंठादी लोकांत जाता येते, पण ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, चारी मुक्ती-भुक्तीसहित यांच्या घरी येथेच राबतात. उत्तम उदाहरण म्हणजे श्रीएकनाथ महाराजांचा गृहस्थाश्रम. अशा प्रकारे नामधारक भक्ताच्या घरी सर्व प्रकारच्या मुक्ती धावत येतात. **''तुका म्हणे मुक्ति हरिदासाच्या घरी। वोळगती चारी ऋद्धि सिद्धी॥''**

या अभंगाच्या पुढील चरणात श्रीगुरूज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, **''हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा। यमाचा पाहुणा प्राणी होय॥''** मानव जन्म हा हरिप्राप्तीकरिताच आहे. तो अति दुर्लभ आहे. एकनाथमहाराज म्हणतात, **''सकळ देहामाजी पहा हो। अति दुर्लभ मानव देहो॥''** भागवतात अवधूत यदूराजाला सांगताहेत - भगवंताने आपले अगाध सामर्थ्य उपयोगात आणून वृक्ष, सर्प, पशु, पक्षी असे अनेक देह उत्पन्न केले. तथापि त्यायोगे त्याचे समाधान झाले नाही; तेंव्हा त्याने शेवटी मानवदेह निर्माण केला. तेव्हा मानवदेहातील, भगवंताचे अपरोक्ष (म्हणजे प्रत्यक्ष) दर्शन घेण्याची बुद्धी पाहून भगवंताला अमाप आनंद झाला.

या नरदेहाचे महत्व इतके आहे की, स्वर्गस्थ देवही याची इच्छा करतात. **''स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा। मृत्युलोकी व्हावा जन्म आम्हा॥''** कां तर याच जन्मात नारायण **नामाने** जीवनमुक्त होता येते.

पण माणसाने जर नरदेह प्राप्त झाल्यावरसुद्धा भगवंताची प्राप्ती करून घेतली नाही, तर त्याचा जन्म, त्याचे जीवन/जगणे म्हणजे केवळ नर्कच नाही कां? श्रीतुकोबाराय म्हणतात, **''तरीच जन्मा यावे। दास विठोबाचे व्हावे॥ नाही तरी काय थोडी। श्वान शूकरे बापुडी॥''** म्हणून ज्ञानोबाराय पण म्हणतात, **''हरिवीण जन्म तो नकचि पै जाणा।''**

हरिनामाला विन्मुख असणारे लोक विषयसुखात रमलेले असतात. ते अनुभवतात विषयसुख की जे अत्यंत अल्पकाळ टिकणारे असते.

“**दु:ख अल्प सुख स्मृतम्।**” दु:ख म्हणजे क्षणिक सुख. हरिनाम विन्मुख जे असतात त्यांना कायमस्वरूपी समाधान-सुख कधीच मिळत नाही. नामविरहीत जीवन, जीवन कसले ते? असे जीवन म्हणजे नरकच. आता नरक म्हणजे तरी काय याचा विचार करावयास हवा नाही कां?

श्रीमद्‌भागवतात “**नरकस्तम उन्नाह:।**” तम उन्नाह म्हणजेच नरक. त्याचे स्पष्टीकरण, एकनाथ महाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे. “**काम, क्रोध, लोभ उद्रेक। तेणे खवळे महामोह देख। तो बुडवी सज्ञान विवेक। एकले एकमत वाढे।। परि गा निजचिती। अंध-तम वाढे वृत्ती। कर्तव्याकर्तव्य स्थिति। एकही स्फूर्ति स्फुरेना।। ऐसा तमाचा उन्नाह उद्रेक। त्या जाण नाव महानरक।**” काय नरकाची योग्य व्याख्या केली आहे पहा!!! हरीवाचून/स्मरणावाचून आयुष्य चालले की, जीव या वरील विकारांच्या आधीन होऊन या लोकांतच नरकाचा अनुभव घेऊ लागतो. सर्व दु:खांचा भोग त्यास येथेच घडतो.

श्रीतुकाराम महाराज म्हणतात, “**नरक साधिला विसरोनि देवा। बुडाले ते भव नदीमाजी।। नारायण नाही वाचे। ते यमाचे आंदण।।**” तर श्रीगुरू ज्ञानोबाराय म्हणतात, “**यमाचा पाहुणा प्राणी होय।।**” माऊलीला जीवाचा कळवळा आहे. हरिपराङ्मुख जीवाला ते यमाचा पाहुणा असे म्हणतात. त्यानं कायमस्वरूपी तिथे राहू नये अशी सगळ्या संतांना कळकळ आहे.

श्रीमद्‌भागवतात यम आपल्या दूतांना सांगतो, “ज्यांनी जिव्हेने एकदाही भगवंताच्या गुणयुक्त नामाचा उच्चार केला नाही, करीतपण नाहीत, ज्याचे मन कधीही भगवंताच्या चरणारविंदाचे स्मरण करीत नाही, ज्याचे मस्तक एकदाही श्रीकृष्णचरणावर नतमस्तक होत नाही, झाले नाही, असे जे कोणी भगवत्‌सेवा न करणारे दुष्ट असतील, त्यांनाच तुम्ही येथे (यमलोकी) घेऊन या. एका श्रीहरीच्या विस्मरणाने जीवाला घोर यातना भोगाव्या लागतात. यातून मुक्त होण्यासाठी उपाय एकच. त्याचे अखंड नामस्मरण. नामधारकावर

त्या यमाची सत्ता चालत नाही. मात्र एका हरीस्मरणावाचून मनुष्यजन्म पण नरकरूपच आहे.

काय गंमत आहे पहा!!! मनुष्य हा अखेरच्या क्षणापर्यंत संसार-प्रपंचाचे स्मरण ठेवत असतो. पण भगवंताच स्मरण त्याला अंतकाळीही होत नाही.

या अभंगातील शेवटच्या चरणात ज्ञानेश्वरमहाराज **नामाचे** माहात्म्य किती अगाध आहे ते सांगतात. ‘‘**ज्ञानदेव पुसे निवृत्तिसी चाड। गगनाहुनी वाड नाम आहे॥**’’

ज्ञानेश्वरमहाराजांनी नामाच्या माहात्म्याबद्दल जेव्हा श्रीगुरू/ज्येष्ठ बंधू श्रीनिवृत्तिनाथांच्या जवळ इच्छा व्यक्त केली, तेव्हा त्यांनी सांगितले की, ‘‘**ज्ञानदेवा**’’ नाम हे आकाशापेक्षाही वाड म्हणजे व्यापक आहे. जसा आकाशाच्या व्याप्तीचा अंत लागत नाही, तसा नाममहात्म्याचाही अंत लागत नाही. वेदशास्त्रांमध्ये आकाशापेक्षा व्यापक फक्त एक परब्रह्मच आहे आणि वाच्य-वाचक अभेद दृष्टीने नामच ‘‘**ब्रह्म**’’ आहे. ज्ञानोबाराय सांगताहेत ‘‘**नाम परब्रह्म वेदार्थे।**’’

नामदेवराय काय म्हणतात पहा, ‘‘**अनंत ब्रह्मांडे व्यापक हे नाम। अनादि निष्काम विश्वंभर॥**’’ गगन सूक्ष्म आहे. त्याहीपेक्षा ब्रह्म सूक्ष्म आहे आणि ब्रह्मापेक्षाही **नाम** सूक्ष्म आहे. आत्मारामाचे वाचक नाम असल्यामुळे नाम आधीच अस्तित्वात आहे. गगनाचा गुण शब्द आहे. शब्दाच्या चिमटीत जे परब्रह्म साडत नाही ते नामाने लाभते म्हणून **नाम** गगनाहून वाड आहे. नाम म्हणजे केवळ शब्द नव्हे वा नुसती काही अक्षरे पण नव्हेत. तर त्याहून अधिक अर्थ **नामात** सामावलेला आहे. अर्थ म्हणजे परमात्मा. नामाचा अर्थ म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्मच!!! तो परमात्मा नामानेच आकळणार आहे. म्हणून गगनाहून ते अधिक व्यापक आहे. सूक्ष्म आहे. कारण **नाम** हेच परब्रह्म आहे.



# अभंग क्र. २३

**सात पांच तीन दशकांचा मेळा। एक तत्त्वी कळा दावी हरी॥१॥**

**तैसे नव्हे नाम, सर्वमार्गा वरिष्ठ। तेथे काही कष्ट न लागती॥२॥**

**अजपा जपणे उलट प्राणाचा। तेथेही मनाचा निर्धारु असे॥३॥**

**ज्ञानदेवा जिणे नामेवीण व्यर्थ। रामकृष्ण पंथ क्रमीयेला॥४॥**

या अभंगात श्रीज्ञानेश्वरमहाराज नामाची सर्व मार्गापेक्षा वरिष्ठता सांगतात. नाम हे सर्व तत्वांपेक्षा श्रेष्ठतम तत्व आहे. शास्त्रांमध्ये तत्वविकार येतो. कोणी सात तत्वे मानतात, कोणी पाच, तर कोणी तीन, तर आणखी कोणी दहा तत्वे देखील मानतात; किंवा या सर्वांची बेरीज २५ तत्वे मानतात. ही पंचवीस तत्वे तरी कोणती? पंचप्राण व मनबुद्धी मिळून सात, पंचमहाभूते ही पांच, सत्व, रज आणि तम हे त्रिगुण म्हणजे तीन, पंचज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये अशी दहा. या सर्वांचा एकमेळ म्हणजेच पंचवीस तत्वांचा हा **प्रपंच.**

वास्तविक पाहिले तर एका परब्रह्म परमात्म्यालाच **तत्व** म्हणतात. ‘‘**वदन्ति तत् तत्वविद: तत्वं यत् ज्ञानम् अद्वयम्। ब्रह्मेति परमात्मेति भगवान इति शब्दते॥**’’ असं भागवतकार तत्वाबद्दल सांगतात. श्रीनिवृत्तिनाथही त्यांच्या एका अभंगात म्हणतात - ‘‘**एकतत्व हरी असे पै सर्वत्र। ऐसे सर्व शास्त्री बोलियेले॥**’’ असे जरी आहे, तरी जगात प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या वस्तू पाहून त्याचे मूळ कारण काय आहे याचा अनेक ऋषीमुनींनी विचार करून आपापल्या बुद्धीनुसार अनेक तत्वे मानली.

‘‘**ज्याचेनि मते जैसे ज्ञान। तो तैसे करी तत्व व्याख्यान।**’’ मतांमध्ये अशी विविधता कां आली याचे कारण भगवान सांगतात - ‘‘**अघटित घडवी माझी माया॥ ते माया धरोनि हाते। ऋषीश्वर निजमते। जो जो जे जे बोलेल जेथे। ते ते तेथे घडे सत्य॥**’’ केवळ

दोरावर भासणारा साप, मग हा हिरवा, काळा की लालसर, हा ज्याच्या त्याचा भ्रमाकार, तसा तसा त्याला खरा वाटणार. त्याप्रमाणेच आत्मतत्व **एकच**. अविकारी, अज आणि निर्गुण. पण त्या आत्मतत्वाचे व्याख्यान मायायोगे नानाप्रकारे करतात.

जगताच्या रचनेमध्ये अंतर्भूत असणारी तत्वे सांगतो. पुरूष, प्रकृति, महत्, अहं, मन, बुद्धी, चित्त, त्रिगुण, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पंचतन्मात्रा, पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश ही पंचमहाभूते, का इतका तत्वांचा विचार?

जगत् मिथ्यत्व, प्रतीतीसाठी किंवा लय कसा होतो याच्या चिंतनासाठी, हा तत्वविचार वेदान्त दर्शनात केला जातो. जे मिथ्या असते, ते सत्य एकमेव अधिष्ठानावाचून राहूच शकत नाही. आणि या सगळ्या विश्वाभासाला, त्याच्या प्रतितीला **एकमेव** अधिष्ठान एक सत्य असा श्रीहरीच आहे. "**तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा। येर तो पसारा वाऊगाचि॥**"

अशा या एकरूप तत्वावर अनेक तत्वांच्या कला हरी दाखवित असतो. म्हणजे एका श्रीहरीस्वरूपाचीच या अनेकानेक तत्वांत सत्यत्वाने प्रतीती येत नाही कां??? अमृतानुभवात ज्ञानोबाराय सांगतात - "**नाममात्र लुगडे। एऱ्हवी सूतचि ते उघडे॥**" नांव वस्त्र पण वस्तूत: ते उभ-आवडं सूतच नां. विश्वातील नाना प्रकारची तत्वे तो एक श्रीहरीच नटून राहिला आहे. "**अनंत रूपे, अनंत वेषे**" तो भगवंतच नटला आहे.

"**तैसे विश्व येणें नावे। हे मीचि पै आघवे॥**" असच भगवान म्हणतात. हा तत्वविचार म्हणजेच १३ व्या अध्यायातील क्षेत्र-क्षेत्रज्ञ विवेक. तो विवेक सूक्ष्म आहे, तसा गूढ आहे. श्रीशंकरांनाही गूढच राहिला. मग इतरांची काय कथा? पण या सर्व तत्वांचा समावेश शेवटी एकाच तत्वात होतो. ही कला म्हणजे कौतुक (कौशल्य) एक श्रीहरी त्याच्या **नामाद्वारा** नामधारकास दाखवतो. असं एकमेव **तत्व** म्हणजेच **नाम**.

तत्वविचार हा कठीण आहे. पण नामाचे तसे नाही. नाममार्ग सर्व साधन

मार्गात श्रेष्ठ आहे; आणि या मार्गाने परमात्मस्वरूपापर्यंत पोहोचण्याला कष्ट लागत नाहीत. म्हणून ज्ञानेश्वर महाराज या अभंगाच्या दुसऱ्या चरणात म्हणतात - "**तैसे नव्हे नाम, सर्व मार्गा वरिष्ठ। येथे काही कष्ट न लगती॥**" श्रीहरीच्या नामस्मरणात सर्व तत्वविचारांचा अंतर्भाव होतो. कारण काय, तर एकतत्वहरीच सर्वांचे अधिष्ठान आहे. अन्य साधनात अनेक प्रकारची गुंतागुंत आहे. तशी नामात नाही. म्हणून येथे काही कष्ट नाहीत.

नामस्मरणाकरिता, शारीरिक, वाचिक, मानसिक, बौद्धिक कोणतेच कष्ट लागत नाहीत. नामाखेरीज बाकीच्या योगादी साधनात दुर्घटता वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराज ज्ञानेश्वरीत म्हणाले, "**म्हणोनि योगाचिया वाटा। जे निघाले गा सुभटा। तया दुःखाचाचि वाटा। भागा आला॥**" नामाचे तसे नाही. "**ते नाम सोपेरे रामकृष्ण, गोविंद।**" खूप सांगता येईल. "**नामसंकीर्तन साधन पै सोपे।**" सार काय तर **नाममार्ग** सर्वात सुगम/ सोपा, साधा, सरळ आणि थेट भगवंतापर्यंत घेऊन जाणारा आहे; इतकच नाही तर भगवद्दर्शनानंतर पण अखंड आनंदच देत राहणारा असा **राजमार्ग** आहे.

ज्ञान, कर्म, योग, तपादी साधनात, नाम-रूपाचा (विश्वाच्या) स्वरूपाचा भास कायम राहातो. त्या भासाच्या मागे असलेल्या सर्वात्मक आधारभूत श्रीहरीचा प्रत्यक्ष अनुभव येत नाही. नामस्मरणभक्तीवाचून वरील साधने सिद्धीस जात नाहीत. म्हणून नामस्मरणावाचून सर्व मार्ग हे परमात्मदर्शनाच्या बाबतीत अपूर्णच राहतात.

या अभंगाच्या ३ऱ्या चरणात ज्ञानेश्वरमहाराज म्हणातात - "**अजपा जपणे उलट प्राणाचा। येथेहि मनाचा निर्धारू असे॥**" कित्येक जण अजपाजपाचे महत्व सांगतात; आणि त्याची स्वाभाविकता सहजता सांगतात. अहोरात्र आपला श्वास आणि उच्छ्वास अगदी सहजगत्या, विनासायास चालूच असतो. शास्त्रकारांनी त्यांची संख्या निश्चित केली आहे की, चोवीस तासात मनुष्याचे एकवीस हजार सहाशे श्वासोच्छ्वास होतात.

ही जी क्रिया आहे, तिच्यामध्ये प्रत्येकी सहजासहजी एक नामजप होतो; मुद्दाम करावा लागत नाही. अ-जपा म्हणजे न जपता, म्हणून अजपाजप. योगचूडामणि उपनिषदात, ध्यानबिंदूपनिषदात या जपाला "**ब्रह्मद्वार**" असे म्हटले आहे. तिथे प्राण्याला (माणसाला) मूळ स्वरूपाचे ठिकाणी नेऊन घातले जाते, तिथे अजपा असतो. तेव्हा कुठलाही जप हा अजपा होतो. पण अजपाला सुद्धा शेवटी कुठल्या ना कुठल्या ध्वनीचा आधार हा घ्यावाच लागतो.

आता ध्वनी म्हटला की तो निर्माण करणाऱ्या सूराची, शब्दाची-स्वराची गरज असतेच. यात नामाला उलट दिशेने व्यक्तातून अव्यक्तात न्यावे लागते. अजपाजपात, प्राण्याच्या उलट्या गतीत षट्चक्रांचा विचार आलाच. कारण प्राणवायु हा त्या त्या चक्रावर विशिष्ट काळापर्यंतच वास्तव्य करीत असतो. मूलाधारापासून सहस्त्रदलापर्यंत मिळून २१,६०० वेळा जप होतो. कोणता जप होतो? तर **सोऽहं**. जीव गाढ निद्रेत असला तरी त्याच्या नकळत "**सोऽहं**" जप चालू असतो.

"**हंसः हंसः**" असा जप होत असताना, गुरूउपदेशाने त्या मार्गाने अभ्यास करत असता तो उलट होत होत सोऽहं, सोऽहं असा होतो. सः म्हणजे तो; अहं म्हणजे मी; वेदान्तशास्त्राच्या दृष्टीने तो परमात्मा मी आहे असा याचा अर्थ. या दृष्टीने आत्मा व परमात्मा यांचे मूलभूत ऐक्य या मंत्रजपात प्रतीत होते.

या अजपाजपात मनाची एकाग्रता किंवा निर्धार लागतो. तो होणे सर्वांना कठीण आपले अनुसंधान वरचेवर तुटणारे. अनुसंधान अभंग हवे. षट्चक्रभेदनात अनेक विघ्ने येतात. शरीरात व्याधी उत्पन्न होतात. म्हणून या सगळ्याचा विचार करतांना सगळ्यांना, संसारी जीवांना देखील सर्वांत सोपे एक **हरिनामच** कल्याणप्रद आहे. म्हणून या अभंगाच्या शेवटल्या चरणात ज्ञानोबाराय म्हणतात -

"**ज्ञानदेवा जिणे नामेविण व्यर्थ। रामकृष्ण पंथ क्रमीयेला॥**" मी हा पंथ आक्रमिला आहे. हा सुखकर आहे; तुम्ही पण निर्धास्तपणे आक्रमा तो मार्ग म्हणजेच **हरिस्मरण**.



# अभंग क्र. २४

**जपतप कर्म क्रिया नेम धर्म। सर्वाघटी राम भावशुद्ध॥१॥**

**न सोडी रे भावो, टाकी रे संदेहो। रामकृष्णी टाहो नित्य फोडी॥२॥**

**जात वित्त गोत कुळशीळ मात। भजे का त्वरित भावनायुक्त॥३॥**

**ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी। वैकुंठ भुवनी घर केले॥४॥**

सर्व साधनांचे श्रेष्ठ फळ, जो **शुद्ध भाव** त्याचे महत्व ज्ञानेश्वर महाराज या अभंगात सांगतात - जप, तप, क्रिया, नेम, धर्म यांचे आचरण करणारे अनेक लोक आहेत; पण त्यांच्या या साधनेचे पर्यवसान शुद्ध **प्रेमभावात** झालेले दिसत नाही. सर्वाघटी आत्माराम एकच आहे, अशी प्रतीती त्यांना यायला हवी, पण असे होत नाही कारण त्यांच्या ठिकाणी अभिमान, फलासक्ती, कर्तृत्वमद आदी दोष असतात. भगवद्भाव भक्तीने या साधनांचे आचरण होत नाही, सर्व यज्ञांचा कर्ता व भोक्ता एक भगवंतच आहे, अशा सत्य स्वरूपाने ते भगवंताला जरा पण जाणत नाहीत.

म्हणून इतके साधनप्रकार करून सुद्धा त्यांना त्याचे यथार्थ फळ नाही. परमात्म्याच्या यथार्थ स्वरूपाला न जाणता जे साधन होते, त्याचा काय उपयोग? सर्वाघटी असणाऱ्या भगवंताला न ओळखता, कर्माधर्मादिकांचे आचरण करणाऱ्यांची अवस्था कशी होते, ते भगवान उद्धवाला सांगताहेत -

अच्युत अशा महापुरूष भगवंताला न जाणता, अग्निहोत्र, नाना यज्ञ-याग करतात ते त्यांचे धर्मकर्मच त्यांना विपरीत फळ देते. उत्तम प्रकारची आटीव खीर मुखाने सेवन न करता, सर्वांगाला खिरीसाखरेचा लेप दिला तर भूक भागणार नाहीच; आणि वर पुन: सर्वांगास मुंग्या लागण्याची शक्यता - अंती दु:ख, आणखी सर्वांग स्वच्छ करण्याचा उलटा उपद्व्याप.

या करिता जे साधन करायचे ते शुद्ध भक्तीप्रेमभावाने, सर्वांघटी एकच राम ही भावना ठेवूनच करावयास हवे. एखाद्या शेतात घनदाट कणसं लागली आहेत, पण त्यात दाणेच भरलेले नसले तर मग त्या कणसांचा काय उपयोग? नाही कां? तसंच भगवद्**भक्तीप्रेमावीण** केलेले जप, तप, कर्म, क्रिया, नेम, धर्म यांचा काहीही उपयोग नाही. सामान्य जीवाला भगवद्भावना असते पण ती **भेद** प्रतीतीने युक्त असते. मग भेदात शुद्ध भाव कुठला? **शुद्धप्रेमभाव** हा फक्त **अभेदात, एकरूपतेतच** असतो पहा.

भागवतात भगवान श्रीकृष्ण उद्धवाला म्हणताहेत - "**सर्व भूतांमध्ये मन, वाणी, शरीर यांनी होणाऱ्या कर्मांनी जो मद्भाव, तोच सर्व साधनांना असणारा श्रेष्ठ उपाय.**" अशा भक्तीलाच पराभक्ती-एकांत भक्ती म्हणतात. याच "**एकांत-एकरूप-अभेद**" भक्तीने, जीवाला दुःख देणारे देहाभिमान, स्पर्धा, असूया, द्वेष, क्रोध इत्यादी विकार पूर्णतय: निवृत्त होतात. भगवंत सर्वांतर्यामी आहे, हे न जाणता जे साधन केले जाते, ते साधन नसून साधनेचे विडंबन आहे असे भागवतकार म्हणतात.

तात्पर्य काय? तर सर्वांघटी असणारा राम कळला तरच सगळ्या साधनांचा उपयोग नाहीतर केवळ विनोद. शुद्ध भाव हवा. "**सुदामा ब्राह्मण दुःखे दरिद्रे पिडीला। शुद्धभाव देखोनिया गांव सोनियाचा दिला।**" किंवा "**शुद्ध ज्याचा भाव झाला। दुरी नाही देव त्याला॥**"

म्हणून या अभंगाच्या दुसऱ्या चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात - "**न सोडी रे भावो, टाकीरे संदेहो। रामकृष्णी टाहो नित्य फोडी॥**" सर्व चराचरात आत्माराम हा भाव सोडू नका असा श्रीगुरूज्ञानराजांचा आग्रह आहे आणि हा भाव नित्य सिद्ध होण्यासाठी, सगळाच एक भगवंतच कसा असेल हा संदेह टाकावयास हवा आणि तो संशय जाण्यासाठी खात्रीशीर एकमेव उपाय **॥रामकृष्णहरि॥** या नामाचा अखंड, नित्य टाहो म्हणजे स्मरण.

सर्वांघटी आत्माराम हा शुद्धभाव सोडू नये. हा भाव सुटण्यातच जीवाची हानी आहे. ह्या भावाच्या/भक्तीच्या विस्मरणानेच जीवाच्या मागे सर्व संसार

लागला आहे. हा भगवद्भाव, व्यापकभाव सुटला की जीवभावाचा बंध पडतो. या एकदेशी जीवभावातच सर्व दुःखाची बीजे असून, **द्वैतदैन्य** भोगण्याची पाळी या जीवावर येते.

अनादि कालापासून "**जीव**" अशुद्धभावनेने भारलेला आहे. "**मी जीव आहे**" अशी अनादिकालापासून असलेली अज्ञानजनित भावना भेदात्मक आहे, त्यामुळे "**माझ्यासकट सर्वत्र एकच ब्रह्मचैतन्य आहे**", हे पटत नाही, प्रतीतीला येत नाही, आमचे महाराज, तुमचे ज्ञानेश्वर इत्यादी भेदच अनुभवास येतो, नाही कां? या सगळ्या संशयाचे-भेदाचे मूळ अज्ञान. हा संशय महाघातक आहे. हा संशयच मोठ्यात मोठे पाप आहे. असा अध्यात्मिक संशयच या जीवाला सर्व संसारिक दुःखे भोगावयास लावतो.

म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात "**टाकी रे संदेहो**" व "**न सोडी रे भावो.**" भाव म्हणजेच विश्वास, श्रद्धा, अतूट श्रद्धा. अशी **श्रद्धा** हेच परमार्थाचे भांडवल आहे. श्रीहरिगुरूचरणी श्रद्धा. मग गुरूवचनाची कुणाबरोबर रूजवात घालावी लागत नाही. श्रीकृष्णाने अर्जुनाला आत्मज्ञानाचे नियत साधन - "**संदेह त्यागपूर्वक आपल्या गुरूचरणी श्रद्धा**", हेच सांगितले आहे. "**श्रद्धावान् लभते ज्ञानं।**" श्रीगुरूवर, त्यांनी दिलेल्या सबीज नामवर, भगवंतावर श्रद्धा.

सर्व संशय टाकून, शुद्धप्रेमभावाने "**रामकृष्णहरि**" असा टाहो फोडणे म्हणजे अट्टाहासाने, नित्य, सतत, नामस्मरण करणे. आपले तुकोबाराय सांगतात - "**माझ्या विठोबाचे नाम, अट्टाहासे उच्चारा।**" हेच परमार्थाचे वर्म आहे. तुम्हाला धर्म, कर्म कुळाचार काही कळले नाही, जमले नाही तरी काहीच बिघडत नाही. सोपे-सोपे वर्म आहे - **एक नामस्मरण**.

"**टाहो फोडा**" यावर कित्येकजण आक्षेप घेतील. "**टाहो**" फोडण्याचे काय कारण? मनातल्या मनात घेतले तर चालत नाही काय? "**टाहो फोडणे**" याचा लक्षार्थ तीव्र तळमळ. मूल टाहो फोडून रडते तेंव्हाच आई जवळ घेते नां??? जो पर्यंत आपली भगवद्भेटीची इच्छा **तीव्रतर** नाही तोपर्यंत भगवंत भेटत नाही. "**टाहो फोडणे**" याचा दुसरा सुंदर अर्थ निःस्सीम भावाने त्याला हाका मारणे.

अशा नि:स्सीम भावाने देवालाही भक्ताचा, श्रीगुरूना शिष्याचा वेध लागतो.

एकदा द्वारकेत श्रीकृष्णांना राधेची आठवण झाली. तिकडे गोकुळात राधा पण कृष्णभेटीसाठी व्याकूळ झाली. इकडे द्वारकेतील कृष्णपत्नी म्हणू लागल्या, "**आम्ही इतकी सेवा करतो आणि यांना राधाच का आठवावी?**" त्यांना काय कळणार नां? हा परस्परातील भाव-भक्ति-प्रेम!!! तो फक्त राधा-कृष्ण यांनाच कळणार. श्रीकृष्णांनी लीला केली. आजारी असल्याचे सोंग!!! नारद आले भेटण्यास. वैद्यांच्या औषधाचा उपयोग नाही. नारद म्हणाले, "**कृष्णा तू सांग मी आणतो.**" देव म्हणाले (पहा बरं!) देवांनी सांगितलं, "**कुणा एकनिष्ठ भक्ताच्या पायांची-तळपायाची धूळ मिळाली तरच उतार पडेल. मात्र माती आणतांना त्याला सांगून आणायची की, आपली माती भगवंताच्या मस्तकी लावली तर तो बरा होईल; पण आपण एक हजार वर्षे नरकात पडाल.**" नारद त्रैलोक्यात हिंडले!!! पण कोण देतो माती? वृंदावनात आले. गोपींना सांगितलं. त्यांनी माती दिली. राधा म्हणाली, "**नारदा तळपायाचीच काय प्रसंगी या देहाची सुद्धा माती/राख देऊ. पण त्याला बरे वाटू द्या. जा लवकर. आम्ही एकच काय कित्येक हजार वर्षे नरकात पडलो तरी चालेल.**"

असा नि:स्सीम भाव. कृष्णस्त्रिया खजील झाल्या. भगवान राधेची नित्य का आठवण काढतात ते कळलं त्यांना.

देव भक्तांना एकमेकांची ओढ, तळमळ, ध्यास आणि अखंड अनुसंधान याचा परिणाम त्याचे, त्याच्या नामाचे, रूपाचे, लीलांचे, चरित्राचे, गुणांचे अखंड स्मरण. म्हणून ज्ञानोबाराय म्हणतात, "**टाहो फोडी.**" त्याच्याच कृपेने, आर्ततेतून, हे व्यक्त झाले आहे. त्याच ओळी, ओळी प्रगट झाल्यात -

**का गा माझा नये कळवळा। उदारा, दयाळा, पांडुरंगा॥१॥**
**देव म्हणे मजही दर्शनाची आस। झालो उतावीळ भेटीसाठी॥२॥**
**दाटला गळा, डोळा तो लागेना। वाहती सप्रेम अश्रुधारा॥३॥**
**उतावीळ मन, सुटू पाहे जीव। दाखवी स्वरूप आनंद म्हणे॥४॥**

हरिपाठातील या २४व्या अभंगाच्या तिसऱ्या चरणात ज्ञनेश्वर महाराज म्हणतात - "**जात वित्त गोत कुळशील मात। भजे का त्वरित भावनायुक्त॥**" नामधारकाला जात, धन, कुळ, वय, रूप, विद्या इत्यादिकांचा अभिमान बाधक आहे. हा अभिमान आहे तोपर्यंत भगवंत प्रसन्न होत नाही. प्रगट होत नाही. व्यवहारात हे सर्व मानले जाते. पण भक्तवत्सल भगवंताजवळ त्याची काहीच किंमत नाही. म्हणून "**मी**" असा एवढा आहे या बाबतीत परमात्म्याजवळ उगाच बढाया मारू नकोस, वल्गना करू नकोस. मग काय करशील? तर फक्त त्वरेने भावनेने/प्रेमाने/श्रद्धेने भगवंताचं भजन कर असं ज्ञानेश्वरमहाराज सांगतात.

जाती, वित्त, कुळ, गोत्र याचा विचार करण्याचे काहीच कारण नाही. भगवंत फक्त **भाव** पाहातो. त्वरेने भावनायुक्त होऊन भगवद्भजन केले की पुरे. इथे **त्वरित** हा शब्द महत्वाचा आणि सहेतुक आहे. बहुतेक संसारी लोकांची भगवद्भजनाकडे प्रवृत्ती होत नाही. कोणाची झालीच तर ती अशी असते की, तारूण्यातून म्हातारपणात गेल्यावर आपण मग भजन करू. तारूण्य हे सांसारिक सुख भोगण्यासाठी आहे. इंद्रिय, बुद्धी सारी थकली मग करायचा देव-देव. आता म्हातारपण आलं तरी कृत्रिम रंग-रंगोटी करून आपण तारूण्यातच आहोत असे भासवत असतो. पण ही भावना सर्वथैव चुकीची आहे.

मनुष्यदेह प्राप्त झाल्यावर, भोगांनी तृप्त झाल्यावर मग परमार्थ करू. याची काय निश्चिती; काय भरवसा. काळ केव्हा उडी घालील काय सांगता येतं? परमार्थात आळस केला, तो सर्व बाजूंनी सर्वस्वी नागवला, अकस्मात् मृत्यू. मग कोठला परमार्थ ? मग पुन: पुन: जन्म मरणाच्या भव-संसार चक्रात तो सापडतो आणि लाभलेला नरदेह अगदी वाया जातो.

म्हणून ज्ञानराज सांगतात - "**भजे का त्वरित**" ती त्वरा कशी करायची? तुकोबाराय सांगतात - "**मढे झाकोनिया करिती पेरणी।**" इतक्या त्वरेने. एकनाथ महाराज म्हणातात - रणांगणावर उभ्या असलेल्या

शूरवीराला परचक्राचा पाडाव करेपर्यंत विसावा नाही, तो वेगाने, धीराने शत्रूवर तुटून पडतो, त्याप्रमाणे **आत्मलग्न** साधण्यासाठी बिजवर जितका सावध असतो, तितक्या सावधपणे साधकाने सायुज्यलग्न साधावे. राजाचा एकुलता एक पुत्र अवचितरित्या चुकला तर सगळे लोक जीवाचा आकांत करून त्याचा शोध घेतात त्याप्रमाणे नामधारक साधकाने **निजसुख** साधावे. काळाची उडी पडली नाही तोपर्यंतच सगळे आयुष्य परमार्थ साधनेत घालवावे. त्याची त्वरा करावी.

माणसाच्या मनात हा विवेक निर्माण होत नाही. काळ केव्हा झडप घालील याचा नियम नाही आणि अंदाजपण नाही. म्हणून त्वरा करावी.

''**भज्**'' या धातूचा अर्थ **सेवा** असा आहे. सेवा म्हणजे तरी काय? तर तुकाराम महाराज सांगतात - ''**सेवा ते आवडी उच्चारावे नाम। भेदाभेद काम सारूनिया॥ तुका म्हणे देवा। चिंतन हे तुझी सेवा॥**'' चिंतन भगवंताचे संसाराचे नाही. नामसंकीर्तन हीच भगवंताला आवडणारी सेवा आहे. मात्र ती भावना-प्रेमभक्तीयुक्त पाहिजे.

शेवटच्या चरणात ज्ञानराज म्हणतात, ''**ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी। वैकुंठ भुवनी घर केले॥**'' भजन सेवा करणाऱ्याच्या ध्यानी-मनी रामकृष्णावाचून दुसरा विषयच नसतो. ''**पांडुरंग ध्यानी, पांडुरंग मनी। जागृती, स्वप्नी पांडुरंग॥**'' मनात असते तर ध्यानात नसते; कित्येकांना फक्त ध्यानातच भगवंताची प्रतीती, अन्य काळी विक्षेप.

खऱ्या नामधारक हरिभक्ताला सर्व अवस्थात एक हरीच कळत असतो आणि अशी अवस्था म्हणजे ध्यानी-मनी रामकृष्ण. जैसे लोभ्याला रात्र-दिवस नुसता पैसा-पैसा. ध्यानी-मनी रामकृष्ण असल्यावर त्याला कोणते फळ प्राप्त होते तर ''**वैकुंठ भुवनी घर केले ॥**'' नामस्मरणतत्पर नामधारक भगवत्‌लीला, गुण, चरित्ररस पिऊन, मग्न होऊन याच देहात असताना वैकुंठात वास्तव्य करतात.



# अभंग क्र. २५

**जाणीव नेणीव भगवंती नाही। हरि उच्चारणी पाही मोक्ष सदा॥१॥**
**नारायण हरी उच्चार नामाचा। तेथे कळिकाळाचा रीघ नाही॥२॥**
**तेथील प्रमाण नेणवे वेदांसी। ते जीवजंतूंसी केवी कळे॥३॥**
**ज्ञानदेवा फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ केले असे॥४॥**

एकच प्रतिपाद्य विषय पटवून देत असताना, तो अनेक उपपत्तीद्वारे पटवून देण्याची श्रेष्ठांची पद्धत असते. ज्ञानेश्वर महाराज तर ''**ज्ञानियांचे राजे**'', ''**अवतार पांडुरंग**'' असे श्रेष्ठ श्रीगुरू. आपल्या हरिपाठातही नामस्मरणाची श्रेष्ठता अनेक उपपत्तीद्वारे पटवून देतात. अभंगाच्या पहिल्या चरणात ते म्हणताहेत - ''**जाणीव नेणीव भगवंती नाही।**'' येथे त्यांनी भगवंत हा शब्द सहेतुक योजिला आहे.

प्राणीमात्रांची उत्पत्ति व विनाश, गती व अगती, विद्या आणि अविद्या इत्यादींना जो जाणतो त्याला भगवान म्हणतात. विष्णुपुराणात अशीच दुसरी एक व्याख्या आहे - ''**ऐश्वर्यस्थ समग्रस्य धर्मस्थ यशसः श्रियः। ज्ञान वैराग्ययोश्चैव षण्णां मग इतीरणा॥**'' समग्र ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य या सहा गुणांना ''**भग**'' अशी संज्ञा आहे. हे सहाही गुण ज्याच्याजवळ परिपूर्णत्वाने, एकसमयी असतात तो भगवान. तुकोबाराय सांगतात, ''**षड्गुणैश्वर्य संपन्न। एक भगवंतचि जाण॥**''

हे सहा गुण भगवंताच्या ठिकाणी कसे वास करतात? पहिला गुण - '**यश**'. यश म्हणजे विजय. अनेक शत्रू उपस्थित झाले तरी, ज्यांच्याकडून केंव्हाही पराजित न होणे म्हणजे यश. दुसरा गुण आहे - '**श्रीः**' म्हणजे लक्ष्मी भगवंताजवळ कायमस्वरूपी त्याच्या पायाशी आहे. तिसरा औदार्य गुण - ''**उदार तू हरी। ऐसी कीर्ती चराचरी। अनंत हे थोरी। गर्जताती**

**पवाडे॥**'' ज्ञानेश्वर महाराज त्याच्या स्वतंत्र औदार्याचे सुंदर वर्णन करतात - ''**तुझे औदार्य जाणो स्वतंत्र। देता न म्हणसी पात्रापात्र। कैवल्या ऐसे पवित्र। वैरियाहि दिधले॥**''

ईश्वराशिवाय इतरांचे औदार्य परतंत्र असते. म्हणजे ज्या संपत्तीच्या बळावर ते अवलंबून असते, ती संपत्ती संपली की औदार्यही संपुष्टात येते. शिवाय अभयदानासारखे औदार्य जीवाच्या ठिकाणी नाही. कारण ते स्वत:च भयग्रस्त असतात. भगवंत भक्तांना आपले अविनाशी पदच काय तर **स्वत:लाच** त्यांना देऊन टाकतो.

भगवंत चवथ्या गुणाने नटलाय - '**ज्ञान**'. सर्वज्ञ अशा वेदालाही ज्ञान पढवणारा हा आहे. ज्ञानोबाराय सांगताहेत - ''**वेदातेही पढविता आद्यगुरू तू॥**'' '**वैराग्य**' हा पाचवा गुण आहे. जेथे परिपूर्णता यथार्थपणे असते, तेथे वैराग्य राहते. वैराग्य म्हणजे विराग; आसक्तीरहितता. जो स्वत: अपूर्ण आहे, त्याचीच अन्य पदार्थांच्या ठिकाणी आसक्ती असते. जो स्वत: सिद्ध, परिपूर्ण ज्ञानरूप आहे त्याला काय कशाची अपेक्षा?

सहावा गुण आहे '**ऐश्वर्य**' म्हणजे नुसती संपत्ती, धन, दौलत, घर-दार, लौकिक नव्हे. '**ऐश्वर्य**' - ईश्वरत्वाचा भाव म्हणजे ऐश्वर्य. ईश्वरत्व म्हणजेच एकमेव नियामकत्व. या सगळ्या विश्वावर भगवंताची सत्ता अबाधित आहे. त्याच्याच सत्तेत/आज्ञेत सर्व पंचमहाभूतेही आहेत. ''**मी गोसावी आहे समस्ता। त्रैलोक्याचा॥**'' असं भगवान म्हणतात.

असा नियामकत्व असणारा तोच ऐश्वर्याने युक्त असा भगवंत. असा जो भगवंत त्याच्या ठिकाणी जाणीव, नेणीव नाही. कारण तो सदा सर्वकाळ ज्ञप्तिमात्र आहे. सूर्याला जसे दिवस-रात्र, अंधार-प्रकाश हे भेद माहीत नाहीत तशी भगवंताजवळ **जाणीव-नेणीव** नाही.

ज्ञानेश्वर महाराज नामस्मरणाबाबत पंचविसाव्या अभंगात म्हणताहेत - ''**हरि उच्चारणी पाही मोक्ष सदा॥**''

सदा या पदाचा अन्वय ''**उच्चारणी**'' या पदाकडे लावायचा.

अजामिळ, गणिका, भिल्लिण, वाल्या कोळी हे नेणते होते; तर प्रल्हाद, नारद, पराशर, पुंडरीक, व्यास, अंबरीष, शुक, शौनक हे जाणते होते; पण या सर्वजणांना हरिउच्चारणाने मोक्ष मात्र समानच प्राप्त झाला.

आता मोक्ष म्हणजे काय याचा विचार करावयास हवा नाही कां? भावार्थ रामायणात नाथरायांनी मोक्षाची **सुरेख** व्याख्या दिली आहे. **''सकळ इच्छांची पूर्ण शांती/संक्षय म्हणजेच मोक्ष''**. मुक्तिकोपनिषदात इच्छा म्हणजे काय हे सांगितले आहे. **''दृढभावनय। त्यक्तपूर्वापर विचारणम्। यदादानं पदार्थस्य या प्रकीर्तिता।।''** दृढ भावनेने मागला पुढला विचार टाकून केला जाणारा पदार्थांचा अंगिकाराचा अट्टाहास म्हणजे इच्छा. लोक, शास्त्र, देह या स्तरावर इच्छेचे प्रकार असतात. अशा सर्व इच्छा निवृत्ती म्हणजे मोक्ष. मोहाचा क्षय म्हणजे मोक्ष.

म्हणजेच सगळ्या इच्छा निवृत्तीत-दु:खाची निवृत्ती; आणि अखंड परमानंदाची प्राप्ती म्हणजे मोक्ष. नामस्मरणाने अंत:करण/हृदय शुद्ध होऊन अंतरंगात भगवंत प्रवेश करून, स्थिर होतो व भगवंतच **आनंदकंद-श्रीगुरू** हृदय सिंहासनावर प्रतिष्ठित झाल्यानं सर्व इच्छाच निवृत्त होतात. उरतो तो केवळ, निरामय, निरूपाधिक, निरूपचार, नित्य **परमानंद**.

या अभंगाच्या पुढील चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणताहेत - **''नारायण हरी उच्चार नामाचा। तेथे कळिकाळाचा रीघ नाही।। नित्य सत्यमित हरिपाठ ज्यासी। कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी।।''** या अभंगात ज्ञानेश्वर महाराज सांगून गेले आहेत की, काळाची सत्ता नामधारकावर चालत नाही. या अभंगात कळिकाळाचा रीघ म्हणजे प्रवेशच नाही, असे म्हणतात. हा **''कळिकाळ''** शब्द युगवाचक असा घेतला तरी चालेल. कारण **'कली'** हा काही काळ आपली सत्ता जगावर चालवतो (कलीयुगापुरतीच) पण **काळ** म्हणजे मृत्यू आपली सत्ता सगळ्या युगात चालवत असतो. पण जिथे **''नारायण हरी''** अशासारखा नामाचा सतत उच्चार होत असतो, तिथे कलीचा आणि काळाचापण शिरकाव होत नाही. असा एक छान अभिप्राय या

वरील चरणातून प्रगट होतो.

नामस्मरणानं काळही थांबतो. “**अवघाचि आकार ग्रासियेला काळे। एक ते निराळे हरिचे नाम॥**” भगवंताचे अवतारकालीन आकार!!! पण तेसुद्धा काळाच्या पडद्याआड जातात. **नामावर** मात्र काळाचीपण सत्ता चालत नाही.

**कली** हा सर्व दोषांची खाण आहे. तरीपण त्याचा एक मोठा गुण आहे, तो हा की केवळ श्रीकृष्णकीर्तनानेच जीव सर्व संसारबंधनातून पूर्ण मुक्त होऊन परमात्मस्वरूपास प्राप्त होतो. इतर कृत, त्रेता, द्वापार या युगात जे ध्यान, यज्ञ, अर्चन यांनी साध्य होणे कठीण जाते ते या कलियुगात केवळ नामसंकीर्तनाने प्राप्त होते. कलियुगाचे एवढे महत्व पाहून देवादिकांनाही या कलियुगात मृत्युलोकी जन्म घेण्याची इच्छा झाली. “**स्वर्गीचे अमर इच्छिताती देहा। मृत्युलोकी व्हावा जन्म आम्हा॥**”

द्वापार युगाच्या अंती, नारदांनी पित्याला म्हणजे ब्रह्मदेवाला विचारले की, “**मी पृथ्वी पर्यटन करीत असताना कलियुगातून कसा तरून जाईन?**” ब्रह्मदेव म्हणाले, सर्व श्रुतीरहस्यांचा आत्मा असणारी गुह्य गोष्ट सांगतो ऐक - “**आदिपुरूष भगवंताच्या केवळ नामोच्चारणमात्रेच कलीतून जीव मुक्त होतो.**”

“**हरे राम, हरे राम, राम राम हरे हरे। हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**” अशी ही सोळा नामे कलिकल्मष नाशक आहेत. या **नामाशिवाय** दुसरा अन्य सोपा उपाय वेदातही नाही. षोडशकलांनी युक्त अशा जीवाचा आवरण विनाश यांनीच होतो; आणि जीव याची देही, याची डोळा नित्य जीवनमुक्तावस्था अनुभवतो. श्रीगुरू जीवनमुक्त असतात आणि शिष्याला पण जीवनमुक्त करतात - कशाने तर एका “**राम कृष्ण हरि**” या नामाने.

हरिपाठातील २५ व्या अभंगातील ३ ऱ्या चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणताहेत - “**तेथील प्रमाण नेणवे वेदासी। ते जीवजंतूसी केव्ही**

**कळे? ।।**'' वेदांनाही भगवंताचे पूर्ण प्रमाण कळलेले नाही. त्याच्या स्वरूपाचा गुणाचा, अगाध सत्तेचा पूर्णपणे लाग लागलेला नाही. गीता सांगते - ''**अनादिमत् परंब्रह्म, न सत् न असत् उच्यते।**'' केनोपनिषद् म्हणते - ''**न तत्र चक्ष: गच्छति, न वाक् गच्छति, न मनोन विद्यो, न विजानीमो।**'' डोळे पाहू शकत नाहीत, वाचा वर्णन करू शकत नाही, मन विचार, कल्पना करू शकत नाही, विद्येचा उपयोग, उपाय थकतो.

या चरणातील ''**प्रमाण**'' या शब्दाचा असाही अर्थ होतो की, वरील दोन चरणांतून जे नाममहात्म्य सांगितले, ते अल्पच आहे; वास्तविक नाममहात्म्य काय, केवढे आहे, हे संपूर्णतय: वेदांनाही कळलेले नाही. नाथमहाराज म्हणतात - ''**नामस्मरणभक्तिचे पूर्ण निरूपण। सांगता वेदा पडले मौन।**''

''**सहस्त्रमुखाची जिव्हा पूर्ण। थकूनि जाण थोटावे।।**'' अशी जर वेदांची, नामयोगी संत महात्म्यांची गत तर मग अण्णा नाममाहात्म्य सांगून-सांगून काय, कसं आणि किती सांगणार नाही कां? पण, एक मात्र निश्चित. माहात्म्य यथार्थ वर्णन करून ही सांगता आलं? आणि कसं सांगणार नां, नामाचा अनुभव आहे. तो सांगत असतो की, ज्यात अनुभव; अनुभाव्य आणि अनुभाविवा ही त्रिपुटीच कशी ती उरत नाही. ''**राम म्हणता रामचि होईजे।**'' किंवा ''**ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणता ज्ञानदेव देतो। वासुदेवचि होतो अखंड वदनी वदे तो।।**''

मग ते नाममहात्म्य ''**जीवजंतूंसी केवी कळे?**'' जीवजंतू म्हणजे जे पुन: पुन्हा जन्माला येतात आणि ''**जन्म घेणे लागे, वासनेच्या संगे।**'' मग अनेक अशा पाशात गुंतून पडलेल्यांना भगवन्नामाचे माहात्म्य कसे कळणार? ''**येर प्राकृत हेंदरे। केवी जाणे? ।।**'' पक्वान्न चाखले, खाल्ले, पोट भरले, तरी त्या पक्वान्नाची रूची, स्वाद, गोडी, शब्दांनी दुसऱ्याला कशी सांगणार? चाखल्याशिवाय कळणार कशी? नाम चाखावे, चोखावे, चाटावे, भरपूर घ्यावे, खावे, तृप्त व्हावे, तृप्ती पण अशी की पुन: पुन्हा चाखावे-चोखावे

असेच वाटते; वाटत राहाते. **गोडी** सांगता येत नाही आली तरी चालेल पण अनुभवावी लागते.

या अभंगातील शेवटच्या चरणात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात - "**ज्ञानदेवा फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ केले असे॥**" ज्ञानराज म्हणताहेत, हरिनामपाठ/नामस्मरण हेच आमचे साध्य म्हणजे फळ आहे. सामान्यत: नाम हे साधन वाटते, पण नामस्मरणाचे अमृतभोजन **भगवत्-श्रीगुरूकृपेने** कळले म्हणजे **नाम** केवळ साधन न राहता **नाम साध्यच** आहे असा दृढ विश्वास आणि प्रेम किती? तर "**घेईन मी जन्म याजसाठी देवा। तुझी चरणसेवा साधावया॥**"

तुकोबाराय सांगतात - "**बीज आणि फळ हरीचे नाम। सकळ पुण्य, सकळ धर्म। सकळ कलांचे हे वर्म। निवारी श्रम सकळही॥**" नारद भक्तीसूत्रात नारदमुनीही सांगतात - "**स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमार:॥**" नामस्मरणभक्ती **ज्यात दास्य नाही तर सख्य भाव आहे** ही कर्म, ज्ञान व योग या सर्वांपेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण ती स्वत: **स्वयंफलरूपा** आहे.

अभिनव म्हणजे नित्यनूतन, नामस्मरणात ही सुखरूपता, आनंद कधी शिळा होतच नाही. **आनंद** कधी शिळा नसतो, वेगळा नसतो, भिन्न नसतो, प्रकार नसतो. आनंद आनंदच असतो. अशा आनंदात **आनंदरूप** होऊन रहावे.

म्हणून नाम हाच आनंद, साध्य, फळ आहे. एवढंच नाही तर जीवनमुक्तीवरील भक्तीचे परमलक्षण म्हणजे नाम. हा आनंद अनिर्वचनीय आहे. नामाने नामधारक भक्ताचे हृदयच वैकुंठधाम होते. अशा हृदयात वैकुंठाधिपती क्षेत्रसंन्यास घेऊन राहातो. हा **वैकुंठानंद** हृदयात जपावा, सांभाळावा, कोंडून ठेवावा.



# अभंग क्र. २६

**एकतत्व नाम दृढ धरी मना। हरीसी करूणा येईल तुझी॥१॥**

**ते नाम सोपे रे रामकृष्ण गोविंद। वाचेसी सद्‌गद जपे आधी॥२॥**

**नामापरते तत्व नाही रे अन्यथा। वायां आणिका पंथा जाशी झणी ॥३॥**

**ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरी। धरोनी श्रीहरि जपे सदा॥४॥**

"**हरी मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा**" असे म्हणणारे ज्ञानेश्वर महाराज या अभंगात वाचिक जपापेक्षा किती तरी पटींनी जास्त असणाऱ्या मानस जपाचे महत्व सांगत आहेत. आधी, प्रथम सद्‌गदीत होऊन वाणीने जप करावा. पण वाणीला वळण लागल्यावर, छंद लागल्यावर मग मात्र हे **एकतत्व** नाम मनाने दृढ धरावे म्हणजे श्रीहरीला तुझी करूणा येईल. **नाम** हेच तत्व म्हणजेच परब्रह्म. नामापेक्षा दुसरे तत्व नाही. नाम सोडून उगाचच अन्य मार्गाचा खटाटोप करू नको. ज्ञानराज म्हणतात, **अंतरात** जपमाळ धरून मनाने सदा श्रीहरीचा जप कर.

भगवंत करूणाघन आहे. करूणा कोणाची येते? जो आर्त आहे, दु:खी आहे, दीन दुबळा आहे, पण एवढ्याने नाही भागत, तर असा असून जो भगवंताला अनन्य भावाने शरणागत आहे, त्याचीच करूणा येते. करूणा कोणाला येते? तर फक्त जो करूणाशील आहे, दयाशील आहे, दीनवत्सल आहे, आर्तबंधू आहे, कृपावंत आहे, अशा श्रीगुरूला किंवा एका भगवंताला त्या श्रीगुरू/भगवंताला करूणा केंव्हा आणि कशामुळे येईल? आपण सदैव त्याचा आठव/स्मरण केले, त्याला आर्ततेने सारख्या हाका मारल्या तर!!!

ब्रह्मचैतन्य महाराज सांगत - सतत रामाला हाका मारा, त्याचे स्मरण करा. एक बाई त्यांच्याकडे आल्या. रडगाणं/तक्रार सांगू लागल्या - म्हणाल्या, मी खूप ठरवते की, एवढं काम झालं की, जप करू! एवढं आटपलं की नाम घेऊ! पण काय करावं? सवडच मिळत नाही. दिवसभराच्या कामाचा पाढा तिनं

महाराजांच्या समोर वाचला. महाराज म्हणाले - "हे सर्व मला सांगण्यापेक्षा रामालाच का सांगत नाही? मी काय करणार यात? सकाळी उठल्यावर दूधाला जाताना रामाला सांगायचं, रामा दुधाला जाते. रामा दूध आणले. आता बघ दूध तापवते; आता रामा चहा करते. प्रत्येक कामाच्या वेळी रामाला त्याचं नाव उच्चारून सांगायचं, मग रामाला तुमची करूणा येईल."

तुकोबाराय पण हेच सांगतात - "**कामामध्ये काम। काही म्हणा राम, राम। जाईल भव-श्रम। सुख होईल दुःखाचे॥**" किती सोपी आहे ना युक्ती? नामस्मरणाची, त्याला हाका मारण्याची!!!

मनी राम असावा, वसावा, घ्यावा, गावा, पहावा, ऐकावा. भगवंत मनात भरावा. म्हणून ज्ञानराज सांगताहेत नाम हेच एक तत्व हे मना तू दृढ धर. नामाला श्रीगुरूज्ञानेश्वर महाराज "**एकतत्व**" म्हणतात. महाराज ज्ञानोबाराय एका अभंगात म्हणतात, "**म्हणोनि अक्षर हे नाम। नव्हे, जाण केवळ ब्रह्म॥**" "**नाम परब्रह्म वेदार्थी।**" अशी त्यांची ग्वाही आहे.

नाम आणि नामी यांचा अभेद आहे. म्हणून भगवंत जसा परमतत्व आहे, तसेच त्याचे नामही परमतत्वच आहे. नाम म्हणजे चैतन्य, पूर्ण, शुद्ध, नित्य, मुक्त असा श्रीकृष्णच.

हेच एकतत्व **नाम** जिवाने आपल्या कल्याणासाठी मनात दृढ धारण करायला पाहिजे. वाणीने घेतलेले नाम. अखेर मनापर्यंत पोहोचलेच पाहिजे. औषध घशाखाली गेले, लागू पडले तरच ते परिणाम करते. तसेच नामाचे. सारांश, वाणीबरोबर मनानेही नामाचेच/भगवंताचे-श्रीगुरूंचे चिंतन घडले पाहिजे. श्रीगुरूचे चिंतन तेथे नाम व जेथे नाम तेथे श्रीगुरू/भगवंत. होय की नाही? मनाने चिंतन होण्याचा उपाय, सत्‌संगति, आणि त्याचबरोबर **सातत्याने** श्रवण. श्रवणाशिवाय चिंतन होत नाही!!!

"**एकतत्व नाम**" या अभंगात श्रीज्ञानेश्वर महाराज **नाम** मनात दृढ धरावयास सांगतात. वाणीने जरी नाम घेतले आणि हे सुद्धा अवघडच!!! तरी ते नाम मनापर्यंत पोहोचलेच पाहिजे. औषध घशाखाली उरतले तरच ते परिणाम

करू शकेल. श्रीएकनाथ महाराज म्हणतात, "**नाम घेता हे वैखरी। चित्त धावे बाहेरी॥ कैसे होते स्मरण?। स्मरणामाजी विस्मरण॥**" आणि म्हणून तुकोबाराय पण सांगतात, "**परमात्म निष्ठा परवडी। अखंड मनाची मोडी पाडी। उसंत घेवो नेदी अर्धघडी। स्मरण न्रिवडी मन राखे॥**"

या चंचल मनात ते दृढ रहावे कसे? श्रीतुकोबा मनाबद्दल, भगवंताजवळ तक्रार करतात, म्हणतात, "**एकविध वृत्ति न राहे अंतरी। स्मरणीच हरी विस्मृति हे॥**" सारांश काय तर, वाणीबरोबर मनानेही नामचिंतन घडले पाहिजे. भगवान् श्रीकृष्णांनी पण गीतेत ठिकठिकाणी, "**मन्मना भव, मय्येव मन, मच्चित: सततं**" असाच, उपदेश केला आहे. मनाने भगवद्चिंतन होण्यास मन स्वच्छ-शुद्ध-एकविध पाहिजे. जोपर्यंत मनाला ही अवस्था प्राप्त होत नाही, तोपर्यंत मनाची नामस्मरणाकडे प्रवृत्ती **सतत** राहणे अशक्य नाही, पण, अवघड आहे.

यासाठी सातत्याने अभ्यास हवा. अभ्यासासाठी **सत्संगति** व **सत्शास्त्रश्रवण** झाले पाहिजे. म्हणजे त्यायोगे मनाचे मल-विक्षेप दोष नष्ट होतात व मग ते मन नामचिंतनात दृढ राहते. मनात नाम दृढ राहणे म्हणजे तरी काय? तर नामाविषयी संशय व अश्रद्धा निर्माणच न होणे. "**एकविध आम्ही न धरू पालट। न सांडी हे वाट सापडली॥**" अशी दृढता कशी येणार? श्रीतुकाराम महाराज सांगतात - "**साहोनिया टाकी घाय। पाषाण देवचि झाला पाहे॥ तया रीती दृढ मन। करी साधाया कारण॥ बाण, शस्त्र साहोनि गोळी। शूरा ठाव उंच स्थळी॥ तुका म्हणे सती। अग्नि न देखे ज्या रीती॥**"

अशा निर्धाराने, अभ्यासाने, जर मनाची दृढ अवस्था नामस्मरणात झाली तर त्याचे फळ काय ते श्रीगुरू ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "**हरीसी करूणा येईल तुझी.**" यावर कोणी तार्किक म्हणेल, "**तो तर करूणासागरच आहे, त्याला पुन्हा करूणा ती काय यावयाची?**" "**पांडुरंग माझा कृपेचा सागर। भरला अपरंपार जलसिंधु॥**"

हरी जरी कृपेचा सागर असला, तरी ती त्याची कृपा सर्वांच्या प्रतीतीला येत नाही. कां? तर सर्वांची या कृपेवर श्रद्धा नसते. ज्याचा नामावर दृढ विश्वास आहे, त्या नामधारकालाच त्या कृपेची प्रतीती येते. सूर्यप्रकाश जरी सर्वत्र असला तरी सुर्यकांत मण्यातूनच स्फुल्लिंग बाहेर पडतात. तसेच श्रीहरीकृपेचे. आईच्या अंत:करणात जरी सर्वदाच बालकाबद्दलची कृपा असते, तरी ती सर्वकाळी प्रतीतीला येत नाही; तर ज्या वेळेस ते मूल आईच्या नावाने टाहो फोडते, अक्रोश करते, त्याचवेळी मातेच्या कृपेला व्यक्त दशा येते ना ? आणि भगवंताची कृपा तर मातेपेक्षा निर्हेतुक आहे. मग त्याचे किती स्मरण, आठव, उच्चार करावयास हवा?

‘‘**लहु आहे कृपावंत। अनंत हे नाम ज्या।।**’’ अनंताची कृपा अनंतच आहे. हरीला करूणा आल्यावर, मग कोणत्या गोष्टींची न्यूनता राहणार आहे? ‘‘**न मे भक्त: प्रणश्यति;**’’ ‘‘**योगक्षेमं वहाम्यहम्**’’ या त्याच्या प्रतिज्ञा स्पष्टच आहेत, खऱ्या आहेत. अखंड नामस्मरणपूर्वक भक्तीस अनुरक्त असणाऱ्या भक्ताची श्रीहरीला केवढी मोठी करूणा!!!

जो अनन्य आहे, जो अखंड नामनिष्ठ आहे, त्यावर श्रीहरी करूणा करतो. नारद म्हणतात, ‘‘**अभिमानी, अहंकारी यांचा द्वेषी व अनन्य भक्ताचा भगवंत प्रिय आहे.**’’ हरीकरूणा असीम आहे.

पण हरीची करूणा म्हणजे काय? तर श्रीहरी/श्रीगुरूंविषयी अनन्य प्रेम व तद्‌विषयक अद्वैत भूमिका यांचा सुंदर अविष्कार हीच त्याची करूणा/कृपा. प्रापंचिक गोष्टी प्रारब्धाने प्राप्त होत असतात. तर श्रीहरीगुरूप्रेम व अनन्यता हीच श्रीहरीची देणगी आहे. त्यात प्रारब्धाचा बाऊ करण्याचे काहीच कारण नाही. ‘‘**प्रेम देवाचे हे देणे। देहभाव जाय जेणे।।**’’ म्हणून, ‘‘**निष्ठावंत भाव भक्ताचा स्वधर्म। निर्धार हे वर्म चुकू नये।।**’’ अशी एकविधता साधली तरच हरीकृपा.

ज्ञानेश्वर महाराज हरिपाठातील या २६व्या अभंगात पहिल्या चरणात ‘‘**हरीसी करूणा येईल तुझी**’’ असं म्हणताहेत. श्रीहरी/श्रीगुरू यांच्या

संबंधी **अनन्यता** व प्रगाढ **प्रेमभाव** अंत:करणात अखंड पाझरणे हीच श्रीहरीची कृपा-देणगी. ''**निष्ठावंत भाव भक्ताचा स्वधर्म। निर्धार हे वर्म चुकू नये।।**'' अशी एकविधता साधली न तुटता, फाटे न फुटता अखंडता राहिली तरच श्रीहरिगुरूकृपा. ''**देह जावो अथवा राहो। पांडुरंगी दृढ भावो।।**'' ''**श्रीगुरूचरणांची सेवा। हीच माझी देवसेवा।।**'' अशी एकविधता. ''**गुरू तोचि देव**'' हा भाव; याला एकविधता म्हणतात.

दृढ नाम, सोपे नाम सांगताना पुढल्या चरणात सांगतात, ''**राम, कृष्ण, गोविंद.**'' राम, कृष्ण, गोविंद या नामात अगाध सामर्थ्य आहे. कृष्ण नामाचा अर्थ गर्गाचार्यांनी गर्गसंहितेत दिला आहे. ''**कृष्ण**'' या शब्दात क, ऋ, त, ष, अ आणि विसर्ग असे पाच भाग पडतात. क - कमलापति विष्णु, ऋ - श्रीरामचंद्र, ष - षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंत, ण - नरसिंह, अ - अग्नि व विसर्ग म्हणजे दोन टिंबे हेच नरनारायण दोन ऋषी. अशा या उपरोक्त सहा देवता ज्यात पूर्णत: लीन आहेत तोच ''**कृष्ण.**'' काय सुंदर आहे ना **कृष्ण** नाम?

कृष्णातील कृत् शब्द सत्तावाचक आहे व '**ण**' हा आनंदस्वरूप आहे. म्हणजेच सुस्वरूप. सच्चिदानंदघन, भावानंदमय **आत्माराम** तोच कृष्ण. ''**गोविंद**'' या नामाचाही अर्थ अनेक प्रकारे होतो. पाताळात गेलेल्या पृथ्वीला वर काढले म्हणून सर्व देवांनी ''**गोविंद**'' असे म्हणून भगवंताची स्तुती केली. इंद्र म्हणतो, ''**तू गाईंचा इंद्र म्हणजे स्वामी आहेस म्हणून सर्व जण तुला गोविंद म्हणतात.**'' हरिवंशात श्रीव्यास म्हणतात, ''**गौ म्हणजे वाणी; त्या वाणीवर प्रभुत्व गाजवणारा व वाणीचा प्रवर्तक म्हणून सर्व मुनी, भगवंता तुला गोविंद म्हणतात.**''

भगवंताच्या नामात अगाध सामर्थ्य तर आहेच आणि शिवाय ते अत्यंत सुलभ-सोपे आहे. ''**ते नाम सोपे रे**'' मात्र या नामाचा जप कसा करावा याचे वर्म ज्ञानराज सांगतात, ''**वाचेसी सद्गद जपे आधी।**'' नाम घेता घेता वाणी सद्गदीत झाली पाहिजे. भगवंताच्या नामाविषयी पूर्ण प्रेमा निर्माण झाला तर ते वाणीतून येताना सहजच ती वाणी सद्गदीत होते. अष्टसात्विक

भाव उमटू लागतात. ही भक्तिप्रेमाची पराकाष्ठा आहे. भागवतकार म्हणतात, **"वाग् गद्गदा द्रवते यस्य चित्तम्।"**

तुकाराम महाराजही या बाबतीत म्हणतात, **"नाम आठविता कंठी। प्रेम वाढे ऐसे पोटी॥"** आणखी म्हणतात, **"कंठी प्रेम दाटे, नयनी नीर लोटे। हृदयी प्रगटे रामरूप॥ रोमांच तनू, आनंदाश्रु नेत्री। अष्टांगही गात्री प्रेम तुझे॥"**

ज्ञानोबाराय म्हणतात, हे नाम आधी जप. **"आधी"** म्हणजे सर्व कामे बाजूला सारून प्रथम हे नाम जप की जे सकल मंगलनिधी आहे. मानवी जीवनाचा मुख्य उद्देश भगवंताचे स्मरण हा आहे आणि स्मरणाचा सोपा उपाय **नाम**. म्हणून आधी जप असा आग्रह केला आहे.

ज्ञानराज तिसऱ्या चरणी म्हणतात, **"नामापरते तत्व नाही रे अन्यथा।"** नामासारखे दुसरे श्रेष्ठ तत्व नाही. नामाखेरीज इतर तत्वहीन पंथाकडे/मार्गाकडे जाऊच नका. संसारी माणसाला भगवंताच्या ठायी दृढी भक्ती जडण्याचा **नामा**शिवाय अन्य मार्गच नाही असं शुकाचार्य भागवतात ठामपेण सांगतात. नामे भगवंत नाही तर नामच भगवंत-परब्रह्म. म्हणून येथे नामालाच **तत्व** म्हटले आहे.

शेवटच्या चरणात श्रीगुरूज्ञानोबाराय म्हणतात, **"ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरी। धरोनि श्रीहरी जपे सदा॥"** वाचिक जपापेक्षा मानसिक जप श्रेष्ठ. साधकाला/नामधारकाला मौनाची फार आवश्यकता आहे पण **मनाचे** मौन साधण्याकरता मन नामचिंतनाकडे लावले पाहिजे व त्यासाठी वाणीनेही नामस्मरण**च** केले पाहिजे. वृत्तींचा विराम म्हणजे मौन. नामानेच हे साधते. महाराज **"अंतरी जपे सदा"** असे म्हणताहेत. म्हणतात, "अंतरी श्रीहरि धरून अंतर जप करा." अंतर जप म्हणजेच मानसिक जप. श्रीहरीला अंतरी धरा - श्रीगुरूला अंतरी धरा व त्यालाच सदैव जपा म्हणजे सांभाळा. असाही एक अर्थ आणि एक अर्थ, आतला श्रीहरीच नाम घेत असतो. नामधारक हा केवळ बाह्यात्कारी निमित्तमात्र. कबीरजी म्हणतात, **"राम हमारा जप करे, हम बैठे आराम।"**



# अभंग क्र. २७

**सर्व सुख गोडी, साही शास्त्र निवडी। रिकामा अर्धघडी राहू नको॥१॥**
**लटिका व्यवहार, सर्व हा संसार। वाया येरझार हरिवीण॥२॥**
**नाममंत्र जप कोटि जाईल पाप। कृष्णनामी संकल्प धरूनि राहे॥३॥**
**निजवृत्ति काढी सर्व माया तोडी। इंद्रिया सवडी लपो नको॥४॥**
**तीर्थ व्रती भाव धरी रे करूणा। शांति दया पाहुणा हरि करी॥५॥**
**ज्ञानदेवा प्रमाण निवृत्ति देवी ज्ञान। समाधि संजीवन हरिपाठ॥६॥**

हरिपाठाचे सर्व सार या एका अभंगात आले आहे. सर्वसुख म्हणजेच दु:खाचा मागे-पुढे लवलेश नसणारे, नित्य, निरामय, निरतीशय, निरूपाधिक, निरूपचार असं निखळ सुख. ''**आनंद**'' आनंद म्हणजेच ब्रह्म. ''**आनंदो हि ब्रह्म इति विजानात्।**'' असं तैत्तरिय उपनिषद् सांगते. गीता म्हणजे ''**सुखं आत्यंतिक यत् तद् बुद्धिग्राह्यं अतीन्द्रियम्।**'' जे अत्यंतिक सुख असते, ते अतींन्द्रीय असते. प्रज्ञाग्राह्य (ती सुद्धा ऋतंभरा प्रज्ञा) असते. मात्र जे अल्पसुख असते, ते नष्ट होणारे असते.

सर्वसुख म्हणजेच ब्रह्मसुख. आत्मसुख. आत्मानंद-स्वानंद सर्व हा शब्द परब्रह्म वाचक आहे. म्हणजेच सर्वसुख म्हणजे सर्व प्रकारचे भौतिक सुख नाहीतर सर्वसुख म्हणजेच ब्रह्मसुख. ब्रह्माचे सुख नाही तर ब्रह्मच/आत्माच फक्त सुखरूप. ही सुखरूपता म्हणजेच सर्व सुख. गोपी या ब्रह्मसुखाला प्राप्त झाल्या श्रीकृष्णप्रेमामुळे.

''**किंबहुना सोय। जीव आत्मयाची लाहे। तेथ जे होय। तया नाम सुख॥**'' जीवास सर्व सुख पाहिजे. म्हणजेच कोणत्याही अंगाने त्यात जरासुद्धा उणीव असता कामा नये. सर्वांचा ज्यात अंतर्भाव होतो, म्हणजेच एका सुखाची प्राप्ती झाली असताना पुन्हा अन्य सुखाकडे जीवाची प्रवृत्ती होत

नाही व प्रवृत्त होण्यास अन्य सुख अविशिष्टच रहात नाही, जे प्राप्त झाले असता, त्यात कोणत्याही दुःखाचे मिश्रण नसते; सर्व दुःखाचा पूर्णतः विसर पडतो, तसेच **सुखाशाही** न राहता जीवच सर्वांगाने सुखमय-सुखरूप बनून जातो त्यासच ''**सर्वसुख**'' म्हणणे/अनुभवणे योग्य.

सर्व शास्त्रांचे सार - ''**सर्वसुख.**'' ज्ञानराजांचा शब्द, ''**साही शास्त्र निवडी.**'' न्याय-गौतम; वैशेषिक - कणाद; सांख्य - कपिल महामुनी; योग-पतंजली; पूर्वमीमांसा - कुमारिल भट्ट; उत्तरमीमांसा - बादरायण व्यास. या साही शास्त्रांची एकवाक्यता व्यासांनी ब्रह्मसूत्रांत केली व तात्पर्य सर्व - सुखरूपता हेच सांगितले.

ज्ञानोबाराय उत्तरचरणात म्हणतात, ''**रिकामा अर्धघडी राहू नको।**'' योगवासिष्ठांत वसिष्ठमहामुनी श्रीरामांना सांगतात, ''रामा, या जगात अनर्थकारक असा आळस नसता तर प्रत्येकजण संपत्तिमान् व विद्वान झाला असता. पण या आळसामुळेच ही समुद्रवलयांकित पृथ्वी नरपशूंनी व निर्धन लोकांनी भरून गेली आहे.''

जो क्षण नामाशिवाय जातो, मनाने हरिचिंतन होत नाही, श्रवण-कीर्तन-वाचन-सत्संगति होत नाही तो क्षण, ती घडी, सांसारिक कामाकरिता खर्च झाली तरी रिकामीच - फुकट वाया गेली असं महाराजांचे निक्षून सांगणे आहे. हरिस्मरणी जो काळ/क्षण हाच सार्थकी लागतो व बाकी सर्व काळ फुकटच. असा काळ व्यर्थ जाणे फार अनर्थवाह-नुकसानीचे आहे. मानवी आयुष्यातील प्रत्येक क्षणाची किंमतच होऊ शकत नाही तो अमूल्य आहे.

पण सर्वसामान्यांना त्याची किंमतच कळत नाही. नाथराय काय म्हणतात पहा - ''**कोटि वेचिता सुवर्ण। नरदेहीचे आयुष्य जाण। न मिळे अर्धक्षण। नाना साधने करिताही॥**'' श्रीतुकोबाराय सांगतात, ''**मोलाची घडी जाते वायाविण। न मिळे मोल धन देता कोटी।**'' असं मौलिक क्षण-सार्थकी लागतो - ''**हरि मुखे म्हणा.**''

सर्व नद्यांचे पाणी जरी वाहून जात असले तरी, ते मेघ, पर्वत आदि माध्यमातून परत येत असते. पण या देहरूप नदीतील आयुष्यरूप पाणी वाहून गेले की गेले. त्यातला थेंब देखील परत माघारी येत नाही. त्यात कोठून भर पडत नाही. कोणत्या घडीला काळाचा तडाखा बसेल याचा भरवसा नाही; काही नियम नाही. मग अंतकाळी स्मृति-भगवंताची-भगवत्‌नामाची हरिस्मृति राहण्यासाठी **अर्धघडी** रीकामे न राहता अखंड नामस्मरण करावयास हवे.

म्हणून तुकोबाराय सांगतात, ''**क्षणोक्षणी हाचि करावा विचार। तरावया पार भवसिंधू। नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान॥**'' कारण क्षणार्ध जरी वाव - संधि मिळाली तरी बलवती माया आपल्याला बंधनात घालील. दुसरे म्हणजे क्षणाक्षणाने आयुष्य हे कमी-कमीच होत असते; आणि या जन्मानंतर पुन्हा **नरदेहच** मिळेल याचा काय भरवसा? म्हणून ज्ञानोबाराय सांगतात, ''**रिकामा अर्धघडी राहूं नको।**'' नारद आपल्या भक्तीसूत्रात सांगतात, ''**क्षणार्धम्‌ अपि व्यर्थम्‌ न श्रेयम्‌।**'' जिवंत असताना नामाची अखंड स्मृति जागृत असेल तर अंतकाळीपण नामस्मरण होऊ शकेल, नाही तर नाही.

अभंगाच्या पुढच्या चरणात ज्ञानराज सांगताहेत, ''**लटिका व्यवहार सर्व हा संसार।**'' संसार म्हणजे काय? श्रीमद्‌ आद्य शंकराचार्य म्हणतात, ''**का ते कांता, कव तव पुत्रः, संसारी अयं अतीव विचित्रः॥**'' सर्वांना हवा-हवासा वाटणारा, सुखनिधान भासणारा संसार ''**मिथ्या**'' म्हणजे नाशवंत आहे; अशाश्वत आहे, अनित्य आहे; बदलणारा आहे. क्षणिक सुखाभास निर्माण करणारा असून दीर्घ काळ यातना, दुःख देणारा आहे. क्षणभंगुर आहे, नित्य पालटणारा असून त्याला परिच्छेद म्हणजे मर्यादा आहे. ज्ञानदेव म्हणतात, ''**सर्वहि लटिके, जाण तू हे निके। कृष्णेविण एके न सुटिजे काही॥**'' तुकोबा म्हणतात, ''**दुःख बांदवडी आहे हा संसार। सुखाचा विचार नाही कोठे॥**''

या चराचर सृष्टीत ज्या प्राण्याचे कर्म, धर्माच्या उपयोगी येत नाही,

वैराग्याचे साधन होत नाही, किंवा श्रीहरीच्या सेवेकडे लागत नाही, तो माणूस जिवंत असून मेल्यासारखाच. मग अशी येरझार काय कामाची. "**वाया येरझार हरिविण॥**"

पुढच्या चरणात ज्ञानराज म्हणतात, "**नाममंत्र जप कोटि जाईल पाप।**" नाममंत्रसंकीर्तनाने अनेक महापातके व उपपातके समूळ नष्ट होतात. कोटी शब्दाचे दोन अर्थ. एक म्हणजे प्रकार व दुसरा संख्या. "**नामाचेनि बळे तरिजे संसार। आणिक विचार करू नको॥**"

पुढचा भाग आहे - "**कृष्ण नामी संकल्प धरूनि राहे॥**" संकल्पाशिवाय कोणतीही क्रिया होत नाही. संकल्प हा मनाचा धर्म आहे. संकल्प-विकल्प म्हणजेच मन. अनादिकालीन संस्कारामुळे सदैव संसारिक संकल्पच मनाकडून होत असतात. भगवत्‌विषयक संकल्पाकडे मनाची प्रवृत्ति होत नाही. पण तुकोबाराय आग्रहाने सांगतात - "**संकल्प तो नाही दुजा। महाराजाविण तो॥**" संकल्पाला अधिष्ठान तरी काय तर **मनच**. "**संकल्पासी अधिष्ठान। नारायण गोमटे॥**"

पुढचे चरण आहे - "**निजवृत्ती काढी, सर्व माया तोडी। इंद्रिया सवडी लपो नको॥**" राम आणि वासना (काम) एकत्र नांदत नाहीत. परमात्मप्राप्ती व भोगासक्ती या दोन्ही गोष्टी कदापि एकत्र नांदत नाहीत. नामस्मरणाने प्रवृत्तींवर नियंत्रण ठेवता येते; आले पाहिजे. निजवृत्ति म्हणजे अहंकार व माया म्हणजे ममता. अहं म्हणजे मी, आणि ममता म्हणजे माझेपण.

सर्वत्र जे ज्ञान होते ते वृत्तीलाच होते. वृत्ती म्हणजे तरी काय? तर अंत:करणाचा प्रकाशमय परिणाम म्हणजे वृत्ति. प्रथमत: वृत्तीचा आत्मारामाशी संबंध जडतो. पण नंतर ती वृत्ती पुढे इतर संसारिक पदार्थांशी जोडली जाते, परिणामत: अज्ञानास वश होते व अज्ञानजन्य संसारासच विषय करते. पण अखंड नामस्मरण, श्रीहरीचे हृदयचिंतन, सारासार विचार-विवेकाने, श्रीहरीस विनवण्याने वृत्ति संसारातून काढता येते. संसारात राहून वृत्तीतून संसार

काढावयाचा असतो. संसाराचा त्याग करून पळवाट काढून वृत्ति संसारातून निघते असं नाही.

मनाच्या - पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये व अहंकार/अभिमान या अकरा वृत्ती आहेत. त्यांचे अकरा विषय आहेत. पांच विषय, पाच कर्मे व शरीर मिळून अकरा. मनाच्या या अकरा वृत्ती, विषय, स्वभाव, संस्कार, कर्म व काळ यांनी परिणाम पावून शेकडो-सहस्त्र-लक्षावधी-कोट्यावधी प्रकारच्या आशा वाढतच जातात. नामाने त्या टाकता येतात.

सगळ्याच्या सगळ्या अंत:करणवृत्तींना एका क्षेत्रज्ञ आत्म्याच्या अस्तित्वाचाच आधार असतो. आत्मारामाच्या अस्तित्वामुळेच या वृत्तींना अस्तित्व प्राप्त होत असते. ते त्यांना आपोआप किंवा एकमेकांच्या आश्रयामुळे मिळालेले नसते. मुख्यत: वृत्ति म्हणजे अंत:करणाचा परिणाम असतो. संकल्प हा वृत्तिचाच धर्म आहे. हा धर्म संसाराच्या चिंतनाने बहिर्मुख झालेला. या चिंतनातून वृत्तीला सुख प्राप्त होत नाही कारण संसार अनित्य व दु:खरूप आहे. म्हणून ज्ञानराज म्हणतात बाह्य, जड, अनित्य, दु:खरूप पदार्थापासून ‘‘**निजवृत्ति काढी**’’ म्हणजे तिला परतवून अंतर्मुख करावे. पण ही निजवृत्ति ह्या सगळ्या अनात्म पदार्थांपासून म्हणजे संसारातून काढण्याकरिता, त्याविषयी असणारी माया, असक्ति तोडावी लागते.

म्हणून ज्ञानराज पुढे म्हणतात - ‘‘**सर्व माया तोडी॥**’’ सर्व शब्द मोठा मार्मिक आहे. सर्व माया याचा अर्थ अंतर्बाह्य सर्वतोप्रकारची आसक्ति. संसार आणि संसारअंत:पाती असणारे पदार्थ बाधक नाहीत तर त्यांची आसक्ति बाधक आहे. ती आसक्ति टाकावी, तोडावी.

या पुढे ज्ञानदेव सांगतात की, ‘‘**इंद्रिया सवडी लपो नको॥**’’ मोकाट इंद्रिये किती घातक आहेत हे भगवान गीतेत सांगताहेत. सतत स्वैर संचार करणाऱ्या इंद्रियांच्या मागे-मागोमाग मन जात असते. वारा जसा नावेला ओढतो, अशी बुद्धीपण भक्तीकडेच ओढली जाते. म्हणून म्हणतात, ‘‘**इंद्रिया सवडी लपो नको।**’’ इंद्रिये आपल्या ताब्यात हवीत; आपण

त्यांच्या ताब्यात जाता कामा नये. वाहन आपल्या ताब्यात हवे नाही कां? तरच प्रवास सुखाचा होईल. आपण आत्मस्वरूपाच्या मुक्कामी निश्चित प्राप्त होऊ.

या अभंगातील पुढचे चरण असे आहे - ''**तीर्थव्रती भाव धरी रे, करूणा। शांति दया पाहुणा हरि करी॥**'' आतापर्यंत तीर्थयात्रेला जाणे हा ''**वाऊगाचि व्यर्थ श्रम**'' व्यर्थ जाय असं म्हणणारे ज्ञानोबाराय अचानक तीर्थाविषयी आपली भूमिका कशी बरे बदलतील? मग तेथील **तीर्थ** पदाचा अर्थ काय असावा? तीर्थ या पदात मूळ धातू ''**तृ**'' म्हणजे तरणे, तरून जाणे. भवसागर तरून जाण्यास जे जे उपयुक्त आहे, ते ते अध्यात्म दृष्टीने तीर्थच आहे. म्हणून अध्यात्मज्ञान, क्षमा, शांति, दया, ज्ञानोत्तर भक्ति-पराभक्ति, निर्विकल्प समाधि, संत-श्रीगुरू-सिद्धपुरूष ही सगळी अर्थातच **तीर्थे** आहेत. या सर्वांना तीर्थत्व आणून देणारा भगवंत हा तर तीर्थांचे तीर्थ, सर्वांवरील महातीर्थ आहे नाही कां?

''**तीर्थांचे जे तीर्थ व्रतांचे जे फळ। ते ब्रह्म केवळ पंढरीचे। तुका म्हणे विठ्ठल ध्यानी। अनंत घडली तीर्थे पाही॥**'' म्हणून ज्ञानराज माऊलीचा आग्रह आहे की, **नाम** हेच तीर्थ आहे, **नाम** हेच व्रत आहे!!! नामरत व्हा आणि सकळ तीर्थांचे मूळस्थान श्रीहरी याची प्राप्ती साधा. कशाने तर या श्रीहरीच्या **नामरूप** तीर्थाने.

महातीर्थ अशा एका श्रीहरि-गुरूंच्या ठिकाणी असा दृढ भाव धरल्यावर, ध्यानी, मनी, स्मरणी, उच्चारणी त्यातच रमतो, त्याच्या अंगी, शांति, दया, क्षमा अशा अनेकानेक दैवी गुणांची खाणच प्रगटते.

शांति म्हणजे काय ते ज्ञानराज एका ओवीत सांगतात, ''**गिळूनि ज्ञेयाते। ज्ञाता ज्ञानहि माघौते। हारपे निरूते। ते शांति पै गा॥**'' आता दया पण सांगतात, ''**तैसे पुढिलाचे नि तापे। कळवळलिये कृपे। सर्वस्वेसी दिधले आपणपे। ते थोडेचि गमे॥**'' करूणा म्हणजे मृदुता-मार्दव. ''**ना तरी बालकोद्देशे। मातेचे स्नेह जैसे। कां वसंताच्या स्पर्शे। मऊ मलयानिळु॥**''

हे गुण जेथे तेथे भगवंत जीवाचा पाहुणा होतो. ''**दया क्षमा शांति। तेथे देवाची वसती॥**''

पहिल्या अभंगात ''**द्वारकेचा राणा पांडवा घरी॥**'' म्हणाले तोच **राणा** सर्वांचा पाहुणा व्हावा अशी ज्ञानराजांची तळमळ. शेवटचा चरण आहे, ''**ज्ञानदेवा प्रमाण, निवृत्ती देवी ज्ञान। समाधी संजीवन हरिपाठ॥**'' सं-म्हणजे सम्यक. संजीवन म्हणजे सम्यक् जीवन. संपूर्ण जीवन व्यापणारी ती संजीवन समाधी. म्हणजे संपूर्ण जीवनच समाधिस्वरूप होणे. अढळ श्रद्धेने, अंत:करणाच्या एकवटलेल्या भक्तिभावामुळे, सर्व **समर्पणामुळे** भगवंताशी/श्रीगुरूंशी अतूटपणे अनुसंधान-अनुबंध राखता येतो. मग तो भक्त सदासर्वकाळ हरिचैतन्यात-ब्रह्मचैतन्यात म्हणजेच संजीवन समाधितच राहात असतो. **नामपाठ/हरिपाठ** हे या संजीवन समाधि साधण्याचे एकमेव साधन आहे. जाणीव न स्फुरता केवळ आणि केवळ आनंदाकारता म्हणजे संजीवन समाधि. नामानंदाने ती साधते. **आनंदाने आनंदच** होता येते. नाम म्हणजे **आनंद**. आनंद म्हणजे नाम.








 ## ''आत्मदिवाळी'' 

**''संत आले घरा। तोचि दिवाळी दसरा॥''** किंवा **''दसरा दिवाळी तोचि आम्हा सण। सखे संतजन भेटतील॥''** आपल्या हृदयाच्या पणतीत, श्रीगुरुकृपेचे स्नेहभरणे, त्यात भिजलेली आपल्या **''भाव-भक्ति-प्रेम-श्रद्धा''** हीच घट्ट वळलेली वात आणि मग गुरुकृपानुग्रहाने उजळलेली, अखंड तेवत असणारी, झळझळीत अशी लख्ख प्रकाशणारी आत्मज्योत. आत्मस्वरुपाचे प्रकाशन करणारी. आत्मविवेकाच्या ज्योती-असंख्य. आत्मज्ञानाचा लखलखीत प्रकाश, स्व-स्वरूपानुभूतीचा रुचकर, मधुर, स्वादिष्ट फराळ आणि आत्मतृप्तीच्या गोड ढेकरा. निजानंदाच्या फुलबाजा, भक्तिभावाची सुंदर फुले उधळणारे आत्मसाक्षात्काराचे भुईनळे, देहभावाच्या कपटे करून टाकणाऱ्या फटाक्यांच्या माळा, स्वानंदाकाशात फुटून आकाश तेजोमय करून टाकणारे बार, कसा **आनंदी-आनंद** !!! मंगल-अभ्यंगस्नानाचा सोहळा, मधुर भक्तीभावाच्या चांदीच्या वाटीत उपासनेचे सुगंधी मसाला तेल, सेवा-प्रेम-भावाचे केशर, कस्तुरी-दवणा, नागरमोथा, गव्हला, कचरा-जटामासी-चंदनचुरा आदि युक्त उटणे आणि समर्पणभावाचा भरपूर स्निग्धपदार्थांनीयुक्त असा मंद सुवासिक साबण, श्रद्धा-विश्वास यांचे निर्मळ-उष्णोदक अगदी भरपूर अंग पुसायला अतिशुद्ध तलम, मऊसूत असं पुण्याईचं वस्त्र, नेसायला आत्मशांतीची वस्त्रे आणि ल्यायला आत्मसुखाची लेणी-अलंकार, आदरभावाच्या ज्योतींची निरांजने, शुभेच्छा-शुभाशीर्वादाच्या अक्षता, भालप्रदेशी भाव-भक्तिचा कस्तुरी तिलक, बसायला भक्कम आधारभावाचा चंदनी पाट !!! आणखी काय राहिलयं सांगा. अरे ! अत्तर राहिलंच की !!! तत्सुखसुखीत्त्वाचे अत्तर. कसा काय जमला दिवाळीचा थाट ??? सांगा बरं ???

## "नाम परब्रह्म वेदार्थे"

**"जैसे बिंब तरी बचके एवढे। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडे।"** तसाच हा हरिपाठ छोटासा ग्रंथ (अर्थाने नव्हे तर अभंग संख्येच्या दृष्टीने) पण यातील **"शब्दाची व्याप्ती तेणे पाडे अनुभवावी"**. **"दीप कळिका धाकुटी। परि बहुं तेजाते प्रकटी।"** अगदी तसाच हा माऊलीचा हरिपाठ. जशी माऊली बाळाला घास घालते तसाच या विश्वमाऊलींनी अवघ्या बाळांना भरवलेला मऊ-मऊ तूप-वरण-भाताचा घासच बघा !

या हरिपाठाला वारकऱ्यांची "संध्या" असे म्हणतात. यावरूनच याची नित्यता, सार्वत्रिकता, पवित्रता, मंत्ररुपता, महनीयता दृग्गोचर होते पहा ! **"अवघड कोणी न करी सांगता। सुलभ बहुतां गोड वाटे।।"** श्री तुकोबाराय म्हणतात ते अगदी खरं नां !!! वै.प.पू. गुरुवर्य मामा म्हणायचे, "औषध हवे पण ते न मागता, घर बसल्या, गोड-रुचकर, पथ्याची कटकट नाही, घ्यायला सोपं आणि फुकट!" तसंच "साधन" अगदी सोपं हवं. म्हणाले, "सुलभ गोमटे।"

**"हरि मुखे म्हणा, हरि मुखे म्हणा."**

साधं-सोपं छान साधन !!! नाही कां ??? एक भगवंताचं नामस्मरण. या नामउच्चारणांमुळे - नामद्योतांमुळे - नामस्मरणाने परमार्थातील अवघ्या दशा म्हणजे अवस्था साध्य होतात. "मुख्य उपासना - सगुण भक्ती" की ज्याच्या योगे "प्रगटे हृदयीची मूर्ती।" कां म्हणाल तर एक शुद्ध भाव पाहून.

**"हरिचे चिंतन सर्वकाळ।"** किंवा **"दिन-रजनी हाचि धंदा। गोविंदाचे पवाडे।।"** नामस्मरण सतत व शीघ्र वेगाने (म्हणजे दोन उच्चारात-स्मरणात अंतर नको) करावयास हवे. अशाने काय होईल?

अशा अविश्रांत, अखंड नामस्मरणाने, चित्तात अन्य विषय, विकार, विकल्प शिरण्यास वावच मिळणार नाही. जसा ट्रॅफिक जाम झाल्यावर, रस्त्याच्या पलीकडे जाण्यास अवसरच/संधी मिळत नाही. म्हणून ज्ञानोबारायांनी सांगितले, **"जिव्हे वेगू करी।"** भागवतकार म्हणतात, **"हे जिव्हे रससारज्ञे, सर्वदा, मधुराप्रिये। नारायणास्य पीयूषं, पिब जिव्हे निरंतरम्।।"** एवढी एक जीव्हा वश झाली, तर मग बाकीच्या इंद्रियांचा काय पाड? आपल्या जनाबाई म्हणतात, **"दळिता कांडिता। तुज गाईन अनंता।। न विसंबे क्षणभरी। तुझे नाम गा मुरारी।। नित्य हाचि कारभार। मुखी नाम निरंतर।।"**



गुरुवर्य, भगवद्भक्त अण्णा घाणेकर